# तरतें पोलाद

## प्रास्ताविक

सर्वांना माहीत होतें, कीं गोविंदा पाळलेला मुलगा होता. त्याला स्वतःलाही तें माहीत होतें.

अण्णासाहेबांनीं एका अनाथालयांतून त्याला लहानपणींच पोसायला घेतला होता. तो कुणाचा मुलगा–कोणत्या जातीचा–अविवाहित संतति कीं विधवेची संतती–हें त्यांना माहीत नव्हतें. नाळ न तोडलेलें मूल विधिपूर्वक दत्तक घेतलें म्हणजे तें आपलेंच मूल होतें, त्याच्या जातीचें आणि धर्माचें बंधन नंतर हिशेबांत घेतलें जात नाहीं; असा जो रूढ विचार किंवा शास्त्राधार आहे त्याला अनुसरूनच गोविंदा औरस मुलाप्रमाणें मानला जात होता.

लहानपणीं अर्थातच त्याला ती जाणीव नव्हती. पण जसजसा तो मोठा होत गेला–लोकांच्या कुजबुजी त्याच्या कानीं येऊं लागल्या, तसतशी त्याची जाणीव जागी होऊं लागली.

आपल्याच घरांत त्याला संकोच वाटूं लागला. अण्णासाहेब आणि रमाबाई त्याला कोणत्याही रीतीनें आपली परिस्थिती जाणवूं नये याबद्दल जरी खबरदारी घेत होती,

तरी उपद्व्यापी लोक त्याला मुद्दाम डिवचण्याचा प्रयत्न करीत होते. घरच्या वडील माणसांच्या कुजबुजीमुळें शाळेंतले त्याचे बरोबरीचे विद्यार्थी या परिस्थितीची ज्यावेळीं त्याला जाणीव करून देऊं लागले त्यावेळीं तो अस्वस्थ झाला.

त्यावेळीं त्याचें वयही फारसें नव्हतें. नुकतीच त्याची मुंज झाली होती. लग्नाला सुद्धां जेवढा थाटमाट करीत नाहींत, एवढ्या मोठ्या अवडंबरानें त्याच्या मुंजीचें कार्य साजरें करण्यांत आलें होतें.

पण या कार्यामुळेंच या कुजबुजीला तोंड फुटलें. प्रत्येकजण प्रश्न विचारूं लागला, "ब्राह्मणानं दत्तक घेतला खरा पण मुलगा कुणाचा होता? समजा, मराठ्याचा असला, शूद्राचा असला तरी देखील चालेल—दिसतो चांगला ब्राह्मणासारखा, पण चांभाराचीं मुलं सुद्धां ब्राह्मणासारखीं दिसतात. हा चांभाराचा मुलगा नसेल कशावरून?"

ही कल्पना कुणीतरी खंवचट माणसानें काढली व ती फैलावली गेली. एकाच्या तोंडून दुसऱ्यानें ऐकून तिसऱ्याला सांगतांना ती बातमी अधिकृत समजली जाऊं लागली. अगदीं निश्चितच ठरून गेलें, कीं अण्णासाहेबांनीं दत्तक घेतलेलें मूल चांभाराचें!

म्हणूनच गोविंदा अस्वस्थ झाला. तो मनांतल्या मनांत झुरूं लागला. त्याच्या प्रकृतीवर परिणाम होऊं लागला.

दिवसेंदिवस तो अशक्त होत आहे असें पाहून अण्णासाहेबांनीं डॉक्टरकडे नेऊन त्याची चौकशी केली. अर्थातच डॉक्टरला रोगाचें कसलेंच लक्षण त्याच्या प्रकृतींत दिसून आलें नाहीं.

पोटचा गोळा नव्हता खरा पण रमाबाई गोविंदाला पोटच्या गोळ्यापेक्षांही जास्त वात्सल्यानें वागवीत असे. तिनें एके दिवशीं त्याला जवळ घेऊन प्रश्न केला तेव्हां त्यानें सारी हकिगत उघड करून सांगितली. आठ—नऊ वर्षांचा मुलगा; पण त्याची बुद्धि फार तीक्ष्ण होती. प्रौढपणाची सर्व लक्षणें एवढ्या लहान वयांत दिसून येत होतीं. म्हणूनच रमाबाईला त्याच्याबद्दल फार अभिमान वाटत असे.

रमाबाईनें विचारलें तेव्हां मन मोकळें करून त्यानें सर्व हकिकत सांगितली—इतकेंच नव्हे, तर लोकनिंदेच्या या मुक्या मारामुळें आपल्या मनावर कसा परिणाम होत आहे हेंही त्यानें स्पष्ट करून सांगितलें. तो म्हणाला, "असा गांजलों आहें, मागनं मागनं कुजबुजतात, टवाळी करतात—परवां एक मुलगा म्हणाला, 'माझ्या वहाणेची वादी लावून देतोस का गोविंदा ?' तेव्हां मला रडूंच कोसळलें. मीं रडूं लागलों तेव्हां सारे 'हो हो' करून हसूं लागले—" त्या प्रसंगाच्या स्मरणानेंच गोविंदाला हुंदका आला. रमाबाईही सदूगदित झाली.

अण्णासोहबांना ही हकिगत समजली तेव्हां ते एकदम उसळून उठले. ते म्हणाले, "कुणाचा वाटेल त्याचा मुलगा असेल; त्याच्याशीं या लोकांना काय करायचं आहे ? मला पटलं आहे ना—मग या हरामखोरांचं काय जातं ? म्हणावं वाळींत टाका ह्याला. मुंजीच्या वेळीं जेवायला कसे आले आणि भटाभिक्षुकानीं दक्षणा घेतेवेळीं कां तक्रार केली नाहीं ? पैसा हवा, मेजवान्या हव्या—अन् वर अशा कुचाळ्या काढायला हव्या ! मीं जें कांहीं केलं आहे तें शास्त्रोक्त केलं आहे. चांगल्या शास्त्री-अधिकाऱ्यांच्या सल्ल्यानें केलं आहे. कुणाची भीति नाहीं मला, समजलास गोंदू !—तूं माझा आहेस—माझा मुलगा आहेस. मीं माझा म्हटला म्हणजे तो माझा. प्राण गेला तरी तिथं दुजाभाव येणार नाहीं. या गांवकुटाळांची मुळींच पर्वा करूं नको, त्यांना म्हणावं हो—मी चांभाराचाच आहें. वाटलं तर माझ्या पंक्तीला जेवूं नका. वाटलं तर माझ्याकडचं खाऊं नका—तेवढाच फायदा होईल आमचा. वाळींत टाका म्हणावं आम्हांला ! मग रोज हीं कार्यप्रस्थानं करायला नको. तेवढाच खर्च वांचला. तेवढाच माझा फायदा होईल. मीं जोपर्यंत असा खबरदार उभा आहें तोपर्यंत कांहीं कुणाची पर्वा करूं नकोस—" गोविंदाला पुन्हां हुंदका आला असें पहातांच त्याला जवळ ओढून कवटाळून त्याला ते म्हणाले, "तूं माझा आहेस, माझा औरस मुलगा आहेस ! सारं विसरून जा. कांहीं कुणाचं ऐकून घेऊं नकोस. पूर्वींच मला कां विचारलं नाहींस, मीं तुला तेव्हांच सांगितलं असतं. आतां यापुढें ध्यानांत ठेव; केव्हां कुणीही कांहीं बोललं तर मला सांगत जा, अगदीं मनांत ठेवूं नकोस. हें

असं मनांत ठेवून कुढत राहिल्यामुळें तुझी ही अशी स्थिति झाली आहे. त्या चोरांना तेंच हवंय्. पहिला नंबर असतो कीं नाहीं तुझा—तो तूं खालीं घालवायचा नाहीं. तें कांहीं नाहीं—आधीं आपला नंबर सांभाळ; आपला अभ्यास नीट करीत जा. खेळांत सुद्धां मिसळूं नकोस. कुणाशीं भाषणसुद्धां करूं नकोस."

अण्णासाहेबांच्या आश्वासनानें गोविंदाला बराच धीर आला. विचारपूर्वक त्यानें आपली राहणी बदलली. तो सर्वांशीं फटकून वागूं लागला. आपण भला कीं आपला अभ्यास भला, असाच क्रम ठेवायला त्यानें सुरवात केली. कुणी कांहींही म्हटलें तर तें तो नुसत्या हंसण्यावारीं नेतो असें पाहून निंदकांची जीभसुद्धां लंगडी पडूं लागली.

असेच कांहीं दिवस निघून गेले. तो विषय जरी मुळींच संपला नव्हता, तरी त्याचा परिणाम ढिला पडला. क्वचित होणाऱ्या निंदेला गोविंदा उसन्या अवसानानें तोंड देत होता.

पण तें अवसान उसनें होतें—अंतःकरणापासून नव्हतें. त्याच्या हृदयाला झालेली जखम सारखी वहात नसली तरी मधून मधून थिबकत होती. त्याच्या बाल मनावर झालेला परिणाम हृदयाच्या कुठल्या तरी कोपऱ्यांत ठसून राहिला होता.

हळू हळू निंदा बंद झाली—थट्टा विरून गेली—कांहीं लोक विसरून सुद्धां गेले. पण गोविंदाची जाणीव झोपीं गेली नाहीं.

आईबापाखेरीज गोविंदाच्या घरांत दुसरें कुणीच नव्हतें. होते काय ते नोकर—चाकर, पण धन्याच्या जरबीमुळें ते कांहींच बोलत नव्हते.

अभ्यासाखेरीज गोविंदाला कसलाच विरंगुळा नव्हता. या विलक्षण परिस्थितीमुळें स्नेह्यांसोबत्यांची ताटातूट झाली होती. मित्र म्हणून म्हणायला त्याला कुणीच नव्हतें. कुणाच्या खेळांत तो कधींच मिसळत नसे. कोणत्याही उत्सवांत तो सामील होत नव्हता. घर अन् शाळा या दोन स्थळांखेरीज हालचाल करायला त्याला दुसरा कुठचा वाव नसल्यामुळें दिवसेंदिवस तो एकलकोंडा बनत चालला होता.

आसऱ्याचें त्याचें एकच स्थान–त्याची आई रमाबाई! चांगल्या चालणाऱ्या वकिलीमुळें अण्णासाहेबांनाही मुलाकडे लक्ष द्यायला फारसा अवकाश मिळत नव्हता त्यामुळें गोविंदाला आई हेंच सर्वस्वी होऊन बसलें होतें.

मराठी शाळेचा शिक्षणक्रम संपला. तो इंग्रजी शाळेंत जाऊं लागला. तीन चार वर्षें निघून गेलीं; परंतु परिस्थितींत कांहीं फरक झाला नाहीं. असल्या या यांत्रिक जीवनक्रमामुळें त्याच्या ठायीं एक प्रकारचा रुक्षपणा आला होता.

सामाजिक जीवनाच्या अभावामुळें त्याच्या आयुष्याला व्यापक स्वरूप येत नव्हतें. त्याची दृष्टि संकुचित होऊं लागली होती. वृत्ती एकांगी झाली होती. स्वभाव एककल्ली बनला होता. या विशिष्ट परिस्थितीमुळें त्याच्या वयाच्या इतर मुलांत सामान्य बुद्धि असूनही जी धडाडी दिसून येत असे, तशा प्रकारचा जिवंतपणा त्याला पारखा झाला. तें जीवन अनिश्चित असलें तरी दिवसेंदिवस त्याला स्वाभाविक स्वरूप येत चाललें होतें. एका विशिष्ट सांच्यातूनच त्याची घडण घडली जात होती.

शाळेच्या अभ्यासक्रमांत मात्र तो अग्रस्थानीं राहिला होता. मॅट्रिकच्या परिक्षेंत साऱ्या इलाख्यांत त्याचा नंबर पहिला आला. त्याच्या आईबापांचा आनंद गगनांत मावेनासा झाला.

पुढच्या शिक्षणक्रमासाठीं त्याला मुंबईला ठेवण्यांत आलें. पहिल्यानें तो कॉलेजच्या हॉस्टेलमध्यें राहात होता. पण गांवच्या फुत्कारांचे उसासे तिकडेही निघूं लागल्यामुळें अण्णासाहेबांनीं त्याला एका इंग्लिश हॉटेलमधें ठेवण्याची व्यवस्था केली. पुढें त्याला आय्. सी. एस्. च्या परीक्षेसाठीं विलायतेला पाठवायचें अशी योजना असल्यामुळें ही त्याची पूर्वतयारी आहे असें अण्णासाहेब म्हणत.

दरवर्षी तो परीक्षा पास होत गेला. कॉलेज आणि हॉटेल यां पलिकडे त्याला कांहीं माहीत नव्हतें. परीक्षा पास होणें एवढेंच त्याचें आयुष्यांतलें कर्तव्य ठरविण्यांत आलें होतें आणि तें तो कसोशीनें पार पाडीत होता.

एकोणिसाव्या वर्षी तो बी. ए. झाला. पण जगाची त्याला कांहींच माहिती नव्हती. जेवणापलिकडे त्याला कोणतेंच व्यसन नव्हतें आणि प्रोफेसरांशिवाय कुणाचा परिचय नव्हता. त्याची प्रकृति निकोप असल्यामुळें उभ्या आयुष्यांत एकाद्या डॉक्टरशींही त्याचा परिचय झाला नाहीं.

त्याला विलायतेला पाठविण्यांत आलें. तिथेंही त्याचा तोच कार्यक्रम होता. तिथेंही त्यानें कुणाशीं परिचय करून घेतला नाहीं. कुणाचा तरी परिचय करून घेतला पाहिजे ही जाणीवच मुळीं त्याला नव्हती. इकडून विलायतेला जाणाऱ्या तरुणांच्या बाबतींत शंकाकुशंका घेण्यांत येत असतात–त्यांच्या वर्तनावर आरोप करण्यांत येतात– पण गोविंदाच्या बाबतींत तसें कांहीं झालें नाहीं. हिंदुस्थानांतून तिकडे गेलेल्या विद्यार्थ्यां-शींही त्यानें संबंध ठेवला नाहीं. तो फक्त पास होऊन परत आला.

एवढ्या परीक्षा पास होऊन, एवढा लौकिक मिळवूनही कोरडा राहिलेला हा प्राणी आतां जिल्ह्याच्या कारभाराला जुंपला जाणार होता. तो परीक्षा पास झाला आहे एवढेंच अण्णासाहेबांना माहीत होतें. संसारांत वावरण्यासाठीं जगाच्या ज्या अनुभवाची जरूरी असते तो अनुभव त्यानें किती घेतला आहे याची त्यांनीं कधींच चौकशी केली नाहीं.

असा हा रिकामा घडा निर्मळ आणि पवित्र मनानें हिंदुस्थान सरकारच्या मुलकी खात्यांत एक वरिष्ठ अधिकारी म्हणून प्रतिष्ठित झाला.

---

# प्रकरण १ लें

एवढ्या लहान वयाचा असिस्टंट कलेक्टर आलेला पाहून सर्वांनाच आश्चर्य वाटलें. कित्येक कौतुक करीत होते, तर कित्येक टवाळी करीत होते. विशेषतः कारकून लोक असला अल्पवयी आणि अननुभवी 'साहेब' आल्यामुळें अस्तनींतून हंसत होते. आनंद झाला होता तो त्यांना.

सुरवातीलाच त्याला एक प्रकारें संसार थाटावा लागला. त्याचा संसार थाटण्यासाठीं रमाबाई आली असती; पण अण्णासाहेबांना स्वैंपाक्याच्या हातीं एकटें टाकून जाणें तिच्या जिवावर आलें. तेव्हां गोविंदानें इतर साहेबांच्या अनुकरणानें साहेबी पद्धतीनेंच आपला संसार थाटला.

आतां त्याच्या मुळाचा प्रश्न कुणीच काढीत नव्हतें. पूर्वी निंदा करणारे आतां त्याला 'चांभाराचें पोर' म्हणत नव्हते. एवढ्या अल्पवयांत एवढ्या तेजस्वी असण्याऱ्या मुलाचें बीज उच्चवर्णीयाचेंच असलें पाहिजे असाच सर्वांनी निकाल दिला. पूर्वी निंदा करणारे आतां ओळखी काढण्यासाठीं त्याच्या बंगल्यावर खेटे घालूं लागले.

एकलकोंडेपणाचा उपयोग गोविंदाला जर कधीं झाला असेल तर याच वेळीं. कित्येकजण तुसडा म्हणत, तर कित्येकजण त्याच्यावर करारीपणाचा आरोप करीत.

कारकून लोकांशीं देखील तो फारसा बोलत नसे. प्रत्येक काम लेखी चाले. लेखी लिहायचें आणि त्याचें लेखी उत्तर घ्यायचें. शिरस्तेदारानें सुनावणी करण्याची पद्धत त्यानें मोडून टाकली होती. त्यामुळें कारकूनवर्ग त्याच्यावर चिडला होता. कोणतेंही प्रकरण साहेबाच्या पुढें ठेवलें म्हणजे त्याच्या तोंडीं सुनावणीवरून आपल्याला पाहिजे त्या प्रकारच्या रीतीनें साहेबाचा हुकुम घेण्याला सोकावलेले शिरस्तेदार त्याच्या या लेखी पद्धतीमुळें हवालदील झाले होते. 'कालचं कार्टं अन् आज आम्हांला लेखी विचारीत बसतं! पाहूं म्हणावं—आमच्याशीं गांठ आहे!' असें म्हणत ते संधीची वाट पहात होते.

अधिकारी या नात्यानें त्याचा चांगलाच दरारा बसला होता. त्याची कीर्ति थोड्याच दिवसांत सर्वतोमुखीं पसरली होती.

हळुहळू एकेक श्रीमंत माणूस आपल्या पदवीधर मुलीचें 'वकीलपत्र' घेऊन अण्णासाहेबांच्या गांवीं हजर होऊं लागला होता. अण्णासाहेबांच्या समोर दहाबारा मुलींचे फोटो टेबलावर पडून राहिले होते.

एकदां तो घरीं आला त्यावेळीं अण्णासाहेबांनीं हे फोटो त्याला दाखविले आणि त्यांतून आपल्या भावी वधूची निवड करण्याची आज्ञा केली. कोणत्या मुलीच्या बापाकडून किती हुंडा येणार होता हें प्रत्येक फोटोच्या मागें लिहिलें होतें.

त्याला कांहींच गम्य नव्हतें. लोकांचीं लग्नें होत असतात तीं कशासाठीं, हें देखील त्याला नीटसें सांगतां आलें नसतें. सारे फोटो अण्णासाहेबांच्या हातीं देत तो म्हणाला, "मी अजून कसलाच विचार केला नाहीं. तुम्हीं सांगाल त्याप्रमाणं वागणं हें माझं कर्तव्य आहे. तुमची आज्ञा मी मुकाट्यानं पाळीन."

कॉलेजांतून पार पडून गेलेला मुलगा असें कांहीं बोलेल असें अण्णासाहेबांना वाटलें नव्हतें. त्यांनीं म्हटलें, "हें पहा गोंदू, तूं आतां साहेब झाला आहेस—जिल्ह्याचा कारभार चालविणार आहेस—लोकांचे न्यायनिवाडे देणार आहेस. आतां हें तुझं तूंच पाहिलं पाहिजेस. माझी मुळींच सक्ति नाहीं. तुझं कुठं कांहीं ठरलं असेल तर

त्याला मी मुळींच हरकत घेणार नाहीं. हुंड्याची मला मुळींच पर्वा नाहीं. मी आजवर जें कांहीं मिळविलं आहे तें सर्वांना पुरून उरण्यासारखं आहे. शिवाय तुलाही चांगला पगार मिळतो आहे–यापुढं तो वाढत जाणार आहे. तुझ्याकडून कांहीं मिळायची माझी अपेक्षा तर नाहींच; उलट तुला आणखी जरूर लागेल तर द्यायची माझी तयारी आहे. एकाच गोष्टीची मला घाई झाली आहे–केव्हां एकदां मी आजोबा होईन ! तेवढी आम्हां उभयतांची इच्छा पुरवलीस म्हणजे झालं. पुन्हां एकदां हे फोटो पहा. वाटलं तर साऱ्या मुली पहा–त्यांचे बाप आत्तां त्यांना घेऊन धांवत येतील. आतां मर्जीनुरूप आपल्या बायकोची निवड कर. या बाबतींत मी तुला पूर्ण मुखत्यारी देतों आहें. एवढंच, कीं विलायतेंत तुझं काय कुठं जुळलं असेल—"

"माझं कुठंच कांहीं जुळलं नाहीं." गोविंदा म्हणाला, "आजवर कोणत्याही तरुण मुलीशीं माझा परिचयसुद्धा झाला नाहीं."

"तर मग यांतूनच निवड कर." अण्णासाहेब म्हणाले. गोविंदा कांहींच बोलत नाहीं असें पाहून ते पुढें म्हणाले, "वाटलं तर या कामीं आपल्या आईची मदत घे. तिची निवड कधीं चुकीची व्हायची नाहीं."

गोविंदाला हायसें वाटलें. त्यानें रमाबाईच्या समोर ते फोटो नेऊन हजर केले. तें पाहून ती हंसूं लागली.

"हें रे काय वेड्या !" ती म्हणाली, "एवढा मोठा साहेब झालास अन् अजून तुला मुलीची निवड करतां येत नाहीं ?"

"या गोष्टीचा मी कधीं विचारच केला नाहीं." गोविंदा ओशाळून म्हणाला.

रमाबाई बिचारी विचारांत पडली. त्याची हताश मुद्रा पाहून तिचें आईचें अंतःकरण घाबरून गेलें. तिला वाटलें, खरोखरच का यानें विचार केला नाहीं ? एवढीं मुलें कॉलेजांत जातात, त्यांचें कुठें ना कुठें तरी जमतें आणि त्यांना त्यामुळें आईपाशीं भांडण्याचा प्रसंग येतो; आणि हा म्हणतो, आपण त्याचा विचारच कधीं केला नाहीं ! तिनें विचारायला सुरवात केली—

" कॉलेजांत तूं होतास त्यावेळीं तुझ्याबरोबर कांहीं मुली होत्या का तिथं ?"

" हो. पुष्कळ होत्या. "

" मग त्यांतल्या कुणाशीं तुझी ओळख नाहीं का झाली ? "

" छे;—नाहीं. "

" कुणा मुलीनं तुझी ओळख करून घ्यायचा कधीं प्रयत्न नाहीं का केला ? "

" मी कशाला कुणाच्या ओळखी करायला जाऊं ? माझं लक्ष माझ्या अभ्यासावर असे. त्या पलिकडे मी कोणत्याच भानगडीत पडत नसें. कुणाशींच माझा परिचय झाला नाहीं. "

बिचारी रमाबाई घाबरून गेली. तिला वाटलें, आतां या आपल्या मुलाचें पुढें होणार तरी काय ? गोविंदाचें लग्न सुध्या बोलानें होणें कठीण जाईल, अशी तिनें अपेक्षा केली होती. पण तिला धक्का बसला. इतरांच्या मुलांच्या भानगडी उघडकीस आल्या होत्या. कित्येकांनीं आपल्या आईबापांना न विचारतांच लग्नें केलीं होतीं. कित्येकांनीं आपल्या आईबापांबरोबर भांडून नंतर आपल्या मर्जीप्रमाणें लग्नें केलीं होतीं. तिची फार इच्छा होती, कीं गोविंदानें असेंच कांहींतरी करावें !

इच्छा मोठी विलक्षण होती यांत शंका नाहीं. पण तिला तसें वाटत होतें खरें ! आपला संसार फार सुखाचा झाला हेंच तिला डांचत होतें. आयुष्यांत कुठेंच खटका नव्हता. प्रेमळ नवरा, आज्ञाधारक मुलगा, घरभर दौलत, सारें कांहीं यथास्थित होतें—म्हणूनच त्या जीवनांत तिला स्वारस्य वाटत नव्हतें. म्हणूनच या लग्नाच्या बाबतींत तरी गोविंदा आपल्याशीं भांडण करील अशी अपेक्षा ती करीत होती.

पण तसें कांहीं झालें नाहीं. म्हणूनच तिला धक्का बसला. ती म्हणाली, " गोंदू, तूं माझं ऐक. या फोटोंतल्या मुलींपैकीं कुणाचीच निवड करूं नकोस. कुठं तरी, कुणाची तरी ओळख करून घे. तुझ्या मताला, तुझ्या राहणीला, तुझ्या स्वभावाला पटेल अशी एखादी कुठली तरी मुलगी तुझी तूंच शोधून काढ. मग मी भांडेन. ती मुलगी नापसंत ठरवीन. मग हे कदाचित् तुझी बाजू घेतील. मग आमचा थोडासा वादविवाद होईल. अन् मग आपण कांहींतरी तडजोड काढून तुझ्या इच्छेप्रमाणं लग्न उरकून घेऊं. "

" हें तूं आधीं सांगितलं पाहिजे होतंस आई. " गोविंदा म्हणाला, " कॉलेजांत असतों तर तुझी आज्ञा पाळण्यासाठीं मी तसा कांहीं प्रयत्न करून पाहिला असता. पण आतां तें शक्य नाहीं. आतां मी जगापासून दूर झालों आहें कुणी माझ्याजवळ येत नाहींत अन् माझ्या दर्जाच्या दृष्टीनं सामान्य लोकांत मी मिसळणं इष्ट नाहीं. कशी कुणा मुलीची नि माझी ओळख होणार ? गांवांतसुद्धां मी फिरत नाहीं. "

" तर मग गांवांत एकदां ओळखी करून घे. तुझ्या तोडीचे कुणी नसतात. पण वकील, डॉक्टर कुणी असतीलच ना गांवात ? ते येत असतील ना तुझ्या क्लबांत ? त्यांच्यापैकीं कुणाची तरी मुलगी असेलच कीं नाहीं ? अशा कांहींतरी ओळखी काढ—"

पुढें काय बोलावें हें तिचें तिलाच सुचेना.

गोविंदानें सारे फोटो नेऊन अण्णासाहेबांकडे दिले आणि म्हटलें, " आईला यांतली कोणतीच पसंत नाहीं. "

अण्णासाहेबांनीं सारे फोटो उचलून केराच्या टोपलींत फेंकून दिले. त्या त्यांच्या करण्याचा काय अर्थ करावा हें गोविंदाला समजेना. त्याला प्रश्न पडला, अण्णा रागावले तर नाहींत ?

" राग आला का तुम्हांला ? " त्यानें हळूच विचारलें.

अण्णासाहेब सारखे हांसत सुटले.

पुनः त्याला प्रश्न पडला—कुठली ही आफत आली असें त्याला वाटलें. सांगून आलेल्या मुली वगळून इतर कुठली तरी मुलगी कशी शोधून काढावी याचा तो विचार करूं लागला.

बिचाऱ्या रमाबाईलाही कांहीं सांगतां येईना. तो इतका निष्क्रिय झाला असेल याची तिला कल्पना नव्हती. त्याची ही परमहंस वृत्ति पाहून तिच्या हृदयांत धडकी भरली.

रजा संपतांच गोविंदा आपल्या नोकरीवर हजर होण्यासाठीं निघून गेला.

---

" कॉलेजांत तूं होतास त्यावेळीं तुझ्याबरोबर कांहीं मुली होत्या का तिथं ?"

" हो. पुष्कळ होत्या. "

" मग त्यांतल्या कुणाशीं तुझी ओळख नाहीं का झाली ? "

" छे;—नाहीं. "

" कुणा मुलीनं तुझी ओळख करून घ्यायचा कधीं प्रयत्न नाहीं का केला ? "

" मी कशाला कुणाच्या ओळखी करायला जाऊं ? माझं लक्ष माझ्या अभ्यासावर असे. त्या पलिकडे मी कोणत्याच भानगडीत पडत नसें. कुणाशींच माझा परिचय झाला नाहीं. "

बिचारी रमाबाई घाबरून गेली. तिला वाटलें, आतां या आपल्या मुलाचें पुढें होणार तरी काय ? गोविंदाचें लग्न सुध्या बोलानें होणें कठीण जाईल, अशी तिनें अपेक्षा केली होती. पण तिला धक्का बसला. इतरांच्या मुलांच्या भानगडी उघडकीस आल्या होत्या. कित्येकांनीं आपल्या आईबापांना न विचारतांच लग्नें केलीं होतीं. कित्येकांनीं आपल्या आईबापांबरोबर भांडून नंतर आपल्या मर्जीप्रमाणें लग्नें केलीं होतीं. तिची फार इच्छा होती, कीं गोविंदानें असेंच कांहींतरी करावें !

इच्छा मोठी विलक्षण होती यांत शंका नाहीं. पण तिला तसें वाटत होतें खरें ! आपला संसार फार सुखाचा झाला हेंच तिला डांचत होतें. आयुष्यांत कुठेंच खटका नव्हता. प्रेमळ नवरा, आज्ञाधारक मुलगा, घरभर दौलत, सारें कांहीं यथास्थित होतें—म्हणूनच त्या जीवनांत तिला स्वारस्य वाटत नव्हतें. म्हणूनच या लग्नाच्या बाबतींत तरी गोविंदा आपल्याशीं भांडण करील अशी अपेक्षा ती करीत होती.

पण तसें कांहीं झालें नाहीं. म्हणूनच तिला धक्का बसला. ती म्हणाली, " गोंदू, तूं माझं ऐक. या फोटोंतल्या मुलींपैकीं कुणाचीच निवड करूं नकोस. कुठं तरी, कुणाची तरी ओळख करून घे. तुझ्या मताला, तुझ्या राहणीला, तुझ्या स्वभावाला पटेल अशी एखादी कुठली तरी मुलगी तुझी तूंच शोधून काढ. मग मी भांडेन. ती मुलगी नापसंत ठरवीन. मग हे कदाचित् तुझी बाजू घेतील. मग आमचा थोडासा वादविवाद होईल. अन् मग आपण कांहींतरी तडजोड काढून तुझ्या इच्छेप्रमाणं लग्न उरकून घेऊं. "

" हें तूं आधीं सांगितलं पाहिजे होतंस आई. " गोविंदा म्हणाला, " कॉलेजांत असतों तर तुझी आज्ञा पाळण्यासाठीं मी तसा कांहीं प्रयत्न करून पाहिला असता. पण आतां तें शक्य नाहीं. आतां मी जगापासून दूर झालों आहें कुणी माझ्याजवळ येत नाहींत अन् माझ्या दर्जाच्या दृष्टीनं सामान्य लोकांत मी मिसळणं इष्ट नाहीं. कशी कुणा मुलीची नि माझी ओळख होणार ? गांवांतसुद्धां मी फिरत नाहीं. "

" तर मग गांवांत एकदां ओळखी करून घे. तुझ्या तोडीचे कुणी नसतात. पण वकील, डॉक्टर कुणी असतीलच ना गांवात ? ते येत असतील ना तुझ्या क्लबांत ? त्यांच्यापैकीं कुणाची तरी मुलगी असेलच कीं नाहीं ? अशा कांहींतरी ओळखी काढ—"

पुढें काय बोलावें हें तिचें तिलाच सुचेना.

गोविंदानें सारे फोटो नेऊन अण्णासाहेबांकडे दिले आणि म्हटलें, " आईला यांतली कोणतीच पसंत नाहीं. "

अण्णासाहेबांनीं सारे फोटो उचलून केराच्या टोपलींत फेंकून दिले. त्या त्यांच्या करण्याचा काय अर्थ करावा हें गोविंदाला समजेना. त्याला प्रश्न पडला, अण्णा रागावले तर नाहींत ?

" राग आला का तुम्हांला ? " त्यानें हळूच विचारलें.

अण्णासाहेब सारखे हांसत सुटले.

पुनः त्याला प्रश्न पडला—कुठली ही आफत आली असें त्याला वाटलें. सांगून आलेल्या मुली वगळून इतर कुठली तरी मुलगी कशी शोधून काढावी याचा तो विचार करूं लागला.

बिचाऱ्या रमाबाईलाही कांहीं सांगतां येईना. तो इतका निष्क्रिय झाला असेल याची तिला कल्पना नव्हती. त्याची ही परमहंस वृत्ति पाहून तिच्या हृदयांत धडकी भरली.

रजा संपतांच गोविंदा आपल्या नोकरीवर हजर होण्यासाठीं निघून गेला.

---

## प्रकरण २ रें

पुन्हां जाऊन तो आपल्या नोकरीवर रुजू झाला. नित्याचीं कामें सुरू झालीं. ऑफिसच्या कामाच्या रहाटगाडग्यांत तो सारखा फिरत होता.

विश्रांति काय ती संध्याकाळीं क्लबमध्यें जात असे तेवढ्याच वेळीं त्या विश्रांतीची पद्धतही तीच — एक ठराविक कार्यक्रम-रोज तेच खेळ—तेंच खाणेंपिणें-तींच वर्तमापत्रें वाचणें-पुन्हां घरीं येणें.

या ठराविक कार्यक्रमाची त्याला इतकी संवय लागली होती, कीं त्या कार्यक्रमांत थोडासा फरक झाला असता तर तो बेचैन झाला असता. पहिल्यापासूनच बोर्डिंगांत गेलेलें आयुष्य- विलायतेंतसुद्धां हॉटेलमधें तसाच आंखलेला जीवनक्रम.

कुटुंबवत्सलतेचा त्याला परिचय नव्हता. कुटुंबवत्सल माणसांशीं त्याचा केव्हांहीं संबंध आला नव्हता. जें कुटुंब त्यानें पाहिलें होतें तें आपल्या घरचें. तिथेंही दोनच माणसें. त्यांतून घरचा मालक उद्योगी माणूस—आपल्या कामांत गढून गेलेला. एकटी रमाबाई संसाराचा भार वाहात असलेली.

तो स्वतः घरीं गेला तरी पाहुण्यासारखा असे. त्यांतूनही जाणं लहानमोठ्या सुटीच्या वेळीं. तसल्या त्या वातावरणांत कुटुंबवत्सलतेची कल्पना त्याला यावी कशी ?

ज्या जिल्ह्याला तो अधिकारी म्हणून आला होता तिथले अधिकारी योगायोगानें बहुतेक सारे एकटेच होते. कित्येकांनीं आपली बायकामुलें आणलीं नव्हतीं, तर कित्येक गोविंदासारखेच अविवाहित होते.

ही सुट्टी संपल्यानंतर तो जो परत आला त्यावेळीं या फकीरमंडळांत एक फरक घडून आला आहे असें त्याला दिसून आलें. एक नवीन पारशी डॉक्टर सिव्हिल-सर्जन म्हणून आले होते. ते बरेच वयोवृद्ध होते. त्यांना बरींच मुलें होतीं, पण त्यांतील बहुतेक मुंबईला शाळा—कॉलेजांतून शिकत होतीं. त्यांची पत्नी आणि एक मुलगी अशीं दोघें या वेळीं त्यांच्याबरोबर आलीं होतीं.

क्लबच्या वातावरणांत या दोन बायकांच्या आगमनानें वेगळी झुळूक उत्पन्न झाली होती. गोविंदासारखे अविवाहित असलेले एक पारशी असिस्टंट कलेक्टर होते. तसेच, एक गुजराथी असिस्टंट जज्ज होते. पोलिस सुपरिंटेंडेंट तरुणच होते—पण ते इंग्लिशमन होते.

डॉक्टरांची ही मुलगी नुकतीच बी. ए. झाली होती. सदोदित ती अविवाहित राहाण्याच्या गोष्टी बोलत असे. पण शक्य तितकी पोलिस सुपरिंटेंडेंट रिचर्ड्स् याच्या सहवासांत राहाण्याचा प्रयत्न करी.

टेनिस् खेळण्यांत ती पटाईत होती. गोविंदालाही टेनिस् खेळण्याचा शोक असे. पण खेळण्याचे वेळीं ती गोविंदाला टाळण्याचा प्रयत्न करी. असिस्टंट जज्ज रतिलाल तिच्यासभोंवतीं घोंटाळण्याची संधि वायां दवडीत नसे खरा, पण ती त्याच्याशीं तुसडेपणानें वागत असे.

स्त्रीजातीचें आकर्षण वाटण्याची नैसर्गिक भावना आपल्या ठिकाणीं जागी होत आहे असें गोविंदाला वाटूं लागलें. त्याला रिचर्ड्स्चा मत्सर वाटूं लागला. टेनिस् खेळत असतां रिचर्ड्स्चा पाडाव करण्याचा तो जिवापाड प्रयत्न करूं लागला.

रिचर्ड्सही कांहीं कमी नव्हता. त्यानें अंदाज ताडला होता. खेळापेक्षां खेळी-मेळीच्या वागणुकीवरच तो जास्त भर देत होता आणि तिलाही तें आवडत होतें.

गोविंदाला चीड येत होती ती या गोष्टीची. त्यानें रिचर्ड्सशीं आपली तुलना करून पाहिली. त्याला असें वाटलें, कीं आपली कातडी रिचर्ड्स् इतकी गोरी नसली तरी आपण त्याच्यापेक्षां देखणे आहोंत खास.

प्रकृतीनें तो सुदृढ होता. अधिकारी वर्गांत इतर कोणाही ज्युनिअर माणसापेक्षां त्याची ख्याति जास्त मोठी होती.

रतिलालही तरुण होता पण तो कुरूप होता–काळा होता–गबाळ्या होता. त्याच्यापासून नरगिज फार दूर राहाते त्याचें गोविंदाला आश्चर्य वाटत नव्हतें. त्याला प्रश्न पडत होता, कीं ती आपल्याला कां टाळते ?

तो स्वतःचें निरीक्षण करूं लागला तेव्हां उणीव कुठें आहे तें हळूहळू दिसूं लागलें.

तो बुद्धिमान् होता, पण मधुभाषी नव्हता; देखणा होता, पण फाजील गंभीर होता. खेळाडू होता, पण खिलाडू नव्हता. दुसऱ्यांची मनें बुद्धिपुरस्सर आकर्षून घेण्याची कला त्यानें अवगत करून घेतली नव्हती. तसें करण्याची त्याला आज-पर्यंत जरूरीही भासली नव्हती.

पण त्याच्या जीवनांत हें नवीन बीज निर्माण झालें. त्याला नकळत तें रुजलें. त्याला नकळतच अंकुर फुटला.

पण तो अंकुर वाढायला बुद्धीपुरस्सर रितीची जरूरी होती असें त्याला वाटूं लागलें.

वाचनाचा तो मोठा शोकी होता खरा पण तार्किक, चिकित्सात्मक आणि तत्त्वज्ञानविषयक पुस्तकांखेरीज इतर पुस्तकें तो हातींसुद्धां धरीत नसे.

त्याला वाटलें, इथेंच आपली चूक झाली. कौटुंबिकतेचीं कादंबऱ्यांतील वर्णनें आपल्या वाचनांत आलीं असतीं तर प्रस्तुत विषयाची आपल्याला थोडी फार कल्पना करतां आली असती.

क्लबच्या लायब्ररींतून नरगिज कोणतीं पुस्तकें वाचायला नेते तें पाहायला त्यानें सुरवात केली.

ती बहुतेक कादंबऱ्याच वाचीत होती.

तिनें परत केलेलीं पुस्तकें घेऊन तो वाचूं लागला. गंभीर विषयावरील ग्रंथ वाचायची संवय झाल्यामुळें पहिल्यापहिल्यानें कादंबरी वाचनांत त्याचें मन रमेना. परीक्षेच्या अभ्यासासाठीं जितक्या सक्तीनें एकादें पुस्तक त्यानें वाचलें असतें, तितक्याच हट्टानें तो त्या कादंबऱ्या वाचूं लागला.

हळू हळू त्याला कथावाङ्मयाची गोडी लागूं लागली. कथावाङ्मयावर लिहिले गेलेले चर्चात्मक ग्रंथ चाळून कोणत्या लेखकाच्या कादंबऱ्या वाचाव्या हें तो ठरवूं लागला.

त्यानें नवीन पुस्तकें मागवायला सुरवात केली. अशीं मागवलेलीं पुस्तकें घेऊन तो क्लबांत येऊं लागला.

नरगिजला कादंबरी वाचनाचें वेड होतें. क्लबच्या लायब्ररींत ताजीं प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें बहुधा येत नसत, त्यामुळें अशीं पुस्तकें गोविंदाच्या हातीं पाहून तिची जिज्ञासा जागी झाली.

एके दिवशीं गोविंदाने खालीं ठेवलेलें एक पुस्तक घेऊन तिनें चाळायला सुरवात केली. त्या पुस्तकानें बरीच खळबळ उडवून दिली होती. विलायतेंतील वेगवेगळ्या नियतकालिकांतून त्या पुस्तकावर अनुकूल आणि प्रतिकूल चर्चा प्रसिद्ध केल्या जात होत्या.

त्या चर्चा तिनें वाचल्या होत्या. त्या वाचल्यामुळें तें पुस्तक वाचण्यासाठीं ती आतुर झाली होती. तें पुस्तक मागवणें तिला अशक्य नव्हतें. पण आयतेंच चालून आलेलें पुस्तक पाहातांच नवीन पुस्तक मागवून आणण्याइतकी वाट पहाणें तिला अशक्य झालें.

ती पुस्तक उघडून चाळीत होती तोंच गोविंदा तिथें आला. ती म्हणाली, "मी घेऊं का हें पुस्तक ? दोनच दिवसांत वाचून परत करीन."

पुस्तकांतील खूण दाखवून गोविंदा म्हणाला, " आतां एवढंच वाचायचं राहिलं आहे. एवढं वाचून झाल्यावर देईन. "

न॰गिज फारच आतुर झाली होती.

ती म्हणाली, " दोन दिवस थांबणं शक्य होणार नाहीं का तुम्हांला ? "

गोविंदा हंसला. नरगिज ओशाळल्यासारखी झाली. ती म्हणाली, " माफ करा ! माझा स्वभाव जरा फाजिल उतावीळ आहे. पुस्तकांचं मला वेड आहे. या पुस्तका-बद्दल मी पुष्कळ वाचलं आहे. म्हणून मी तें मागवलं आहे. पण मुंबईच्या बुकसेलरकडे पुस्तक शिल्लक नाहीं. तें येऊन मिळेपर्यंत मी वाट पाहिली असती पण आतां हें हातीं आलं. आतां धीर धरणं शक्य नाहीं मला. उद्यां तुम्हीं वाचून पुरें करीपर्यंत देखील थांबणं मला कठीण जाईल. माफ करा, पण आत्तां हें पुस्तक मला द्याच !"

गोविंदा विचारांत पडला. पुस्तक द्यावें असें एकदां त्याला वाटलें. पण चट्कन् पडतें घेणें त्याच्या स्वभावधर्माला शक्य नव्हतें. तो म्हणाला, " पुस्तक वाचण्याची माझी जी पद्धत आहे तिला अनुसरून हा राहिलेला भाग वाचायला माझी नित्याची कामें सांभाळून मला निदान तीन दिवस तरी लागतील. पण तुमच्यासाठीं आजच्या रात्रीं हें पुस्तक वाचून काढीन आणि उद्यां तुम्हाला देईन. "

" पण दोन दिवस थांबलां म्हणून काय झालं ? " नरगिज़ लाडिकपणानें म्हणाली, " दोनच दिवसांनीं मी वाचून देतें. तसं कशाला—अशीच घाई असली तर सारी दिवसरात्र खर्ची घालून एकच दिवसांत परत देतें. खेळायलासुद्धां येणार नाहीं उद्यां !—"

" मग रिचर्ड्सूचं कसं होणार ? " गोविंदा खंवचटपणानें म्हणाला.

त्याचे हे उद्गार तिला लागले. एक क्षणभरच ओशाळून ती म्हणाली, " त्यांना कांहीं का वाटेना, या पुस्तकापुढं मला कशाचीच—कुणाचीच पर्वा नाहीं ! "

" माझी सुद्धां ? " असें तो बोलून गेला खरा, पण मग दुसऱ्याच क्षणाला त्याला पश्चात्ताप झाला. ती नुसतीच त्याच्याकडे टकमक पाहात राहिली त्याच्या हृदयाची कालवाकालव झाली होती. तो चटकन् उद्गारला, " माफ करा ! "

ठेवून त्याच्याकडून गोविंदाकडच्या बातम्या काढून आणण्याबद्दल जेव्हां त्यानें आपल्या गणू पटेवाल्याला सांगितलें त्यावेळीं तो अभिमानानें फुलून निघाला. आतां साहेब आपल्या मुठींत आले असें गणू पटेवाल्याला निश्चितपणें वाटलें.

संध्याकाळीं क्लबांत गोविंदाची गांठ पडली, त्यावेळीं रतिलालनें त्याला आपली जिज्ञासा कळूं दिली नाहीं. गोविंदाचा चौकसपणाही जरी जागा झाला होता, तरी त्यानेंही आपल्या जिभेला आळा घातला होता. रतिलालशिवाय दुसऱ्या कुणाकडून नरगिजची हकिकत कळण्याचा संभव नव्हता खरा; पण त्याच्याकडे चौकशी करणें सुरक्षित नाहीं, हें गोविंदाला कळत होतें.

त्या दिवशीं नरगिजच्या वर्तनांत कोणत्याही तऱ्हेचा फरक झाल्याचें रतिलालला दिसून आलें नाहीं. उलट त्या दिवशीं रिचर्ड्सशीं जास्त खेळीमेळीनें वागते आहे, असेंच त्याला वाटलें.

प्रत्येकजण आंधळ्या-कोशिंबिरीचा डाव खेळत होता. गोविंदाचें मन अस्वस्थ झालें. आपल्या नित्याच्या वृत्तींत या प्रकारामुळें फरक पडायला सुरवात झाली, असें वाटून तो अस्वस्थ झाला.

संधि साधून तो नरगिजला म्हणाला, ' माझं मन फार अस्वस्थ झालं आहे. एकदां मला निराकरण करून घेतलं पाहिजे. उद्यां पुन्हां याल का माझ्या घरीं ? '

' इतक्या लवकर नको, ' नरगिज म्हणाली, ' प्रत्येकजण माझ्याकडे टपून नजर देऊन बसला आहे. त्याला कारण द्यायला नको-' क्षणभर थांबून ती म्हणाली, ' किंवा असं करा, उद्यां संध्याकाळीं क्लबांत न येतां बाहेर माळावर फिरायला या. टेंकडीवरच्या खडकावर मी तुम्हांला येऊन भेटेन. ती जागा अगदीं निवांत आहे. फारसं कुणी फिरायला जात नाहीं त्या बाजूला. '

ती वेळ येईपर्यंत मनाची तळमळ गोविंदाला अनावर झाली होती. त्याचें कुठेंच लक्ष लागत नव्हतें. दुसऱ्या दिवशीं ही गोष्ट मोघे शिरस्तेदारांच्याही ध्यानीं आली आणि त्यांनीं बरेंच तिखट-मीठ लावून पत्रद्वारें ती हकिकत अण्णासाहेबांना कळविली.

---

दुसऱ्याच्या दृष्टीनें न पाहतां स्वतःच्या दृष्टीनें हिंदी राजकारणाचा अभ्यास करण्याचा त्यानें निश्चय केला.

पण त्यापूर्वी नरगिजचा इतिहास कळण्याची जिज्ञासा त्याला अनावर झाली होती.

त्यादिवशीं ऑफिसांत त्याचें लक्ष कामाकडे लागेना. ती गोष्ट शिरस्तेदारांच्यासुद्धां ध्यानीं आली. महादू पटेवाल्याला जेव्हां त्यानें विचारलें, तेव्हां नरगिज बंगल्यावर येऊन कड्या-कुलपें लावून बोलणें चाललें होतें, असें त्यानें शिरस्तेदारांना सांगितलें. वरिष्ठपणाचा दर्जा क्षणभर विसरून शिरस्तेदार महादूशीं जास्त जिव्हाळ्यानें या प्रकरणाचा जास्त तपास करूं लागले. गोविंदाच्या वडिलांचा आणि त्यांचा लोभाचा संबंध होता. त्यामुळें वडिलकीच्या नात्यानें ते गोविंदाकडे पहात होते. ती वडिलकी त्यांनीं कधीं गाजविली नव्हती.

पण एका पारशी पोरीशीं गोविंदा लगट करतो आहे असें पाहून त्यांचा जीव कासावीस झाला. अण्णासाहेबांचा मुलगा जगांतून उठला तर जातीची माती होईल म्हणून त्यांचें मन अस्वस्थ झालें.

महादू पटेवाल्याकडून त्यांना फारशी हकिकत कळली नाहीं. पण पुस्तकांच्या गठ्ठ्यांची हकिकत त्यांना संशयास्पद वाटली.

नरगिजबद्दल जिकडे तिकडे भलभलत्या कंड्या पिकलेल्या होत्या त्यांचा मोघे शिरस्तेदारांवर मोठा परिणाम झाला होता. म्हणूनच त्यांना गोविंदाबद्दल काळजी वाटली.

एका पटेवाल्यानें दुसऱ्या साहेबाच्या पटेवाल्याशीं आपल्या साहेबाबद्दलच्या कुचाळ्या, कागाळ्या किंवा तक्रारी सांगणें, हा नित्याचाच व्यवहार होता. त्याला अनुसरून महादू पटेवाल्यानें गणू पटेवाल्याला ही खबर दिली आणि संधि साधून गणू पटेवाल्यानें ही हकिकत हळूच आपल्या साहेबांच्या-रतिलालच्या कानांत सांगितली.

त्याचक्षणीं रतिलालच्या डोक्यांत प्रकाश पडला. आदल्या दिवशींच्या साऱ्या प्रकरणाचा एकदम उलगडा झाला, असें त्याला वाटलें. महादू पटेवाल्याशीं संधान

हेलकावे खात आहे. एवढ्यासाठींच मला हें बाहेरचं पांघरूण घ्यावं लागतं आहे—या सरकारी वातावरणांत माझं अंतःकरण कुणाला कळूं नये, म्हणून दुटप्पी धोरण मला ठेवावं लागतं—म्हणूनच रतिलालसारखीं क्षुद्र मनाचीं माणसं मला नांवं ठेवतात. मला त्याची पर्वा वाटत नाहीं. मी वागत्येंच आहे तशी ! माझ्या बचावासाठीं मला तसं वागावं लागतंय्. पण त्यामुळं तुम्ही गैरसमज करून घेऊं नका—' अगदीं काकुळतवाणीनें ती म्हणाली, ' तुमचा गैरसमज झाला तर मला मरणप्राय दुःख होईल.'

गोविंदानें तिला अडखळत अडखळत 'हो'कारार्थी उत्तर दिलें. पण आपण काय बोललों हें त्याचें त्यालाच कळलें नाहीं.

आणलेलीं पुस्तकें कोणत्या अनुक्रमानें वाचावीं, हें ती त्याला सांगत होती. पुन्हां तिनें विचारलें तेव्हां त्याला तो अनुक्रम सांगतां येईना–त्याचें लक्षच नव्हतें तिच्या बोलण्याकडे–म्हणून तिनें एक कागद घेऊन त्यावर तो अनुक्रम लिहून दिला.

गोविंदाचें मन दुश्चित्त झालें. तिच्या स्वभावाची त्याला अटकळ येईना. तो एकमार्गी माणूस होता. कुणाशींच त्याचा संबंध आला नव्हता. सरकारी कामापलिकडे इतर कोणत्याच बाबतींत त्यानें आजवर मन घातलें नव्हतें.

नरगिज निघून गेल्यावर तो आपल्याशींच विचार करून पाहूं लागला. त्याला असा प्रश्न पडला, तिच्यापायीं जीव देणाऱ्या प्रत्येक तरुणाशीं ती असेंच बोलली असेल का ? जीव देणाऱ्या प्रत्येक तरुणाची हकिकत आपल्याला कळेल, तर बरें होईल, असें त्याला वाटलें.

तो अनुभवी नव्हता—तसा कच्च्या दिलाचाही नव्हता. जगाच्या व्यवहाराला जरूर असलेलीं मतें जरी त्यानें ठरवलीं नव्हतीं, तरीही निश्चित मतें ठरविण्याच्या बाबतींत त्याचें मन दुबळें नव्हतें.

राजकारणापासून दूर राहण्याची वृत्ति साऱ्याच सरकारी अधिकाऱ्यांत होती. कधीं कुणाच्या तोंडून राजकारणाचा उल्लेख झाला तर तो परक्या देशापुरता. हिंदुस्थानच्या राजकारणाच्या बाबतींत कुणीच कांहीं बोलत नसत. कधीं कुणी बोललेंच तर नांवाजलेल्या पुढाऱ्यांच्या नांवानें हेटाळणी करीत.

बद्दल. तुमच्यामागं सारे ऑफिसर तुमची निंदा करतात त्याचा परिणाम झाला होता माझ्या मनावर. आतां कुठं मला तुमची खरी वृत्ति कळायला सुरवात झाली आहे.' तसाच त्याचा हात ओढून ती अगदीं त्याच्याजवळ गेली आणि म्हणाली, 'कुणालासुद्धां कळूं देतां नये. क्लबांत अगदीं पूर्वीच्यासारखंच वागलं पाहिजे आपल्याला. मोठा दुष्ट माणूस आहे तो रतिलाल. म्हाताऱ्या बाईसारखी वृत्ति आहे त्याची. नसत्या कुचाळ्या कार्ढीत असतो! त्याच्याकडे कांहींसुद्धां बोलूं नका. मला वाटेल तेव्हां मी इथं येऊन बोलेन—पण तिथं पूर्वीच्यासारखंच तुटकपणानं वागत जा—'

'खरं आहे तें!' गोविंदा एकदम म्हणाला, 'फार निंदा करतो तो तुमची—' रतिलालचे सारे उद्गार तिला एकदम सांगून टाकावे, असें त्याला वाटलें होतें. पण त्यानें जिभेला आळा घातला.

'मला माहीत आहे तें.' नरगिज म्हणाली, 'तो मला उनाड म्हणत असेल—दुष्ट म्हणत असेल, माझ्यापायीं कित्येकांनीं जीव दिले, असंही तो सांगत असेल! तसं पाहिलं तर तें खरंही आहे. माझ्या वृत्तीबद्दल भलताच समज करून घेऊन पुढं निराश झाल्यामुळं एक दोघांनीं आत्महत्त्या केली. हेंही खरंच आहे. पण त्याला मी तरी काय करूं? माझं मन मला पाहिलं पाहिजे ना? माझ्या कांहीं आवडीनिवडी आहेत—मला कांहीं मतंही आहेत—अजून तीं निश्चित झालीं नाहींत खरीं, तरीही त्या मतांबद्दल माझा मोठा हेका आहे. लहानपणापासून या सरकारी वातावरणांत मी वाढलें. सारेच माझं कौतुक करीत, त्याचाच मला तिटकारा येऊं लागला. त्यामुळंच माझी वृत्ति स्वतंत्र बनली. या वातावरणाच्या बाहेर मी बारकाईच्या नजरेनं पाहूं लागल्यें, तेव्हां मला कळून आलं, कीं इतकं कोंदट वातावरण दुसऱ्या कुठंही नाहीं. मुंबईला मला बोर्डिंगांत नेऊन ठेवलं, तेवढंच मला स्वातंत्र्य मिळालं. तिथं मी स्वतःची घडण घडवूं लागल्यें—जुन्या पिढीच्या संस्कारांनीं माझ्यावर मात करूं नये, याची खबरदारी घेऊं लागल्यें—' एक मोठा उसासा सोडून ती म्हणाली, 'अजूनही माझ्या आयुष्याला निश्चित वळण लागलं नाहीं. अजूनही माझं मन

झाला नाहीं. अन् आमच्या बाबासारखीं जुन्या काळचीं माणसं फार तर चार्लस् ब्रॅडलॉला मोठा माणूस समजण्यापलिकडे फारशीं पुढं गेलेलीं नाहींत. त्यानंतर जगांत काय चाललेलं आहे, तें कळून घ्यायचा त्यांनीं प्रयत्न केलेला नाहीं. या लढाईमुळं या नव्या नव्या तत्त्वज्ञानावर आतां प्रकाश पडूं लागला आहे. पण हा नवा प्रकाश जुन्या माणसांच्या डोळ्यांवर झांपड आणतो. केरेन्स्कीनं राज्यक्रांति केली तोंपर्यंत सर्वांना पटत होतं. पुढं तो लेनिन आला तेव्हांपासून ही जुनी पिढी या नव्या तत्त्वज्ञानावर चिडून गेली आहे. ते त्याला बोल्शेव्हिझम् म्हणतात. रशियांतला पूर्वीचा निहिलिझम् अन् आतांचा हा बोल्शेव्हिझम् या दोहोंत त्यांना भेद वाटत नाहीं'.

'म्हणजे, त्यांत भेद आहे का?'

नरगिज हंसली. ती म्हणाली, 'अगदींच एकमार्गी दिसतां तुम्हीं! बाकी तुमचाही कांहीं दोष नाहीं. हा मार्गच वेगळा आहे. सरकारी माणसाला याची जाणीव असायची कांहीं जरूरी नाहीं, हेंही तेवढंच खरं आहे. तुम्ही पुस्तकं वाचून पहा—कुणाला दाखवूं नका-कृतींत आणायची गोष्ट दूरच राहो. पण इथं बंगल्यांत-सुद्धां ही पुस्तकं बाहेर ठेऊं नका—अगदीं हलु बोलण्यासाठीं ती त्याच्या कानाजवळ डोकावली होती. तिचा उष्ण श्वास त्याच्या गालाला आनंदाचे चटके देत होता. त्याच्या मनाची कालवाकालव सुरू झाली होती.

चटकन् त्यानें तिच्याकडे वळून पाहिलें, तेव्हां तिचें भाषण एकदम थांबलें.

उभयतांची नजरानजर झाली. नरगिजनें एवढें मधुर हास्य केलें, कीं तें पहातांच गोविंदाच्या काळजाचें पाणी झालें.

त्याची जीभ लुली पडली होती. कांहीतरी बोलावें म्हणून तो प्रयत्न करीत होता. पण तोंडांतून शब्द फुटत नव्हता. नरगिजचें भाषण त्यानें पुरतेसें ऐकलेंसुद्धां नव्हतें, त्यामुळें काय बोलावें हेंच त्याला ठरवितां येत नव्हतें.

हातचा पेला खालीं ठेवून नरगिजनें त्याचा हात आपल्या हातीं धरला. त्याच्या डोळ्याला डोळा देऊन ती म्हणाली, 'मि. सप्रे, फार गैरसमज होता माझा तुमच्या-

गेल्याचें त्यानें पाहिलें त्यावेळीं तो जरा घाबरला—पण ती नुसती गाडीच होती.- आंत रतिलाल नव्हता.

थोड्या वेळांत नरगिजची गाडी येऊन बंगल्याच्या दाराशीं थांबली, तो धांवतच तिचें स्वागत करण्यासाठीं पुढें सरसावला. भला मोठ्ठा पुस्तकांचा गठ्ठा घेऊन ती गाडींतून खालीं उतरली. तो गठ्ठा घेण्यासाठीं पटेवाला पुढें आला तेव्हां त्याला दूर सारून गोविंदानें स्वतःच तो गठ्ठा आपल्या हातीं घेतला.

दोघेही गच्चीवर गेले. या गच्चीवर गोविंदानें एक लहानशी राहुटी उभारली होती. त्या राहुटींत चहाची सर्व तयारी केली होती. ते दोघे जाऊन बसतांच गोविंदानें बटलरला घालवून दिलें.

चहाची तयारी करायला गोविंदानें जेव्हां स्वतः तयारी केली तेव्हां नरगिज म्हणाली, ‘ हें माझं काम आहे. आपलं नव्हे. गृहिणींचीं कामं असतात हीं ! ’

त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. ‘ गृहिणी ’ शब्दाचा तिनें उच्चार कां करावा ?

त्याची मनस्थिती अशी झाली होती तरीही पुस्तकें पहाण्याची त्याची उत्कंठाही तितकीच वाढली होती. गठ्ठा सोडून तो एकेका पुस्तकाच्या लेखकाचें नांव पाहूं लागला. मार्क्स, एन्जल्स् यांचे ग्रंथ जसे होते तसेच त्यांच्याविषयीं लिहिलेले ग्रंथही होतेच. सुमारें सोळा सतरा पुस्तकें होतीं. त्या पुस्तकांचीं किंवा त्यांच्या लेखकांचीं नांवें त्यानें कधींच ऐकिलीं नव्हतीं.

प्रत्येक पुस्तकावर नरगिजचें नांव पाहून तो आश्चर्यचकित झाला. त्यानें हळुच विचारलें, ‘ हीं सारीं तुमचींच पुस्तकं ? ’

‘ अर्थात् ! ’ नरगिज चहाच्या पेल्यांत दूध ओतीत ओतीत म्हणाली, ‘ पण कुणाच्या नजरेला पडतां नयेत तीं. बाबा पोशाख करीत होते अशी संधि साधून मोठ्या शिताफीनं मला तिथून पाय काढावा लागला. ’

‘ कां बरं ? असं काय आहे विशेष या पुस्तकांत ? ’

चहाला सुरवात झाली. पण गोविंदाचें लक्ष टेबलावरच्या जिनसांची रुचि घेण्याकडे नव्हतें. नरगिज बोलत होती, ‘ अजून या पुस्तकांचा इकडे फारसा प्रसार

## प्रकरण ४ थें

तो दिवस जेव्हां उजाडला, तेव्हां गोविंदाला जग हंसत आहे असें वाटूं लागलें.

त्याची मनस्थिती इतकी विलक्षण झाली होती, त्या दिवशीं त्यानें ज्या प्रकारच्या घटना घडतील, अशी जी अपेक्षा केली होती तिला अनुसरून त्याचें मन इतकें उतावीळ झालें होतें, कीं त्याची ती वृत्ति बटलरच्यासुद्धां ध्यानीं आल्यावांचून राहिली नाहीं.

'कोण येणार आहे ?' बटलरनें अदबीनें विचारलें.

'तुला काय करायचंय् त्याच्याशीं ?' गोविंदा म्हणाला, 'तूं नुसती व्यवस्था पहा.'

तो आपल्याशींच हंसत होता. बटलरनें पटेवाल्याला डोळा घातला. पटेवाल्यानेंही बटलरकडे पाहून डोळे मिचकावले. त्याला थोडीशी कल्पना होती.

दररोज सारे कारभार अव्यवस्थितपणें करणारे साहेब आज प्रत्येक बाबतींत अगदीं कांटेकोरपणानें स्वतः काळजी घेत आहेत असें पाहून बटलर आश्चर्यचकित झाला. त्याला एवढेंच समाधान होतें, कीं साहेब रागावले नव्हते.

पुनः पुन्हा खिडकीकडे जाऊन गोविंदा पहात होता. किती वाजतां यायचें तें नरगिजनें सांगितलें नव्हतें. मधेंच एकदां रस्त्यावरून रतिलाल देसाईची गाडी

कांहीं उत्तर न देतां नरगिज नुसती हंसली. तितक्यांत रिचर्ड्स् आला; आणि तिघांच्याही इतर विषयावर गप्पा सुरू झाल्या. रतिलालला दिसून आलें, कीं नरगिज रिचर्ड्स् बोलतांना मुद्दाम त्याचा पाणउतारा करण्याचा प्रयत्न करीत होती.

रतिलालच्या चौकस स्वभावाला उकळी आली. खेळ संपतांच तो गोविंदाच्या बंगल्यावर गेला. गोविंदा व्हरांड्यांत येरझारा घालीत होता. रतिलाल आलेला पहातांच त्याला आश्चर्य वाटलें.

"काय झालं?" रतिलाल म्हणाला "एकदम निघून कां आलास? भांडली वाटतं नरगिज?"

"छेः! छेः! मुळींच नाहीं." गोविंदा म्हणाला, "डोकं दुखत होतं माझं म्हणून बंगल्यावर परत आलों." त्याचें त्यालाच आश्चर्य वाटत होतें, कीं बेछूट खोटें बोलण्याची प्रवृत्ति आपल्याला कशी झाली?

लोंचटपणानें रतिलालनें तिथेंच बैठक मारली. क्लबांत चाललेल्या गोष्टीची तो पुनरावृत्ति करीत होता. नरगिज खंवचट बोलून रिच-र्ड्स्‌चा कसा फजिता करीत होती तें सांगून तो म्हणाला, "मोठी विलक्षण आहे ती पोर. कांहींच अंत लागत नाहीं - तिचा. इतक्या दिवस आज पहिल्यानं माझ्या जोडीला खेळायला आली. अगदीं मोठी खुषींत दिसत होती—"

रतिलाल सारखा बडबडत होता आणि त्याच्या भाषणाच्या अनुरोधानें गोविंदाच्या डोक्यांत प्रश्नांचें काहूर माजत होतें.

रतिलाल निघून गेला. पण त्याचे विचार थांबले नाहींत. आपल्याला आज काय झालें हेंच त्याला कळत नव्हतें. नरगिज आज खुषींत होती हें ऐकून त्याला थोडा आनंदच झाला. तो स्वतःही खुषींतच होता. नरगिज आणि आपण उद्यां सकाळीं एकटेच आपल्या बंगल्यात बसणार आणि बोलणार, ही कल्पना येतांच त्याच्या अंगावर रोमांच येत होते. असें कां व्हावें हें त्याला कळत नव्हतें.

दुसऱ्या दिवशींच्या चहाची तयारी अगदीं झोकांत करण्याबद्दल त्यानें बटलरला हुकूम सोडला.

---

" अशीं चव्हाट्यावर बसून वाचत नसाल तर देईन. आमच्या बाबांना देखील दिसतां कामा नयेत तीं. त्यांना नाहीं आवडत तसलं कांहीं. शिपायाबरोबर पाठवून देणं देखील धोक्याचं आहे. मीच उद्यां सकाळीं घेऊन येईन."

गोविंदाचें काळिज धडधडूं लागलें. मनाचा हिय्या करून तो म्हणाला, " मग चहालाच या ना."

तिनें कबूल केलें.

फेबियन एस्सेजचें पुस्तक लायब्रीयनच्या अंगावर फेकून तो तडक घरीं जायला निघाला. रतिलाल टेनीस खेळत होता. त्यानें त्याला जातांना पाहिलें. तसाच दुरून त्याला राम राम ठोकून गोविंदा निघून गेला. आश्चर्यचकित होऊन रतिलाल नुसता पहात राहिला होता. तोंच नरगिज कोर्टवर आली आणि खेळूं लागली.

ती रतिलालबरोबर केव्हांच खेळत नसे. आज तिनें आपला नियम मोडलेला पाहून रतिलालही आश्चर्यचकित झाला. त्याला दिसून आलें, कीं ती मोठ्या खुषींत येऊन खेळत होती. तिच्या वृत्तींत पडलेला हा फरक आणि गोविंदाचें निघून जाणें या दोन गोष्टींचा मेळ घालून तो पाहूं लागला. त्याला उलगडा होईना.

मधें विश्रांतीच्या वेळीं त्यानें नरगिजला विचारलें, " मि. सप्रे कुठं गेले एवढ्या घाईनं ?"

" तें मला काय माहित ?" नरगिज खंवचटपणें म्हणाली, " मी कांहीं त्यांना माझ्या खिशांतून बाळगीत नाहीं–मला कां विचारलांत हा प्रश्न ?"

" तसं नव्हे," रतिलाल ओशाळून म्हणाला, " ते तुमच्याबरोबर बोलत होते असं मला वाटलं अन् लगेच निघून गेले म्हणून विचारलं. भांडणबिंडण झालं कीं काय ?"

" भांडण कसलं व्हायचं ?" नरगिज गोड हंसून म्हणाली, " भांडण व्हायला आधीं दोस्ती हवी ना ?"

" क्लबांत सारेच कुठं दोस्त असतात ? पण क्लबच्या मेंबरचीं भांडणं होतात ना आपसांत ? तसंच कांहीं झालं असेल म्हणून मी विचारलं."

गोविंदानें नवीन पुस्तक आणलें म्हणजे त्याच्यावर उडी घालणारी नरगिज फेबियन एस्सेजच्या बाबतींत मुळींच कशी विचारीत नाहीं याचें गोविंदाला आश्चर्य वाटलें.

त्या दिवशीं त्यानें निश्चय केला होता. नरगिज आली तरी फेबियन एस्सेज वाचीत बसायचें—अगदीं गढून गेल्यासारखें दाखवायचें. त्याचें त्यालाच आश्चर्य वाटलें, असें ढोंग करण्याची वृत्ति आपल्या ठिकाणीं कशी उत्पन्न झाली ?

त्याचें मन त्याला खात होतें तरीही त्या मनाशीं झगडत तो आपला निश्चय पार पाडीत होता. नरगिज आली, प्रश्न करूं लागली. तरीही त्यानें उत्तर दिलें नाहीं.

लडिवाळपणानें तिनें पुस्तक त्याच्या हातून काढून घेतलें. पुस्तक डाव्या हातानें मागें धरून ठेवून ती आपल्या हातानें त्याचें तोंड आपल्याकडे वळवून घेत म्हणाली, " या जुन्या काळच्या जुन्या पुस्तकांत एवढे कसले गढून गेलांत ? "

" मला नवंच आहे तें ! "

" हें नवं ? आतां काय म्हणावं तुम्हांला ? आतां सोशालिझम देखील जुना होऊं पहात आहे. मार्क्सचा नवा सोशालिझम आतां नव्या पिढीला विचार करायला भाग पाडतो आहे. "

" कोण हा मार्क्स ? "

नरगिजला हंसूं येत होतें. पण तें आवरून ती गंभीरपणें म्हणाली, " तो एक जर्मन होता. त्यानं समाजवादाचीं कांहीं नवीन तत्त्वं प्रस्थापित केलीं आहेत. युरोपांत त्याचे जे अनुयायी आहेत ते जुन्या सोशालिझमला मानीत नाहींत—"

" असं ? " गोविंद खरोखरच आश्चर्यचकित होऊन म्हणाला.

" साहाजिक आहे " नरगिज म्हणाली, " मार्क्सचं तत्त्वज्ञान आय्. सी. एस्. माणसाला माहित असणं शक्य नाहीं. तें कांहीं तुमच्या अभ्यासक्रमांत येत नाहीं. " थोडावेळ थांबून त्याच्याकडे रोखून पहात ती म्हणाली, " तुम्हांला वाचायचीं आहेत तीं पुस्तकं ? "

" आहेत तुमच्याकडे ? "

होती. असा हा माणूस काकुळतीनें आपल्याकडे सल्ला मागूं लागला आहे असें पाहून रतिलालचें हृदय अभिमानानें फुलून गेलें.

रतिलाल म्हणाला, " असं पहा मि. सप्रे, हा मोठा बिकट विषय आहे. मी याचा फार चांगला अभ्यास केला आहे. तसा अभ्यास करणं मला भागच पडलं. उगीच नाकबूल कशाला करूं ? पण बायकांच्या नजरेंत भरण्याइतका मी देखणा नाहीं, नव्हें कुरूप आहे याची मला जाणीव आहे. आणि ही जाणीव मला आहे म्हणूनच त्या उणीवेची भरपाई करणं मला भाग पडलं. म्हणूनच मला आज जरूर नसलेल्या कितीतरी विषयांचा अभ्यास करावा लागला. तसं पाहिलं तर राजकारणाशीं आम्हां लोकांचा कांहीं संबंध नाहीं. केव्हां एकादी राजद्रोहाची केस आली तरच राजकारण नांवाचा एक विषय आहे याची जाणीव आम्हांला होते. पण ही माझी उणीव भरून काढण्यासाठीं म्हणूनच मला राजकारणाचा अभ्यास करावा लागला. हल्लीं असं आहे, कांहीं समजो वा न समजो, खरी तळमळ असो वा नसो, कॉलेजांतील विद्यार्थी राजकारणाची चर्चा करणं म्हणजे मोठं कौतुकाचं समजतात. तुझ्यावेळीं तशी स्थिति नव्हती. गेल्या चार–दोन वर्षांतच ती परिस्थिति पालटली आहे. तेव्हां एकदां राजकारणाला हात घालून पहा. विशेषतः सोशालिझमूबद्दल कांहींतरी बोलायचा प्रयत्न कर बर्नार्ड शॉचे फेबिअन एस्येज एकदां नजरेखालून घालून पाहिलेस तर तुला या विषयाचा उपक्रम करतां येईल. तेवढंच एक पुस्तक आहे या लायब्ररींत—"

गोविंदाला किल्ली मिळाली. फेबियन एस्येज त्यानें त्याच रात्रीं वाचून काढले.

पुस्तकांच्या याद्या चाळून त्यानें सोशालिझमवरचीं पुस्तकें मागविलीं. अधिकृत ग्रंथकार कोणता याची त्याला मुळींच कल्पना नव्हती. त्यानें जुनीं मासिकें चाळून पुस्तकपरीक्षणावरून कांहीं अधिकृत ग्रंथकारांचीं नांवें निवडलीं आणि त्यांचींही पुस्तकें मागविलीं.

रोज फेबियन एसूयेज हातीं घेऊन तो क्लबांत येत असे. नरगिज त्याची कसोटी पहात होती. ती फारशी कांहीं विचारीत नसे. जें कांहीं त्यांचें भाषण होई तें कादंबऱ्यांतील कथानकांवर.

नाटकासारखे हे प्रवेशच तुला लिहून दिले पाहिजेत मला. अशा आहेत या पोरी—ज्याला कळतं त्याला वळत नाहीं. अन् पिच्छा पुरवतात भलत्याच माणसाचा—आणि आतां तुला या विषयांत डोकं घालावंसं वाटूं लागतं आहे ''—गोविंदाची गृहस्थिति रतिलालला माहित होती, इतकेंच नव्हे, तर त्याच्या जन्माच्या बाबतींत असलेला अपवादही त्याला माहित होता. तो म्हणाला, '' मला वाटतं, या नरगिजला तुझी हकिकत कळली आहे. माणसाच्या आयुष्यांत एकादं रहस्य असतं म्हणजेच तो या अलिकडच्या सुशिक्षित पोरींना आकर्षक वाटतो ! तूं असं समजूं नकोस, कीं उद्यां ही तुझ्या गळीं पडेल—ही तुझ्याशीं लग्न करील ! ही पारशांची जात एरव्हीं कितीही अँग्लीसाईज झालेली दिसते. पण आम्हां हिंदुंतल्या कर्मठ ब्राह्मणांपेक्षांही हे पारशी जास्त सनातनी असतात. समजा, उद्यां हिचं तुझं जमलं, तरी देखील तुम्हां उभयतांचं लग्न होणं फार कठीण जाईल. तो डॉक्टर बडा सनातनी आहे. अन् त्याची बायको तर कर्मठाहून कर्मठ आहे—''

रतिलालचें भाषण ऐकत असतां गोविंदाच्या अंतःकरणांत आनंदाच्या उकळ्या येत होत्या. आईचें भाषण त्याला आठवत होतें. अशीच कांहींतरी परिस्थिति निर्माण झालेली त्याच्या आईला पाहिजे होती.

रतिलाल सारखा बोलत होता, नरगिजच्या आईबापांची सारी कूळकथा त्यांना सांगत होता. त्यावेळीं त्याचें डोकें तिसरीकडेच भ्रमण करीत होतें.

तो म्हणाला, '' असं पहा रतिलाल, कोणता विषय काढावा याचा मी मघांपासून विचार करतों आहें. कादंबऱ्यांच्या बाबतींत तिचीं माझीं मतं सारखींच आहेत. आणि खरोखरच मतांच्या बाबतींत विरोध असल्याशिवाय वकिली आव आणून मला कांहीं भांडतां यायचं नाहीं—''

रतिलाल त्याच्याकडे पहात मिस्किलपणानें हंसला होता—हंसत हंसत त्याच्याकडे पहात राहिला होता. तें पाहून गोविंदा अगदीं ओशाळल्यासारखा झाला होता. एक अधिकारी या नात्यानें रतिलालशीं तुलना करतां त्याची प्रख्याती फार मोठी

ज्या कळकळीनें त्यानें रतिलालला हा प्रश्न केला तिचा रतिलालच्या मनावर परिणाम झाला. त्यानें त्याची थट्टा केली नाहीं. रतिलाल म्हणाला, " तूं अगदींच बावळा आहेस. एवढीं वर्षे विलायतेला राहून आलास, पण तिथं एकसुद्धां ल्व्ह–अफेअर केलं नाहींस. एवढीसुद्धां तुझी तिकडे बोलबाला झाली नाहीं—पण आतां तूं माणसांत येणार असं वाटतं आहे. कसं का असेना, पण हा प्रश्न विचारायची तुला जरुरी भासली हें कांहीं थोडं नाहीं. आतां मी तुला सांगतों, मुंबईत या पोरीची कीर्ति फार मोठी आहे—म्हणजे ती दुराचारी आहे असं नव्हे—तशी ती मोठी चांगली आहे. पण तिला तरुणांना खेळवून मारायची मोठी वाईट संवय आहे. आतांपर्यंत तिच्यापायीं तिघांनीं आत्महत्त्या केली पण तिला त्याचं कांहीं वाटत नाहीं–तूं एकदां विचारून पहा तिला. मी पहातों आहे, तुझ्या-कडून कांहींतरी बोलण्याची सुरवात व्हावी अशी तिची अपेक्षा आहे. पण ती जवळ येऊन बसली तर तूं नुसता बावळटासारखा पहात बसतोस–कशाला वाचतोस तीं एवढीं पुस्तकं ? कांहींतरी बोललं पाहिजे–कांहींतरी चर्चा केली पाहिजे. मतभेद उत्पन्न झाले पाहिजेत. ही एक मोठी गंमत आहे–या सुशि-क्षित पोरींना–विशेषतः या अँग्लीसाईज पोरींना सहज आहारीं जाणारा माणूस आवडत नाहीं. कांहींतरी विषय काढले पाहिजेत. त्यांच्यावर चर्चा केली पाहिजे. त्या चर्चेत पहिल्यांदा दोघांचा मतभेद झाला पाहिजे. मग त्या मत-भेदावर दोघांनीं मोठ्या जोरजोरानं भांडलं पाहिजे. आणि त्या भांडणाचा शेवट कुणीतरी एकानं पड खाऊन दोघांचीं मतं जुळण्यांत झाला पाहिजे. प्रश्न आहे तो एवढाच, कीं पड कुणी खायची ? कित्येकींना वाटतं, पुरुषांनीं आपल्यापुढं वांकावं, तर कित्येकांना दुराग्रही माणूसच आवडतो. तें कल पाहून आपण ठरविलं पाहिजे. हें काम मोठं बिकट आहे.—"

" असं का ? " गोविंदा विचार करीत करीत म्हणाला, " पण वादविवाद होण्याजोगा कोणता विषय तिला आवडतो याची तुला कांहीं कल्पना आहे का ? "

आपल्या बारीक मिशीला टोंक काढीत रतिलाल म्हणाला, " मला वाटतं,

## प्रकरण ३ रें

दुसऱ्या दिवसापासून सारेंच वातावरण बदललें.

नरगिज सारखी गोविंदाभोंवतीं घोटाळूं लागली. रिचर्डस् आश्चर्यचकित झाला. रतिलाल गोविंदाची सारखी थट्टा करूं लागला.

गोविंदालाही आश्चर्य वाटलें, असें कां व्हावें ? कुणाला विचारल्याशिवाय त्याला या प्रश्नाचा उलगडा करतां आला नसता. पण विचारायचें कुणाला ? रमाबाई असती तर संकोच सोडून त्यानें तिला विचारलें असतें. तिनें त्याला तशी सवलतच मुळीं दिली होती.

त्याला रमाबाईचें बोलणें आठवलें. असेंच कांहींतरी व्हावें अशी तिची इच्छा होती.

एकदां त्याला वाटलें, कीं आईला पत्र लिहावें आणि विचारून घ्यावें. त्यानें पत्र लिहायलासुद्धां घेतलें. पण तें पत्र लिहिणें त्याला अशक्य झालें. आईला हें असें कसें लिहायचें ? आणि लिहायचें तरी काय ? कशाला कांहीं ठिकाण नव्हतें.

त्यानें पोक्त विचार केला आणि रतिलालला विचारायचें ठरविलें. रतिलाल आपली थट्टा करील हें त्याला माहित होतें. तरीही त्यानें मनाचा हिय्या केला.

क्षणांत आजवर केव्हांही न डगमगतां याच वेळीं हा दुबळेपणा आपल्या ठिकाणीं कां उत्पन्न झाला ?

तो जें पुस्तक वाचीत होता त्यांत बरेच प्रेमविषयक प्रश्न होते. प्रेमभावनेच्या नव्या दृष्टीची चिकित्सा करण्यासाठींच त्या लेखकानें तें पुस्तक लिहिलें होतें.

हल्लीं कादंबऱ्या वाचायचा त्यानें जो सपाटा चालविला होता त्यामुळेंच हा दुबळेपणा आपल्या ठायीं उत्पन्न झाला, असें त्याला वाटूं लागलें. मनुष्यस्वभावांतील करारीपणाचा जोर प्रेमाच्या जाणीवेनें लंगडा पडतो का ?

असें हें प्रेम म्हणजे आहे तरी काय ?

ती सारी रात्र त्यानें याच विचारांत घालविली. प्रत्येक कादंबरींतील कथा तो आठवून ती पडताळूं लागला, तेव्हां त्याला असें दिसून आलें, कीं प्रेमाशिवाय जगांत महत्त्वाचा दुसरा विषय नाहीं, असाच साऱ्या लेखकांचा कटाक्ष असावा !

विचार करतां करतांच त्याला झोंप लागली. त्या झोंपेंतसुद्धां त्याला वाचलेल्या कादंबऱ्यांतील कथांशीं आपला कांहींना कांहींतरी संबंध आहे असें दिसून येत होतें आणि त्याबरोबरच त्या प्रत्येक कथेची नायिका नरगिज आहे, असेंच त्या स्वप्नांत त्याला दिसत होतें.

---

"मग, घेऊं का हें पुस्तक मी?" नरगिज लडिवाळपणानें अगदीं त्याला बिलगून म्हणाली.

त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला. क्षणभर तो बेभान झाला आणि चट्कन् 'होय' म्हणून गेला.

पुस्तक घेऊन नरगिज त्याच पावलीं परत गेली, तरीही तो तसाच तटस्थ उभा राहिला होता. रतिलाल त्याच्याजवळ येऊन म्हणाला, "कसलीं खलबतं चाललीं होतीं त्या टिटवीबरोबर? सावध हं मि. सप्रे! मोठी खट्याळ आहे ती मुलगी! त्या रिचर्ड्स्भोंवतीं कशी पिंगा घालीत असते पाहिलं आहे ना? गोरा आहे ना तो? आम्ही साहेब झालों तरी नुसते नांवाचेच—जातीचे साहेब नव्हे ना आम्हीं! आम्ही तिच्या खिजगणतींत नाहीं. सांभाळा हं!"

"माझं पुस्तक घेऊन गेली ती!" गोविंदा केंविलवाणीनें म्हणाला.

त्याचे उद्गार ऐकून रतिलाल हंसत सुटला. तो म्हणाला, "इतके रडकुंडीला कां आलांत? पुस्तक देत नाहीं म्हणून कां सांगितलं नाहींत?"

"तिनं फारच आग्रह धरला." गोविंदा म्हणाला, "फार वेड आहे तिला पुस्तकांचं. मग माझ्यानं नाहीं म्हणवेना. खरं सांगायचं म्हणजे तिनं माझ्या संमतीची वाटसुद्धां पाहिली नाहीं."

"सावध! मि. सप्रे सावध!" असें म्हणून रतिलाल हंसत हंसत निघून गेला.

गोविंदा अगदीं शरमिंदा झाला होता. आधीं त्याचें त्यालाच तें पटलें नव्हतें. त्यांतून आपला दुबळेपणा रतिलालच्या नजरेला आल्यामुळें तो अधिकच गांगरून गेला.

त्याला वाटलें, आपल्याला कुठेंतरी धक्का बसला आहे. नित्याची वृत्ति आपल्याला कायम ठेवतां आली नाहीं.

त्याला वाटलें, आपण कां अशी चूक केली? आयुष्यांतला कोणत्याही बिकट

## प्रकरण ५ वें.

माळावरच्या खडकावर बसून त्यांचें बोलणें सुरू झालें. गोविंदा पुन्हा पुन्हा मागें वळून पहात होता. कुणीतरी येईल आणि पाहील, अशी त्याला शंका वाटत होती.

ती जागा निवांत होती. उघड्या माळावर असलेला तो मोठा खडक निसर्गतःच असा घडला गेला होता, कीं बैठकीसारख्याच दिसणाऱ्या त्याच्या भागावर बसणारा माणूस रस्त्यावरून येणाऱ्या कुणाही माणसाला दिसणें शक्य नव्हतें.

'कांही काळजी नको करायला,' नरगिज म्हणाली, 'यावेळीं इकडे कुणी यायचं नाहीं–यावेळींच कां, तुमच्या खेरीज कुणीच कधीं या बाजूला येत नाहीं. तुम्ही इकडे येत होतां हें मीं पाहिलं होतं, म्हणूनच मीं ही जागा सुचवली—'

त्याचें लक्ष तिसरीकडेच होतें. तिचें बोलणें कांनीं न घेतां तो म्हणाला, 'क्षमा करा, माझ्या मनाची तळमळ अनावर झाली आहे. दुसऱ्या कुणाला विचारणं मला बरं वाटत नाहीं—दुसऱ्या कुणाला विचारण्यापेक्षां तुम्हांलाच विचारणं बरं, असं मीं माझ्या मनाशीं ठरवलंय्. मला अगदीं सरळ सरळ सांगा, हें आत्महत्त्येचं प्रकरण काय आहे ?'

त्याचा प्रश्न ऐकून नरगिज एक क्षणभरच गंभीर झाली. दुसऱ्या क्षणाला तिचेंच तिला हसूं आलें. ती म्हणाली, ' क्षमा करा, सकृद्दर्शनीं गंभीर वाटणारा हा प्रश्न मी इतका खेळीमेळीनं घेतें, याचं तुम्हांला आश्चर्य वाटेल. पण कुणाचाही मूर्खपणा—मग त्याचे परिणाम कितीही गंभीर होवोत—आठवला कीं मला हसूं आल्यावांचून रहात नाहीं. आतां ऐका. कॉलेजांत असतांना पुष्कळ धनिकांचीं मुलं माझ्यासभोवार गोळा होत असत. तसं पाहिलं तर आम्ही कांहीं मोठेसे श्रीमंत नव्हतों. इकडे बाहेर सरकारी अधिकारी म्हणून लक्षाधीशापेक्षांही मोठा मान आम्हांला मिळतो खरा; पण आमच्यासारख्या पंचवीस माणसांना नोकर ठेवतील, अशा माणसांची मुलं माझ्याबरोबर कॉलेजांत होतीं—तशींच कांहीं गरिबांचींही होतीं. सर्वांशींच मी मोकळेपणानं वागत होतें—खेळीमेळीनं वागत होतें. त्या माझ्या मोकळेपणाचा अर्थ त्यांतला प्रत्येक माणूस आपापल्या मताप्रमाणं करीत होता. तरुण विद्यार्थ्यांच्या डोक्यांत—विशेषतः गरीब विद्यार्थ्यांच्या डोक्यांत भलत्याच भावनांवर मनोरे रचायची कल्पना असते. प्रत्येक तरुण विद्यार्थ्याला वाटतं—विशेषतः हुशार विद्यार्थ्याला—स्पोर्टस्मन् विद्यार्थ्याला! त्याला वाटतं, माझ्या या गुणावर मुलींनीं आषक व्हावं—नव्हे त्या आषक होतात असंच तो धरून चालतो. मुली कॉलेजांत जातात त्या कांहीं लव्ह-अफेअर करण्यासाठीं नाहीं. पण मुलांची नजर असते असल्या भानगडींवर. त्यामुळं ते स्वतःचीच फसवणूक करीत असतात. अन् मग केव्हां तरी, ज्यावेळीं या खोट्या भावनेचं निराकरण होतं, त्यावेळीं फाजील भावनात्मक माणूस एकदम खचून जातो. तसंच झालं होतं. एकाला वाटत होतं, मी श्रीमंत आहें म्हणून ही माझ्यावर भाळेल. दुसऱ्याला वाटत होतं, कीं भावनात्मक तरुणी श्रीमंतीची पर्वा करीत नाहींत—वैभव किंवा सौंदर्य यांपेक्षां बुद्धिमत्तेलाच त्या भाळतात—पण दोघांचाही समज चुकीचा होता. मी कुणालाच भाळलें नव्हतें. समवयस्कतेच्या पातळीवर आम्ही सारेच विद्यार्थी मोकळेपणानं, खेळीमेळीनं वागत होतों एवढंच. मी तसं सांगितलं त्यांना—त्यांनीं एकदम माझ्यासमोर मन उघडं केलं म्हणून मी सरळपणें सांगितलं. त्याचा परिणाम असा झाला, कीं दोघांनींही एकाच दिवशीं आत्महत्त्या केली. त्यांच्या या आततायीपणाची मला दया आली

नाहीं. मी त्यांची कींवसुद्धां केली नाहीं. आणि मी तसं बोलून दाखवलं, याचा सर्वांनीं विपर्यास केला. मी एक कृत्त्या आहें, असं सारेजण म्हणूं लागले. पण त्यामुळं माझा एक फायदा झाला—तेव्हांपासून कुणीच माझ्या वाटेला जाईनासं झालं. त्या दोघांनींही आत्महत्त्या करण्यापूर्वी लिहून ठेविलेल्या पत्रांत माझं नांव घेतलं नसतं तर कुणालाच कांहीं कळलं नसतं—पण तसं करून त्यांनीं माझ्यावर मोठे उपकार केले !—' असें म्हणून ती स्वस्थ बसली.

गोविंदाही स्वस्थ बसला होता. ज्या बेफिकीर वृत्तीनें ती ही हकिकत सांगत होती, ती तिची वृत्ति पाहून त्याला अचंबा वाटला. बंगल्यावर आल्यावेळीं तिनें त्याच्याबद्दल जी थोडीशी नाजूक भावना दाखविली होती, तिच्याशीं ही वृत्ति तो ताडून पाहूं लागला. दोन्ही वृत्तींचा मेळ बसेना.

' धक्का बसला तुम्हांला ? ' नरगिज म्हणाली, ' साहजिकच आहे, कुणालाही पहिल्यानं असंच वाटेल. पण तुम्ही माझ्या जागीं आहांत अशी कल्पना करा अन् मग मनाचा निश्चय करा. भावनात्मकता मला आवडत नाहीं. प्रेमाच्या भावनेवर माझा विश्वास नाहीं. विशिष्ट परिस्थितींत दोन स्त्री-पुरुषांचं एकमेकांविषयीं आकर्षण होतं—त्याला कांहीं कारण लागत नाहीं—असं मला वाटतं. पण प्रेम या शब्दासभोंवार आधुनिक तरुणांनीं जें एकप्रकारचं भावनेच्या तेजाचं आवरण विस्तारून ठेवलं आहे, त्याचा या आकर्षणाशीं कांहीं संबंध नाहीं, असंच मला वाटत असतं. तें आकर्षण माझ्या मतें अगदीं व्यावहारिक असतं—अगदीं मानवी असतं—त्यांत स्वर्गीय किंवा अतिमानवी अशी कोणतीच झळाळी नसते. असल्या अतिमानवी कल्पनेचा खोटा डोल्हारा उभारल्यामुळं पुष्कळ तरुण आणि तरुणींच्या आयुष्याचा नाश झाल्याचं मी पाहिलं आहे.—तुम्हांला काय वाटतं ?—'

त्या अचानक प्रश्नानं गोविंदा चमकला. तो म्हणाला, 'आय्. सी. एस्. होईपर्यंत मी परीक्षा पास होण्यापलीकडे दुसऱ्या कोणत्याच विषयांत लक्ष घातलं नव्हतं—तशीच आतां नोकरी करतों आहें. कालच मला धक्का बसला. या यांत्रिक आयुष्यापलीकडे आणखी कांहींतरी आहे याची कालच मला जाणीव झाली—'

तो बोलत असतांना ती गालांतल्या गालांत हंसत होती. पण त्याचें तिकडे लक्षच नव्हतें. तो बोलत होता, ' मधें माझ्या आईबापांनीं लग्नाबद्दल गोष्ट काढली होती. त्यावेळीं मला कांहीं उत्तर देतां आलं नाहीं. तरीही आतां मला असं वाटतं, कीं सांगून आलेल्या मुलींतून एकाद्या मुलीची निवड करून तिच्याशीं लग्न करणं योग्य झालं नसतं—' क्षणभर थांबून तो म्हणाला, ' कौटुंबिक जीवनाचा मला अनुभव नाहीं. माझं बहुतेक आयुष्य हॉटेल आणि बोर्डींगमधून गेलेलं आहे. तुम्हांला कदाचित् माहीत नसेल नरगिज, माझ्या आईबापांचा मी औरस मुलगा नाहीं. अनाथाश्रमांतून आणलेलं मी एक मूल होतों. त्या माझ्या इतिहासाचा गैरफायदा घेऊन लहानपणापासून जेव्हां माझा छळ झाला, तेव्हांपासूनच मी जगाचा संबंध सोडून दिला. माझ्या आईचं–म्हणजे पोसत्र्या आईचं माझ्यावर फार प्रेम आहे—मला तिच्याबद्दल मोठा आदर आहे; पण जिव्हाळा नाहीं. कालच मी विचार करीत होतों. माझ्या मनःप्रकृतीची मी छाननी केली, तेव्हां मला असं दिसून आलं, कीं मानवतेची कोमलता अजून मला परिचित नव्हती. यापुढं काय होईल कुणी सांगावं ? पण कालपर्यंत मी एक बुद्धिमान् समजला गेलेला कोरडा दगड होतों. त्या दगडाला कुठंतरी पाझर फुटला आहे, असा काल मला संशय आला—'

पाळतीवर ठेवलेला पटेवाला एकदम येऊन सलाम करून म्हणाला, ' देसाईसाहेब येत आहेत. '

नरगिजनें गोविंदाकडे पाहिलें.

गोविंदा म्हणाला, ' ठीक आहे; तूं जा–बंगल्यावर. ' त्याच्या आवाजांत साहेबी कठोरपणा आला होता.

पटेवाला निघून गेला, तेव्हां नरगिज म्हणाली, ' मग जायचं का आतां ? '

' नाहीं.' म्हणून तो तसाच बसून राहिला.

रतिलाल येतांच त्या दोघांनीं त्याचें स्वागत केलें. समोरच्या दगडावर बैठक मारून रतिलाल म्हणाला, ' मी तुम्हां उभयतांचें अभिनंदन करतों. '

‘ कशाबद्दल ? ’ गोविंदानें एकदम कोरडेपणानें विचारलें.

‘ तें तुमचं तुम्हींच जाणतां ! ’ रतिलाल म्हणाला, ‘तुमच्यापेक्षां मी जगांत जास्त वावरलों आहें. कोणत्या परिस्थितींतून कोणते प्रसंग निर्माण होतात, याची मला चांगली अटकळ बांधतां येते. पण तुम्हांला मी एक सांगून ठेवतों, कीं ही पार्श्यांची जात तुम्ही अजून ओळखली नाहीं. तुम्हाला माहीत नाहीं. मागं त्या उमाकांत देसाई यांचं पारशी मुलीशीं लग्न झालं. तोही तुमच्यासारखाच दक्षिणी होता. पण केवढा अनर्थ झाला त्यावेळीं ! नऊ वर्षं तीं दोघं वाट पहात राहिलीं होतीं. शेवटीं जिवावर उदार होऊन त्यांनीं लग्न केलं. पण ती बिचारी आपल्या माहेराला कायमची मुकली. वरून कितीही सुधारक दिसले तरी हे पारशी लोक पक्के सनातनी आहेत. बॅ. झीणांच्या लग्नाच्या वेळीं केवढा आकांत उडाला तो माहीत नसेल तुम्हांला ! म्हणून म्हणतों—’

‘ कांहीं म्हणूं नका. ’ नरगिज म्हणाली, ‘ अटकळ बांधण्यांत तुम्ही मोठे चाणाक्ष असाल, पण माझ्या बाबतींतली अटकळ बांधण्याइतकी सूक्ष्म दृष्टि तुम्हांला नाहीं, हें मी तुम्हांला बजावून ठेवतें. ’

‘ मीही तेंच म्हणतों आहें, ’ रतिलाल म्हणाला, ‘ आणखी एक आत्महत्त्या व्हायला नको. ’

कधींही न हंसणारा गोविंदा मोठमोठ्यानें खदखदां हंसला.

रतिलाल चमकला. तो म्हणाला, ‘ हंसण्यावारी नेण्याजोगी ही गोष्ट नव्हे. मी चुगली करीत नाहीं. अगदीं समोर समोर सांगतों आहें–’

‘ मला सारं कांहीं माहीत आहे, ’ गोविंदा म्हणाला, ‘ तुमच्या आणि माझ्या दृष्टींत फरक आहे. कोणतीही अविवाहित स्त्रीपुरुषं एका जागीं येऊं लागलीं, कीं तुम्ही विशिष्ट दृष्टीनं त्यांच्याकडं पहातां. दोघांचे स्नेहसंबंध जुळायला भावि लग्न हेंच कांहीं एक कारण नसतं, एवढंच मी तुम्हांला सांगून ठेवतों. ’

‘ मग कोणतं कारण तर ?’ रतिलालनें विचारलें.

'माझ्या खाजगी व्यवहाराचा पाढा मी तुमच्यापुढं कां वाचावा ?' गोविंदा चिडून म्हणाला.

'असे रागावूं नका बुवा!' रतिलाल लघळपणानें म्हणाला, 'ही आपली एक फ्रॅटर्निटी आहे. सामान्य जनसमाजापासून आपण सक्तीनं दूर राहिलेले लोक आहोंत. बाहेरचं जग आपल्याकडे अगदीं निराळ्या दृष्टीनं पहातं म्हणून आम्हीं अधिकारी लोक एकमेक एकमेकांची काळजी घेत असतों. त्या दृष्टीनं मी पहातों आहें; आणि त्याच बंधुभावानं बोलतों आहें—'

'चला, उशीर झाला!' असें म्हणून नरगिज उठली आणि चालूं लागली— अर्थात्‌च ते दोघेही तिच्याबरोबरच निघाले.

ती सारी रात्र गोविंदानें विचारांत घालविली. त्याला कोडें पडलें होतें. ही परिस्थिती त्याला अपरिचित होती. नित्याची वृत्ति सोडून आपण कुठें तरी वहावत आहोंत, याची त्याला जाणीव झाली होती. आजपर्यंत घालवलेलें जीवन सुखाचें गेलें पण यापुढें कांटेरी मार्गानें आपल्याला प्रवास करावा लागणार, असें त्याला वाटूं लागलें. जगाच्या व्यवहाराला तो अजून पारखा होता. त्याला वाटलें, आतां व्यवहाराला सुरवात झाली. यांत्रिक जीवनांत त्यानें आजवर काळ कंठला होता. त्या यंत्राच्या दांत्यांतून सूटून आपण बाहेर निघत आहोंत आणि अफाट विश्वाच्या पसाऱ्यांत कुठेंतरी आपल्याला भिरभिरत जावें लागणार आहे, असें वाटून तो घाबरून गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तो उठून पहातो तों अण्णासाहेब येऊन हजर झाले होते.

## प्रकरण ६ वें.

अण्णासाहेब आल्याचें पाहून गोविंदाला आश्चर्य वाटलें. पण थोड्याच वेळांत कारणाचें निराकरण झालें. अण्णासाहेबांनीं सरळ सरळ मोघे शिरस्तेदारचें पत्र दाखवलें, तेव्हां गोविंदाला वाईट वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

मोघ्यांच्या बाबतीत गोविंदाचें वर्तन जरी वरिष्ठ अधिकाऱ्यासारखें होतें, तरीही जुनें नातें ओळखून तो हाताखालच्या माणसालाही योग्य मानानें वागवीत होता. म्हणूनच त्यांनीं दाखविलेली ही फाजील कळकळ त्याला आवडली नाहीं.

योगायोग असा झाला, कीं त्यावेळीच नरगिज तिथें आली. अण्णासाहेबांनीं बुद्धिपुरस्सर तिचा परिचय घरून घेतला नाहीं. ते मुळीं समोरच आले नाहींत— किंवा ते आल्याची बातमी तिला कळूं दिली नाहीं. वडिलांच्या इच्छेला मान देऊन गोविंदानें तिला कांहीच सांगितलें नाहीं.

ती मोकळपणानें बोलत होती—बेसावधपणें बोलत होती. गोविंदाची वृत्ति मुळचीच संकोची असे, त्यामुळें त्याच्या वर्तनांत रोजच्यापेक्षां कांहीं फरक झाला आहे असें तिला जाणवलें नाहीं.

आधल्या दिवसाच्या प्रकाराबद्दल ती बोलत होती. सभ्य गृहस्थाला न शोभण्याजोगें रतिलालनें केलेलें वर्तन पाहून तिला चीड आली होती. त्या चिडीच्या भरांत ती बोलत असल्यामुळें मनांतल्या कोणत्याही नाजूक भावनांचे आविष्करण तिच्या भाषणांत साहजिकच आलें नाहीं.

भाषणाचा ओघ कम्युनिझमवर आला आणि मग मात्र ती अगदीं रंगांत आली. या तत्त्वज्ञानाचा तिनें कसून अभ्यास केला होता. या तत्त्वज्ञानाबद्दल तिची वृत्ति उंचबळून आलेली होती. एक शिष्याला आपण एका नव्या तत्त्वाचा उपदेश करीत आहोंत अशा अभिनिवेशानें ती बेफामपणें बोलत होती. गोविंदानें तिला नुसत्या खुणेनेंसुद्धां आंवरून धरण्याचा प्रयत्न केला नाहीं.

नरगिज निघून गेली आणि अण्णासाहेब पुढें आले. मोघ्यांचा कांहींतरी गैरसमज झाला असावा, असें त्यांनीं स्पष्ट बोलून दाखविलें. ते म्हणाले, ' पारशी का असेना, पण मुलगी मोठी हुशार दिसते. मी तरी तिच्या भाषणाला थक्क होऊन गेलों. एवढ्याशा वयांत या चिमुरड्या पोरीनं एवढा व्यासंग केला तरी कधीं? खरं पाहिलंस गोविंदा, तर मला तिचं तें भाषण चांगलंसं कळलं नाही. तो विषयच मला अपरिचित आहे. मी मोठासा वाचक नव्हे—तरीही चालू राजकारण माझ्या नजरेसमोर असतं. पण चांगल्या बड्या मुत्सद्याच्या तोंडीं शोभण्याजोगी तिची भाषा ऐकून खरोखरीच मी थक्क झालों. वाटलं, अशी मुलगी कांहीं आपल्या हिंदु लोकांत आढळून यायची नाहीं. वाटलं, असेना का पार्शी ? झालीतर तुझी ती एक प्रकारची मदतगारच होईल—' अण्णासाहेब गोविंदाच्या तोंडाकडे पहात राहिले. त्याचा चेहरा अगदीं निर्विकार होता. तो कांहींच बोलत नाहीं, असें पाहून ते म्हणाले, ' पण दुसऱ्याच क्षणाला वाटलं, तुला हिचा काय उपयोग ? तूं सरकारी अधिकारी-राजनिष्ठ राहणं हें तुझं कर्तव्य—इमानानं नोकरी बजावणं हा तुझा बाणा राहिला पाहिजे—तिथं ही बंडखोर सोबतीण तुला काय कामाची ? तूं कांहीं राजकारणी मुत्सद्दी नाहींस कीं चळवळ्या नाहींस !—'

'कुणी सांगावं !-' गोविंदा चट्कन् बोलून गेला.

'म्हणजे !' अण्णासाहेब घाबरून म्हणाले, 'म्हणतोस काय बाबा?—सोन्यासारखी मानाची नोकरी सोडून चळवळींत का पडणार आहेस? तेवढ्यासाठीं का मी तुला आय्. सी. एस्. करून आणलं?—'

'मीं असं कुठं म्हटलं?' गोविंदा शांतपणें म्हणाला, 'पण कुणी सांगावं, परिस्थिती कुणाला कुणीकडे नेईल, हें कांहीं सांगतां यायचं नाहीं. आज मी माझी नोकरी प्रामाणिकपणें बजावतों आहें, त्याबद्दल माझी तारीफ होते आहे, तरीही मला असं दिसून येतं आहे, कीं मानाची नोकरी असली-अधिकाराची असली तरीही ती सुखाची होतेच, असं नाहीं. माझ्यासारख्या कित्येक जिल्हाधिकाऱ्यांना वरिष्ठांकडून जो त्रास होतो, तो केव्हां केव्हां त्यांना असह्य होऊं लागतो. या यंत्रांत सांपडल्यामुळं कितीतरी गोष्टी मनाविरुद्ध कराव्या लागतात—न्यायाच्या नांवाखालीं अन्यायी निकाल द्यावे लागतात. इतक्यांत माझ्यावरही असा एकाददुसरा प्रसंग येऊन गेला आहे. वारंवार जर असंच होऊं लागलं, तर कुणी सांगावं—' असें म्हणून तो उगीच बसला.

अण्णासाहेब विचारांत पडले. एका उनाड पारशी पोरीच्या नादीं लागून आपला मुलगा बिघडेल, या भीतीनें ते आले होते. ती मुलगी उनाड नाहीं, असें त्यांना दिसून आलें. पण तिच्या सहवासानें त्याच्या मनावर अनिष्ट परिणाम होईल—आपल्याला वाटत होतें त्या प्रकारानें नव्हे—पण राजकारणाच्या नव्या तत्त्वज्ञानाचा परिचय झाल्यामुळें त्याला आपल्या चालू परिस्थितीबद्दल कदाचित् तिटकारा उत्पन्न होईल, अशी भीति त्यांच्या मनांत जागी झाली.

त्या दिवशीं बापलेकांचें या विषयावर फारसें बोलणें झालें नाहीं. संध्याकाळीं मोघे शिरस्तेदार येऊन अण्णासाहेबांना भेटून गेले. अण्णासाहेबांनीं त्यांच्या भीतीचें निराकरण केलें. पण त्यांच्या मनांत निर्माण झालेल्या नव्या भीतीचा उल्लेख त्यांनीं केला नाहीं.

मोघे म्हणाले, 'मला भीति वाटली ती एवढीच, त्या मुलीची कीर्ति मोठी

विलक्षण आहे. तिच्या पायीं दोघांनीं जीव दिले आहेत. प्रत्यक्ष बापालासुद्धां ती जुमानीत नाहीं, हें आम्ही पहातों आहोंत. चिटवळ टिटवीसारखा चाललेला तिचा धिंगाणा आमच्या जुन्या दृष्टीला कांहीं रुचत नाहीं. आमच्या साहेबांचा अधिकार मोठा असला, तरी वय लहान आहे. जगाचा अजून अनुभव नाहीं. विलायतेंत राहिलेले, विलायती चालीरीतींचा मनावर पगडा बसलेला, तेव्हां या पोरीच्या विलायती थाटाचा साहेबांच्या मनावर परिणाम होईल अशी मला भीति वाटली, म्हणूनच मीं आपल्याला पत्र लिहिलं. अजूनही ती माझी भीति गेली नाहीं. आपलं समाधान झालेलं असलं, तरी माझं समाधान झालेलं नाहीं—'

अण्णासाहेबांनीं त्यांचें कसेंबसें समाधान केलें आणि त्यांची रवानगी केली. त्यांच्या भाषणानें अण्णासाहेबांचें मन दुश्चित झाल्यावांचून राहिलें नाहीं.

पण या प्रकाराचा गोविंदाला पत्ता नव्हता. तो आपल्याच रंगांत रंगला होता. नरगिजच्या हुशारीचा अण्णासाहेबांच्या मनावर झालेला परिणाम पाहून त्याला उत्तेजना आली होती.

त्या दिवशीं क्लबांत नरगिज त्याच्याशीं जास्त खेळीमेळीनें वागत होती. रतिलालला मुद्दाम डिवचावें, असा तिचा उद्देश होता. उगीच लगट करूं पहाणाऱ्या रिचर्ड्सला देखील तिनें त्या दिवशीं झिडकारलें.

सर्व अधिकारी लोकांचा त्या दिवशीं हा चर्चेचा विषय झाला होता. नरगिजच्या बापाला तें आवडलें नाहीं. बाजूला घेऊन डॉक्टर साहेबांनीं नरगिजची जेव्हां कानउघडणी केली, तेव्हां ती म्हणाली, 'मी सज्ञान आहें, माझी मी मुखत्यार आहें, मला तुमच्या धर्माची पर्वा नाहीं, तुमच्या धर्मावर माझा विश्वास नाहीं, तुमच्याच का–कोणत्याच धर्मावर माझा विश्वास नाहीं—रूढीला आणि परंपरेला चिकटून स्वताचं मन मारण्याइतकी मी जुन्याकाळची नाहीं. तुमचा मार्ग तुम्ही पहा, माझा मी पाहीन. मला घरांतून घालवून दिलंत तरी मला त्याची पर्वा नाही.' तिच्या या उत्तरानें डॉक्टरसाहेब घाबरून गेले. खरोखरच तिनें जर त्यांच्या मर्जीविरुद्ध जाण्याचें मनांत आणलें असतें तर त्यांना कांहीं करतां आलें नसतें

आणि असें कांहीं झालें असतें तर त्यांना मरणप्राय दुःख झालें असतें. पारशी जातींत आजवर झालेल्या एकदोन तुरळक केसीसमधें आणखी भर पडावी, अशी त्यांची इच्छा नव्हती.

दुसऱ्या दिवशीं नरगिज गोविंदाच्या बंगल्यावर आली. गोविंदानें तिचा अण्णा-साहेबांशीं परिचय करून दिला. पहिल्याच भेटीला ती त्यांच्याशीं इतक्या खुल्या दिलानें बोलूं लागली, कीं तें अण्णासाहेबांना आवडलें नाहीं. तरुण मुलांनीं वडील माणसांचा मान ठेवला पाहिजे अशी त्यांची भावना होती. त्या भावनेला या तिच्या मोकळ्या वृत्तीमुळें धक्का बसला.

नरगिज म्हणाली, 'आतां आपणच सांगा अण्णासाहेब, उद्यां मी आपल्या चिरंजीवाशीं लग्न केलं तर काय बिघडलं! माझ्या बाबांना त्यांत वैषम्य कां वाटावं? समजा, तुम्हांला एकादी मुलगी असती आणि तिनं एकाद्या पार्श्याशीं लग्न कर-ण्याचा प्रस्ताव केला असता–'

'हं हं थांब—' अण्णासाहेब म्हणाले, 'मी स्पष्ट सांगतों, मला तें पटलं नसतं. गोविदानं तुझ्याबरोबर लग्न केलं तर मला त्याबद्दल कांहीं वाटायचं नाहीं. चार लोक नांवं ठेवतील–रूढी मोडली म्हणतील–पण जोपर्यंत परधर्माची मुलगी आमच्या कुटुबांत येते आहे तोपर्यंत मला त्याचं कांहीं वाटायचं नाहीं. ती आमच्या धर्मांत आली–आमची झाली म्हणून क्वचित् उलट बरंच वाटेल. पण माझी मुलगी मला टाकून–माझा धर्म सोडून दुसऱ्याच्या धर्मांत गेली–परकी झाली, तर मला धक्का बसेल!'

'आतां हें कसं पटायचं?' नरगिज म्हणाली, 'कसा मेळ घालायचा या दोन गोष्टींचा? कां असं वाटावं?'

अण्णासाहेब गोंधळले. त्यांना उत्तर सुचेना. तिच्या प्रश्नाचें समाधान होईल असें कोणतेंही कारण त्यांना देतां येईना. ते म्हणाले, 'हा भावनेचा प्रश्न आहे. या बाबतींत तुझ्या वडिलांचं म्हणणं बरोबर आहे खरं, पण माझ्या दृष्टीनं–मुलाच्या बापाच्या दृष्टीनं त्यांत एवढंसं गम्य नाहीं. मुलीच्या जातीला स्वतंत्र अस्तित्व नाहीं.

ती दुसऱ्या कुणाच्या तरी घरीं जायचीच. आज तूं मेहताची मुलगी आहेस ती उद्यां कदाचित् एकाद्या वाच्छाची बायको होशील. तसं झालं, तर तुझ्या बापाला वाईट वाटायचं नाहीं. कारण तूं जातींतच राहशील. माणसाला वाटत असतं, कीं स्त्री ही एक मत्ता आहे. ती आपल्याच कुटुंबांत–आपल्या जमातींतच राहिली पाहिजे. ती दुसऱ्या जमातींत गेली, तर आपलं नुकसान झालं आपली मत्ता दुसऱ्याची झाली, असा नकळत माणसाच्या मनावर परिणाम होतो. पुरुषानं दुसऱ्या जमातींतली मुलगी आणली–दुसऱ्याची मत्ता आपण पचवली तर ती अभिमानाची गोष्ट वाटते. एकाचा नफा तें दुसऱ्याचं नुकसान असतं. तूं माझ्या कुटुंबांत आलीस तर माझ्या जमातीचा नफा झाला–अर्थात् तुझ्या जमातीचं नुकसान झालं. म्हणूनच तुझ्या बापाला वाईट वाटणार ! मुलगी असो कीं पत्नी असो, स्त्री ही मत्ता आहे, असा एक अध्यात्मिक परिणाम जोंपर्यंत आमच्या मनावर ठसून गेला आहे, तोंपर्यंत हें असं वाटणारचं ! म्हणूनच या बाबतींत मी तुझ्या बापाला दोषी ठरवणार नाहीं.'

'आतां मला कळलं,' नरगिज म्हणाली, 'स्त्री ही मत्ता आहे, प्रॉपर्टी आहे, असं पुरुषांना वाटत असतं, त्याचं प्रमाण कितपत कॅपिटॅलिस्टिक असतं, याचा विचार मीं अजून केला नव्हता. हा सामाजिक प्रश्न नसून समाजवादाचा प्रश्न आहे, हें आतां मला कळलं. आमच्या बाबांना हें सांगतां येत नव्हतं. ते नुसते धर्मनाशाच्या गोष्टी बोलत होते. पण धार्मिक प्रश्न हा भांडवलशाही स्वरूपाचा कसा असतो, याचा प्रकाश आतां पडला—' एक क्षणभर थांबून ती म्हणाली, 'आपण मुळींच काळजी करूं नका. लग्न करून बंधनांत पडावं असं अजून मला वाटत नाहीं. लग्नाच्या बंधनांत वैभव आहे, असं आजपर्यंत समजण्यांत येत होतं पण लग्नाच्या बंधनांतलं बंधन केवढं मोठं आहे, याची अंधुकशी कल्पना मला नुकती कुठं येऊं लागली आहे. आपल्या मुलाशीं मी लग्न करीन, अशी कल्पना आपण एव्हांच करून घेऊं नका. माझ्या बाबांनाही मी तसंच सांगणार आहें. पण लग्न हें बंधन नाहीं असं मला पटलं—कुणाशीं तरी लग्न करावं असं मला वाटलं, तर मी आपलीच सून होईन !' असें म्हणून ती हंसली.

गोविंदा निर्विकार मनानें तो संवाद ऐकत होता. त्या संवादापासून निर्माण होणाऱ्या प्रश्नांचा त्याच्या मनावर परिणाम होत होता. पहिल्या पहिल्यानें तो थोडासा अस्वस्थ झाला. पण तिच्या शेवटच्या उद्गारानें त्याच्याही गालाला खळी पडल्यावांचून राहिली नाहीं. आत्मप्रौढीच्या जाणिवेचा तो नाजुक पुरावा होता.

नरगिज निघून गेल्यावर अण्णासाहेब म्हणाले, 'मला मोठा प्रश्न पडला आहे गोविंद—जगाच्या दृष्टीनं तूं मोठा माणूस होणार आहेस. एकादा वकील होणं, डॉक्टर होणं, हें समाजाच्या दृष्टीनं तितकंसं मोठं वाटत नाहीं. तो वकील किंवा डॉक्टर समाजांत राहतो, समाजांतच वावरतो. पण आय्. सी. एस्. होऊन अधिकारी झालेला माणूस समाजाच्या कुंपणाच्या पलीकडे गेलेला असतो—म्हणजे तो समाजांतून बहिष्कृत होतो असं नव्हे–तो 'पतित' होत नाहीं.–तो 'अतिपवित्र' होतो. आय्. सी. एस्. ला 'हेवनूबॉर्न जात' असं जें विशेषण हे चळवळे लोक देतात त्यांतला व्यंगार्थ सोडून दिला, तरी त्या शब्दाचा वाच्यार्थ मात्र खरा आहे असं म्हणावं लागतं. उद्यां तूं या पारश्याच्या पोरीशीं लग्न केलंस, तर लोक कदाचित् तुझी तारीफही करतील. असं करणं तुझ्यासारख्यालाच शोभतं असं म्हणतील. पण एकाद्या वकील, डॉक्टर किंवा मामलेदारानं जर असलं अधर्माचरण केलं, तर समाज त्याला गय करणार नाहीं–'अण्णासाहेब बोलतां बोलतां थांबले. अंतःकरणांतून अनाचार वाटत असलेल्या गोष्टीला आपण उत्तेजन देत आहोंत, अशी जाणीव होऊन ते क्षणभर घाबरले आणि म्हणाले, 'म्हणजे तूं असं कांहीं करावंस असं मी म्हणत नाहीं. पण आतां तुला लग्न केलं पाहिजे. आजा होण्यासाठीं मी उतावीळ झालों आहें. तुझ्या आईलाही तसंच वाटतं–यापेक्षां मी जास्त काय सांगूं!'

अण्णासाहेबांच्या त्या भाषणानें गोविंदाचा घोंटाळा उडाला. त्यांच्या विचाराचें धोरण त्याच्या चांगलेंसें ध्यानीं येईना.

विचाराअंतीं त्याला असें वाटलें, आजोबा होण्याची अण्णासाहेबांची हांव पुरी व्हायला फार अवधी लागेल.

## प्रकरण ७ वें.

जाण्याच्या पूर्वी अण्णासाहेब मोघे शिरेस्तेदारानां भेटले.

अण्णांसाहेब म्हणाले, ' तुम्ही उगीच घाबरलांत मोघे. गोविंदाच्या हातून तसा कांहीं अविचार होणार नाहीं, अन् तसा कांहीं झालाच तर त्या बाबतींत आपल्याला कांहीं बोलतां येणार नाहीं तो सज्ञान आहे, स्वतः मिळवता आहे—आज त्याचा तो मुखत्यार आहे. कोणतीही गोष्ट करायचं त्यानं मनांत आणलं तर त्याला अडथळा आणणं मला शक्य आहे खरं–पण तें योग्य होणार नाहीं. दोन पिढ्यांतल्या अंतराबरोबर माणसांचे विचारही बदलत आहेत, तिथं वडील माणसांनीं तरुणांना मोकळीक द्यावी हेंच बरं. त्यांच्या मताप्रमाणें ते वागले, आम्ही त्यांना विरोध केला नाहीं, तर पुढल्या परिणामाची जबाबदारी त्यांच्यावर राहील. पण तोच जर आपण विरोध केला तर चालत्या गाड्याला खीळ पडून शेवटीं कुणाचंच कल्याण होणार नाहीं. म्हणून म्हणतों, गोविंदाच्या खाजगी गोष्टींकडे तुम्हीं मुळीं लक्षच देऊं नका.'

अण्णासाहेब अगदीं शांतपणानें बोलत होते खरे, पण त्या शांतपणामागें बजावणीची जरब होती. त्यांचें धोरण मोघ्यांच्या ध्यानांत आल्यावांचून राहिलें नाहीं.

ते म्हणाले, ' आपण तसं म्हणत असाल तर मी आपले डोळे मिटून घेईन. जातीच्या अभिमानानं मी आपल्याला पत्र पाठवलं. एवढ्या मोठ्या योग्यतेला आलेलीं माणसं आपल्या जातींत फार कमी. ते जातींतून बाहेर जाऊं नयेत, असं आम्हां जुन्या लोकांना वाटतं म्हणूनच मी आपल्याला पत्र लिहिलं. मला क्षमा करा—मी ह्यापुढं असं कांहीं लिहीणार नाहीं.' असें म्हणून नमस्कार करून मोघे रागारागानें निघून गेले.

अण्णासाहेबांना वाईट वाटलें खरें, पण त्याला कांहीं उपाय नव्हता. त्यांनासुद्धां जातीचा अभिमान होता; पण नव्या पिढींत जात्यभिमानाची भावना तेवढीशी राहिलेली नाहीं याचीही त्यांना जाणीव होती. सरकारी नोकरीच्या दृष्टीनें मोघे आणि गोविंदा यांच्यामध्यें जमीनअस्मानाचें अंतर होतें. तें अंतर मोडून मोघे यांनीं गोविंदावर वडिलकीचा अधिकार गाजवावा—नुसत्या जात्याभिमानासाठीं अधिकार गाजवावा—हें त्यांना पसंत पडलें नाहीं.

अण्णासाहेबांची स्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. पोटच्या गोळ्यासारखा पाळलेला असला तरी गोविंदा त्यांचा औरस मुलगा नव्हता. कांहीं गुण जन्मजात असतात असा त्यांचा समज होता. तो कुणाचा मुलगा होता हें त्यांनांही माहित नव्हतें. म्हणूनच आपला जात्यभिमान गोविंदावर लादणें त्यांना इष्ट वाटलें नाहीं.

गोविंदाची मनःस्थितीही अशीच दुश्चित्त झाली होती. कोमल भावनेच्या परिणामाकडे त्यानें आजवर जरी दुर्लक्ष केलें होतें तरी अंतःकरणाच्या कुठल्यातरी कोपऱ्यांतून नर्गिजच्या बाबतींत कांहींतरी अस्फुट अशी भावना त्याच्या स्थितप्रज्ञ वृत्तीला चेतवीत आहे असें त्याला वाटलें.

आजोबा होण्यासाठीं अण्णासाहेब इतके उतावीळ कां झाले याचें कारण त्याला कळेना. नर्गिजशीं त्याचें लग्न व्हावें हें त्यानां जरी बुद्धिपूर्वक पटत नव्हतें तरी आजोबा होण्याच्या हावेमुळें अशा लग्नालाही संमती द्यायला ते तयार होतील असें त्याला स्पष्टपणें दिसून आलें.

प्रश्न होता तो हाच, कीं नर्गिज लग्न करायला उत्सुक होती कीं नाहीं? इंग्लिश लोकांचे आचारविचार पारशी जातींत केवढ्या तरी मोठ्या प्रमा-

णांत प्रचलित झाल्याचें त्याला माहित होतें; तरीही जात्यभिमानाच्या बाबतींत पारशी जात हिंदुंपेक्षांही ज्यास्त सनातनी आहे हें त्याला पूर्वी माहित नव्हतें. नर्गिजच्या भाषणावरून त्याला तो अंदाज आला. पण इंग्रज लोकांच्या आचाराविचाराला अनुसरून जोडप्यांच्या लग्नाची पारशी जमातींत हिंदुंप्रमाणें घाई केली जात नाहीं, हेंही त्याला माहित नव्हतें.

तो स्वतः लग्नघाईला आला नव्हता. पण ज्यांनीं आपणाला माणसांत आणलें त्यांच्या इच्छेला मान देऊन त्यांच्या समाधानासाठीं त्याच घटकेला चतुर्भुज होण्याची त्याच्या मनाची तयारी झाली होती.

अण्णासाहेब निघून गेल्यावर झालेली हकीकत त्यानें नर्गिजला सांगितली. ती ऐकतांच ती हसत सुटली. ती म्हणाली, 'मला मोठं आश्चर्य वाटतं ह्या म्हाताऱ्या माणसांचं! आजोबा होणं म्हणजे काय? नि आजोबा होऊन यांना काय असं सौख्य लागणार आहे? समजा, मी तुमच्याशीं लग्न केलं—पण लग्न केलं म्हणून उद्या मी आई होईनच अशी खात्री कांहीं कुणाला देतां यायची नाही! अन् तसंच कांहीं झालं तर यांची आजोबा होण्याची हौस कशी भागणार?—' गोविंदा कांहीं बोलत नाहीं असें पाहून ती पुढें म्हणाली, 'आजोबा व्हायचं हें नुसतं पांघरूण आहे. लग्न करून तुम्हीं गुंतून जावं एवढीच त्यांची इच्छा आहे. हातीं भरपूर पगार, अधिकाराची जागा, सर्व प्रकारची अनुकूलता—म्हणूनच त्यांचा विश्वास डळमळतो. वाटतं, कीं मुलगा कदाचित् बिघडेल—बहकेल—त्याला वेसण घालावी! एवढाच त्यांचा उद्देश आहे, यापेक्षां जास्त कांहीं नाहीं.'

'तसंही असेल कदाचित्!' गोविंदा म्हणाला.

'असेल काय–' नर्गिज म्हणाली, 'तसंच आहे. ते इतके घाईला आले असतील तर करा ना कीं कुणाशीं तरी लग्न!'

गोविंदा नुसता गालांतल्या गालांत हसला, असें पाहून ती म्हणाली, 'ही हंसण्याची गोष्ट नाहीं. तुम्ही कुणासाठीं लग्न करणार आहांत? स्वतःच्या समाधानासाठीं कीं वडीलांच्या आज्ञेसाठीं?'

‘ अजूनपर्यंत मीं लग्नाचा विचार केला नव्हता,’ गोविंदा म्हणाला, ‘ थोड्या दिवसांपूर्वी माझ्या आईनें ज्यावेळीं मला लग्नाचा आग्रह केला त्यावेळीं मी कुणाही मुलीशीं लग्न करण्यास तयार झालों होतों. कुठल्याही मुलीची त्यावेळीं मला ओळख नव्हती. पहिल्यापासून मी स्त्रीजातीपासून दूर रहात आलों आहें. तुम्हांला आश्चर्य वाटेल, पण लग्न कां करायचं याची सुद्धां मला कित्येक दिवस चांगलीशी कल्पना नव्हती. कुटुंबांत मी फारसा राहिलों नाहीं. कुटुंबवत्सल माणसांचा माझ्याशीं फारसा संबंध आला नाहीं. कथाकादंबऱ्यांतून अशा गोष्टी वाचल्या असल्या तरी त्याही फार थोड्याच—अन् त्याही नुसत्या करमणूकीपुरत्याच. कथाकादंबऱ्यांतून जे प्रसंग चितारलेले असतात, तीं संसाराचीं चित्रं आहेत याची सुद्धां मला जाणीव नव्हती. आतां कुठं मला त्याची कल्पना येऊं लागली आहे. माझ्या समोर निरनिराळ्या प्रकारचे खटले येत आहेत, त्यांत कौटुंबिकतेचे बरेचसे प्रसंग असतात, त्यांची छाननी मला जेव्हां करावी लागली, त्यावेळीं संसाराचं हें वस्त्र कसल्या ताण्यावाण्यानं विणलं आहे याची कल्पना मला येऊं लागली—’ तो क्षणभर स्तब्ध राहिला अन् म्हणाला, ‘ आतां ही तुझी भेट झाली. मीं तुझी ओळख करून घ्यायचा प्रयत्न केला नाहीं.—तशी कल्पनाच कधीं मला आली नव्हती—तूंच माझी ओळख करून घेतलीस’—असें म्हणून तो स्तब्ध बसला.

त्याच्या मनःस्थितीची नर्गिजला कल्पना आली. इतक्या गंभीरपणानें दुसरा कुणी माणूस असे शब्द बोलला असता तर ती खो खो करून हंसली असती. पण त्याच्या मनःस्थितीची अचुक कल्पना तिला आली होती. निर्मळ मनाचा हा विद्याभ्यास—जडपंडित संसारी वृत्तीपासून पारखा आहे याचा अंदाज तिला येऊन चुकला होता.

तो पुढें कांहींच बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, ‘ खरं आहे तें. मीच तुमची ओळख करून घेतली. या इथल्या साऱ्या माणसांचा मला तिटकारा आला होता. निर्मळ मनाचं कुणीतरी माणूस मन मोकळं करून केव्हांतरी बोलायला हाताशीं असावं म्हणून मी तुमचा परिचय करून घेतला. बरोबरीच्या नात्यानं

मी तुमच्या जवळ आलें, पण परिचय होतांच पायरी बदलली. मी अभिमान मिरवीत नाहीं—पण मला वाटलं, तुम्हांला कुणाची तरी पाखर हवी आहे—वडिलकीचा आधार हवा आहे. माझ्या मताप्रमाणें तें वडिलकीचं नातं मी पत्करलं. मी तुमची गुरू बनलें—अन् तुम्हींही शिष्याचं नातं चालवलं. जोडपं जमायला असा कांहींतरी उच्चनीच भेद असावा लागतो. धन आणि ऋण विद्युत् असल्याशिवाय विजेचा प्रवाह वहात नाहीं—'

सारखी टक लावून तो तिच्याकडे पहात होता. त्याच्या अंतःकरणांत चाललेली खळबळ डोळ्यांवाटे तिला दिसत होती. तो अस्वस्थ झाला होता. त्याची पौरुषाची जाणीव जागी झाल्याचा संशय येऊन ती म्हणाली, ' यांत मी तुम्हांला कमीपणा देत नाहीं. आयुष्यभर एकमार्गीपणानं वागत राहिल्यामुळं तुमच्याठायीं दुबळेपणा आला आहे. परिस्थितीनं तुम्हाला एकमार्गी केलं, पण जगाच्या व्यवहारांत मार्ग अनेक आहेत, त्या मार्गांची तुम्हांला ओळख पटावी म्हणून मी हें नातं पत्करलं. या माझ्या वृत्तींत प्रेमापेक्षां वात्सल्यच जास्त आहे—त्यापेक्षां आदरही तेवढाच जास्त आहे. असं तुमच्यासारखं माणूस माझ्या अल्पशा अनुभवांत मला एकही आढळलं नव्हतं, म्हणूनच माझं मन तुमच्याकडे ओढलं. प्रेमाच्या भावनेवर माझा विश्वास नाहीं. तसलीं शाब्दिक ढोंगं माझ्या मनाला पटत नाहींत. मला सोबत पाहिजे आहे, मोहब्बत नको. म्हणूनच काल मी तुमच्या वडिलांना तसं म्हटलं. माझ्याशीं लग्न कर असं तुह्मीं आज ह्मणाल, पण लग्न करायची अजून माझी तयारी नाहीं. आजपर्यंत मला जे अनुभव आले आहेत त्यांमुळं माझा कुणावरच विश्वास नाहीं. म्हणजे मी तुमच्यावर अविश्वास दाखवतें असं नव्हे—तर कसोटीला लागल्यावांचून मी कुठंच कुणाशीं बांधली जाणार नाहीं. मला बंधनं आवडत नाहींत. व्यवहाराच्या दृष्टीनं—कायद्याच्या दृष्टीनं पाहिलं तर लग्न हें एक बंधन आहे. त्या बंधनाची जाचणी न लागतां जर कुणाशीं लग्न करतां येईल तरच मीं संसारांत पडेन. त्यापेक्षां माझं आजचं जीवन मला अगदीं सुखाचं वाटतं.'

'ठीक आहे !' असें म्हणून गोविंदानें एक मोठा सुस्कारा टाकला. त्याचें अंतःकरण भरून आलें होतें. आपल्या स्वभावांतील उणीवा त्याला कळून येऊं लागल्या

होत्या. तो म्हणाला, 'पूर्वी मी या गोष्टींचा विचार केला नव्हता. आतां विचाराची सुरवात झाली आहे. आधीं मला सिंहावलोकन केलं पाहिजे. आधीं स्वतःचं मन पारखलं पाहिजे नि मग जगाकडे पाहिलं पाहिजे. अण्णा घाईला आले आहेत खरे, पण मी कांहीं उतावीळ झालों नाहीं. आधीं मुळीं जाणिवच नाहीं ती—आतां जाणीव झाली, जरुरी भासूं लागली, उणीवेची जाणीव झाली—ती उणीव भरून काढण्यासाठीं घाई करूं नये, हेंही मला पटतं आहे. वाट पहायची माझी तयारी आहे. आई कांहींही म्हणो पण नुसत्या घाईसाठीं आईची मी कोणतीच गोष्ट उतावीळपणानं ऐकणार नाहीं.'

त्या दिवशीं तो विषय तेवढाच राहिला. झालेलें भाषण दोघांच्याही मनांत खोलपणें ठसलें होतें खरें, पण तो ठसा त्या दोघांनींही रोजच्या व्यवहारांत दिसूं दिला नाहीं.

पूर्वीसारखेच सारे व्यवहार सुरू झाले. नर्गिजच्या बापाचाही जीव खालीं पडला. नर्गिज सर्वांशींच सारख्या मोकळेपणानें वागत होती. रतिलालला त्याचें आश्चर्य वाटलें. पूर्वीप्रमाणें ती त्याला टाळीनाशी झाली. घटका घटका ती त्याच्याशीं बोलत बसत असे, त्यामुळें तोही मोठ्या खुषींत आला. पूर्वी त्याला गोविंदाचा मत्सर वाटत होता पण आतां ती भावना नाहींशी झाली.

सर्व कांहीं सुरळीत चाललें होतें. नव्या तत्त्वज्ञानाच्या बरोबरच कथावाङ्मयाचें वाचन करण्याचा त्यानें सपाटा लावला होता. या कामीं नार्गिज त्याला मार्गदर्शक होती. तितक्यांत एक विलक्षण गोष्ट घडून आली—

## प्रकरण ८ वें.

गोविंदाची त्या जिल्ह्यांतून बदली झाली.

त्या जिल्ह्यांत त्याचें गांव होतें म्हणून नव्हे, पण तो जिल्हा सोडतांना त्याच्या जिवावर आलें. नर्गिजची आणि त्याची ताटातूट होणार होती.

साऱ्या आयुष्यांत त्यानें कुणाशींच स्नेहसंबंध जोडले नव्हते. अगदीं एकलकोंड्या वृत्तीनें सारें आयुष्य कंठतांना कुठलाच स्नेहसंबंध कोणत्याच गांवीं त्यानें जोडला नव्हता. आईबापांचा लोभसुद्धां जेवढ्यास तेवढा—तिथें रक्ताच्या नात्याची जाणीव नव्हती. जगांत आपण एकटाच आहें, रक्ताच्या संबंधाचें आपल्याला कुणीच नाहीं, कुणाशीं कोणतें तरी नातें जोडायची म्हणूनच आवश्यकताच नाहीं, अशा भावनेनें या गजबजलेल्या जगांत तो एकटाच राहिला होता.

पण नर्गिजची भेट झाल्यासून त्याच्या हृदयाच्या सहारा वाळवंटांत एक लहानसा झरा फुटून बाहेर पडला. तापून कोरडी झालेली अंतःकरणाची रेताड जमीन कुठें तरी ओलसर झाली.

बदलीचा हुकूम आला तेव्हांच त्याला हें जाणवलें. बदली झाली नसती तर बरें झालें असतें असें मनांत येऊन तो सचिंत झाला.

त्या दिवशीं क्लबांत तोच विषय बोलला जात होता. खटपट करून त्यानें मुद्दाम बदली करून घेतली असा रतिलालनें जेव्हां आरोप केला तेव्हां तो नुसता खिन्न-पणें हंसला. नर्गिजच्या तें ध्यानीं आलें पण ती कांहीं बोलली नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेव्हां नर्गिज त्याला मुद्दाम बंगल्यावर भेटायला गेली तेव्हां तो बेचैन झाला होता. आपली मनःस्थिति त्यानें उघडपणें तिला बोलून दाखविली तेव्हां ती म्हणाली, 'हें असंच चालायचं. आज आपली ताटातूट होणार म्हणून आपलं दोघांचंही मन अस्वस्थ झालं आहे; पण कुणी सांगावं—उद्यां दोघंही एकमेकांना विसरून जाऊं. साऱ्या आयुष्यांत कदाचित् पुन्हां आपली भेटसुद्धां होणार नाहीं—'

'नाहीं नाहीं,' गोविंदा म्हणाला, 'तसं व्हायचं नाहीं. तूं कुठंही असलीस तरी मीं तिथं येऊन तुला भेटेन. मी एक एकनिष्ठ माणूस आहें. हजार ठिकाणीं पहा-यला मला इंद्राचे डोळे नाहींत. मला एकच दृष्टि आहे; अन् त्या दृष्टीला मला एकच वस्तु दिसते ती अशी वस्तु एकदां दिसली कीं मी ती हृदयांत सांठवून ठेवतों. यापूर्वी ती परीक्षा होती—डिग्री होती. त्यानंतर नोकरी आली. पहिली वस्तु पुरी पदरांत पडली तेव्हां दुसरी वस्तु दिसली. आतां नोकरी पदरांत पडल्यावर—नोकरीशीं मी समरस झाल्यानंतर आतां तूं दिसलीस—'

'आतां तिसरी कुणी दिसेल !' नर्गिज गंभीरपणें म्हणाली.

'ती माझी वृत्ति नाहीं.' गोविंदा तिच्या नजरेला नजर भिडवून म्हणाला, 'एक पदरांत पडल्याशिवाय मला दुसरं दिसत नाहीं !'

तो स्तब्ध राहिला. नर्गिजलाही कांहीं बोलायला सुचेना. आपली वृत्ति तर्ककर्कश आहे असा तिचा समज होता. मनाच्या करमणुकीसाठीं बाहेरच्या जगाशीं खेळतांना ती स्वतः आपल्या हृदयाच्या कोपऱ्यांत कुठें तरी लपून बसत असे. बाहेरच्या व्यक्तीशीं कधींच मिसळत नसे.

पण आज तिला संशय आला. आपल्या वृत्तीवरचा आपला ताबा सुटला आहे असें तिला वाटूं लागलें. निर्धार डळमळला आहे, तर्काचा कठोरपणा लवचिक झाला

आहे अशी शंका येऊन ती बावरली. गोविंदानें बोलायला केव्हां सुरुवात केली हें तिला कळलेंसुद्धां नाहीं—

'मन मोठं जड झालं आहे.' गोविंदा जड वाणीनें म्हणाला, 'चट्कन् रडूं येईल कीं काय अशी भीती वाटते मला. आयुष्यांत मीं कधीं फारसा रडलों नाहीं, एकदांच रडलों होतों. मी चांभाराचा मुलगा म्हणून लोकांनीं सतावलं तेव्हां त्यावेळीं मीं गांजून गेलों होतों, त्यावेळीं मला रडण्याचा हुंदका आला. आज मला कुणीं गांजलं नाहीं—कुणीं त्रास दिला नाहीं—मग असा हा हुंदका कां येतो ? कां मन असं अस्वस्थ होतं ? कां ही अशी तळमळ वाटते ?—'

'त्याला एक कारण आहे,' नर्गीज वडीलकीचा आव आणून म्हणाली, 'जन्मापासून जडवून घेतलेली खोड इथं सुटली. पहिलाच स्नेहसंबंध जोडला गेला. आतां तुमचा धीर चेपेल. एका अनुभवानं बलवान् होऊन नवे लागेबांधे जोडायची बुद्धि होईल अन् मग—मग माझी आठवणसुद्धां तुम्हांला होणार नाहीं!—' तिचा आवाज सद्गदित झाला होता.

पुन्हां कांहीं वेळ दोघेंही स्तब्ध राहिलीं.

दोघांच्याही मनावर दोन प्रकारें आघात झाले होते. नवीन भावनेच्या पहिल्या परिचयानें एकाला हर्षमिश्रित विषाद वाटत होता, तर दुसऱ्याला जुन्या भावनेचें मूळ उखडलें जात आहे या शंकेनें दुःख होत होतें. दोघेंही व्यग्र झालीं होतीं. दोघांनाही वाटत होतें, कीं मन मोकळें करून बोलावें, पण दोघेंही स्वतःला फसवायला पहात होतीं.

'या साऱ्या पुस्तकांची मी यादी करून घेतली आहे,' गोविंदा अगदीं रुक्षपणें म्हणाला, 'बरींच पुस्तकं एकदां पुन्हां वाचलीं पाहिजेत—'

'हींच घेऊन जा ना!'

'पण त्या पुस्तकांवर तुझं नांव लिहिलं आहे ना ?'

'म्हणूनच म्हणतें, कीं घेऊन जा तीं पुस्तकं! तेवढीच माझी आठवण राहील—'

गोविंदा विचारांत पडला. नाहीं म्हणणें त्याच्या जिवावर आलें. पण तीं पुस्तकें

तिचीं आवडतीं होतीं. त्यांतल्या महत्त्वाच्या भागावर तिनें खुणा केल्या होत्या. पुन्हां तीं पुस्तकें तिनें विकत घेतलीं तर त्यांवर पुन्हां वाचून खुणा कराव्या लागतील !

असें वाटलें तरी आभारपूर्वक त्यानें तिचा देणगी स्वीकारली. त्या खुणा त्याला मार्गदर्शक झाल्या होत्या. ती दृष्टिआड झाली तरी तिचें मार्गदर्शन नजरेसमोर राहील अशा कांहींशा अंधुक कल्पनेनें त्यानें तिची देणगी स्वीकारली.

दोघांनाही वाटत होतें, पुष्कळसें बोलावें. पण दोघांचींही मनें जड झालीं होतीं–वाणी भारावली होती. मोठ्या कष्टानें निरोप घेऊन नर्गिज निघून गेली.

विचार करीत गोविंदा किती तरी वेळ स्वस्थ बसला होता. मनाचा भार हलका करायला त्याला दुसरें कुणीच नव्हतें. नर्गिजबरोबर तरी तो इतक्या मोकळ्या मनानें कधीं कुठें बोलला होता ? मित्रशून्य स्थितींत इतकीं वर्षें काढल्याबद्दल त्याला पश्चात्ताप होऊं लागला.

दुसऱ्या गांवीं जाण्यापूर्वी मर्थेे जाऊन त्यानें आपल्या आईची भेट घेतली. तिला सर्व हकिकत कळली होती. ती एक जुन्या काळच्या पुराण्या वृत्तीची बाई होती. जुने आचारविचार नव्या तरुणांना रुचतील असें जरी तिला वाटत नव्हतें तरीही तिच्या सुधारणेला कांहीं मर्यादा होती. त्यानें एकादी मराठ्याची मुलगीसुद्धां पसंत केली असती तरी तिला परवडलें असतें, पण–पारशीण ?—

पारशी म्हणजे कसली जात याची तिला कल्पना नव्हती. ते कुणी तरी किरिस्तांव, मुसल्मान यांच्यासारखेच आहेत असा तिचा समज होता. तिनें पारशी पाहिलेसुद्धां नव्हते. ती म्हणाली, ‘ मी पाहिली असती ही मुलगी म्हणजे बरं झालं असतं. पण तिला मराठी बोलतांसुद्धां येत नाहीं हें कळलं, तेव्हां मला मोठं चमत्कारिक वाटलं. समज, मी चार दिवस येऊन तुझ्या घरीं राहिलें, तर मला तिच्याशीं बोलतांसुद्धां यायचं नाहीं—’

‘ तुझा गैरसमज होतो आई,’ गोविंदा मधेंच म्हणाला, ‘ त्यांत कांहीं अर्थ नाहीं. ती कांहीं इतर मुलींसारखी नाहीं. अजून लग्न करायचं कीं नाहीं हेंसुद्धां तिनं ठरवलेलं नाहीं—’

'मग मला उगीच कां घाबरवलं यांनीं?' ती म्हणाली, 'अगदीं जसं कांहीं ठरलं आहे असंच मला सांगितलं—'

'छे छे, तसं कांहींच नाहीं.' गोविंदा म्हणाला, 'हा जुन्या–नव्यांतला भेद आहे. आम्ही पुष्कळ गोष्टी बोलत असतों; पण त्या सगळ्याच अमलांत यायच्या नसतात. अण्णांचा गैरसमज झाला—'

'शेवटीं काय!' रमाबाई म्हणाली, 'मला सुनमुख पहायचा योग नाहीं तो नाहींच. म्हटलं पारशीण तर पारशीण—माझी कांहीं तशी विरोध करायची इच्छा नव्हती. एकदां मला दाखव तर खरं ही मुलगी! माझ्या मोडक्या भाषेंत चार शब्द सांगतां आले तर पाहीन. मी ऐकलं त्यावरून मला वाटतं, कीं या कांहीं वाऱ्यावरच्या गोष्टी नव्हत. मी ठाव घेऊन पहाणार आहें या प्रकरणाचा!'

'मग असंच करीनास आई,' गोविंदा म्हणाला, 'आतां मला नोकरी आहे ती कांहीं फिरतीची नाहीं; आतां मला असिस्टंट जज्ज म्हणून नेमलं आहे. फिरावंच लागलं तर फार क्वचित्. तेव्हां आतां तूंच ये माझ्याकडे रहायला कांहीं दिवस.'

'मी?' असें म्हणून रमाबाई नुसती त्याच्या तोंडाकडे पहात राहिली.

'कां?' गोविंदा उद्गारला, 'सारा जन्म इथंच राहून तूं कंटाळली आहेस; एकदां मुलाचं वैभव तर पहा—'

'पण तुझी व्यवस्था आहे साहेबी थाटाची! काय वाटेल तें मातीमसण खायला लागला आहेस तूं—सैंपाकीदेखील किरिस्तांव ठेवला आहे म्हणाले—तिथं माझं कसं निभावणार?'

'त्याची काळजी नको तुला. अण्णा आले होते त्या वेळीं त्यांची स्वतंत्र व्यवस्था मी ठेविली होतीच कीं नाहीं, तशीच तुझीही ठेवीन—'

रमाबाईला ती कल्पना मनापासून आवडली. मुलाचें वैभव आपण पहावें असें कोणत्या आईला वाटणार नाहीं? अण्णासाहेब येणें शक्य नव्हतें. त्यांची वकीली जोरांत चालली होती.

रमाबाईनीं गोविंदाबरोबर जायचें असें उभयतांच्या विचारानें ठरलें.

## प्रकरण ९ वें.

या नव्या जागीं बिऱ्हाड थाटल्यापासून गोविंदाच्या आयुष्याला निराळें वळण लागलें. कौटुंबिकतेची छाया त्या घरावर पसरली गेली होती. माणसें दोनच खरीं, पण पूर्वीच्या एकलकोंडेपणापेक्षां या दोन माणसांच्या संसारानें गोविंदाच्या जीवनांत क्रान्ति घडून आली होती. आईच्या सुखसोईची काळजी घेण्याचा ध्यास लागल्यामुळें त्याच्या वृत्तींत पालट झाला होता.

पूर्वी घरीं आल्याबरोबर कसलें तरी पुस्तक घेऊन वाचीत बसणें किंवा क्लबांत जाणें याखेरीज दुसरा कोणताच ध्यास त्याला नसे. पण आतां घरीं आल्याबरोबर बंगल्याच्या गच्चीवर रमाबाईबरोबर बोलत बसण्यांत त्याचा काळ मोठ्या आनंदांत जात होता.

रमाबाईला मात्र अगदीं एकाकीं वाटत असे. आपल्या गांवीं असतांनासुद्धां गांवच्या लोकांत ती फारशी मिसळत नसे खरी, पण आपण गांवांत आहों हें तिकडे जाणवत असे. प्रस्तुतचा बंगला अगदीं गांवाबाहेर असल्यामुळें शेजार कुणाचाच नव्हता. आजुबाजुला जे बंगले होते ते एकमेकांपासून बऱ्याच अंतरावर होते. शिवाय त्या बंगल्यांत रहाणारे ऑफिसरसुद्धां साहेबलोकच होते. गांवच्या वकील मंडळीपैकीं कांहींजणांच्या बायकांनीं रमाबाईंना आपल्या घरीं बोलावण्याचा उपक्रम केला. क्वचित्

ती तशी जातही असे, पण वारंवार जाणें तिला आवडत नसे. गोविंदालाही तें पसंत नव्हतें. अशा रीतीनें केलेल्या परिचयाचा वकीललोक गैरफायदा घेतील असें जें त्याला वाटत असे तें खोटें नव्हतें.

आईला बरोबर घेऊन रोज तो मोटारींतून फिरत असे. रोज ती त्याच्याबरोबर कुठें तरी माळावर जाऊन बसून गप्पागोष्टी करीत असे. कोर्टाचे खटले ऐकण्याची तिला संवय होती. चालत असलेल्या खटल्याबद्दल तो केव्हां केव्हां तिच्याशीं चर्चाही करीत असे.

या नव्या संसारामुळें गोविंदाच्या पूर्वीच्या रुक्ष जीवनांत एक प्रकारचा ओलावा आला होता. या संसारी जीवनाचा त्याच्या वृत्तीवरही परिणाम झाला होता. रमाबाईलाही हा संसार नव्या प्रकारचा होता. गांवीं असतांना ती आपला संसार पहात होती, पण त्या संसारांत वैभव नव्हतें. रस्त्यावरून ती जाऊं लागली तर 'जज्जसाहेबांची आई' म्हणून तिकडे कुणी तिच्याकडे पाहून बोट दाखवीत नसे. गांवीं वकीलांत आणि इतर गृहस्थांत कुणी फारसा फरक पहात नसत. इथें ती मोटारींतून हिंडत होती—रस्त्यांतून जातांना गोविंदाबरोबरच तिला 'सलाम नमस्कार' घ्यावे लागत. अशा वेळीं तिचें हृदय अभिमानानें फुलून येई.

कांहीं दिवस या नव्या अनुभवाचें तिला चोज वाटलें. पण पुढें पुढें तिला कंटाळा येऊं लागला. पुन्हां गांवीं जावेंसें वाटूं लागलें. ती ज्या उद्देशानें आली होती तो उद्देश सफल होण्याचें लक्षण तिला दिसेना.

मोठमोठ्यांच्या मुली सांगून येत होत्या— कित्येकजण आपल्या मुलींना आणून तिच्याजवळसुद्धां ठेवण्याला तयार होते, पण गोविंदाला तें पसंत नव्हतें. त्या गांवांत कांहीं श्रीमंतांच्या मुली होत्या—चांगल्या शिकलेल्या होत्या—पण गोविंदाचें वैभव अनुभवल्यानंतर त्या त्याच्या तोलाच्या आहेत असें तिला वाटेना.

शेवटीं एक दिवस ती गोविंदाला म्हणाली, 'इतके दिवस झाले, मी ज्यासाठीं आलें तें कांहीं साध्य झालं नाहीं ! तुझी ती पारशीण कुठं आहे तिला बोलावून घे ना एकदां—'

गोविंदा विचारांत पडला. तिचा आणि त्याचा पत्रव्यवहार सुरू होता. आपली आई आपल्याजवळ येऊन राहिल्याचें त्यानें तिला कळवलें होतें. यापलीकडे त्याला जास्त कांहीं लिहितां येणें शक्य नव्हतें. त्याची ती वृत्तीच नव्हती. पण आतां आईनें प्रश्न टाकल्यावर त्याला वाटल, एकदां तिला बोलवावें. तो म्हणाला, ' मी पहातों लिहून तिला; येणं कांहीं तिच्या हातचं नाहीं. हल्लीं ती मुंबईला गेली आहे. पण इथं यायला तिला बापाची परवानगी घ्यावी लागेल. मला वाटत नाहीं, कीं तो परवानगी देईल म्हणून. तरीही तुझी तशी इच्छा आहे म्हणून लिहितों. '

पत्र लिहिलें—पण दोन आठवडे त्याचें उत्तर आलें नाहीं. त्याच्या कोणत्याही पत्राचें उत्तर पाठवायला तिनें कधींच इतका उशीर लावला नव्हता. तिला बोलावण्यांत आपण अतिप्रसंग तर केला नाहीं ना, अशी शंका त्याच्या मनांत आली.

या गांवीं येऊन त्याला आतां जवळ जवळ सहा महिने झाले होते. बरोबरीच्या ऑफिसर लोकांत एकदोघे हिंदी होते, पण तेही अविवाहित होते—कुटुंबवत्सलसुद्धां नव्हते. ते दोघेही सिंधी होते. केव्हां केव्हां ते त्याच्या बंगल्यावर येत असत, तोही केव्हां केव्हां त्यांच्या बंगल्यावर जाई, पण त्या भेटी औपचारिक होत्या. गांवांतील लोकांशीं संबंध ठेवायचा नाहीं असा त्याचा निर्धार होता, त्यामुळें पूर्वीच्या जिल्ह्यांतलें वातावरण या ठिकाणीं त्याला अनुभवतां आलें नाहीं.

शिवाय ऑफिसचें कामही फार होतें. बरेच दावे शिल्लक पडल्यामुळें त्यांचा निकाल करण्यासाठीं त्याची नेमणूक करण्यांत आली होती. त्यांतील बहुतेक काम त्यानें आटोक्यांत आणलें होतें. त्यामुळें आतां त्याला बरीच फुरसतही मिळूं लागली होती.

नर्गिजकडून पत्राचें उत्तर आलें नाहीं म्हणून तो अस्वस्थ झाला असतां एके दिवशीं ती स्वतःच त्याच्या बंगल्याच्या दाराशीं दत्त म्हणून उभी राहिली. तो आश्चर्यचकित झाला ! रमाबाईला पहातांच तिनें तिच्या पायावर डोकें ठेवलें. नमस्कार करतांच तिलाही कौतुक वाटलें. पारशी म्हणजे कुणी तरी अगदींच विदेशी लोक असा तिचा समज होता. पण हिंदूंचे आचार तिला माहीत आहेत असें पाहून पहिल्याच भेटीला ती खूष झाल्यासारखी दिसली.

गोविंदाला आश्चर्य वाटलें तें एका गोष्टीचें—नर्गिज मराठी बोलूं लागली होती.

रमाबाई म्हणाली, 'हें रे काय गोंदु, तूं मला सांगितलेंस कीं हिला आपली भाषा येत नाहीं म्हणून, नि ही आमची भाषा चांगली आपल्यासारखी बोलते ! —

'ही तिची नवी कमाई आहे आई !' गोविंदा म्हणाला.

'होय.' नार्गिज म्हणाली, 'महाराष्ट्रांत रहायचा योग आला आहे, मग मराठी कां शिकूं नये ? आमची मूळची भाषा तरी आम्ही कुठं बोलतों आहोंत ? परदेशांतून आम्हीं गुजरातेंत आलों. आम्ही गुजराती भाषा पत्करली. मुंबई महाराष्ट्रांत आहे—खरं म्हटल्यास यापूर्वीच आम्हीं मराठी भाषा उचलायला हवी होती. आमच्या बाबांनीं बरींच वर्षे महाराष्ट्रांत काढलीं. रोग्यांबरोबर ते मराठींत बोलतात. पण ती कांहीं अस्सल मराठी नव्हे, हें जेव्हां माझ्या ध्यानीं आलं तेव्हां मी मराठ्यांसारखं मराठी बोलायचं ठरवलं. अगदीं 'च'चे उच्चारसुद्धां बरोबर करूं लागलें, नाहीं ?'

'खरंच,' रमाबाई म्हणाली, 'त्याचंच मला आश्चर्य वाटलं. अन् हा म्हणाला तुला मराठी यायचं नाहीं म्हणून !'

'इंग्रजी येतं, फ्रेंच येतं, जर्मन येतं; गुजराती माझी मातृभाषाच—मग मराठीच तेवढं कां येणार नाहीं ?' नर्गिज उद्गारली.

गोविंदा विचार करीत होता, नर्गिज मराठी कां शिकली ? नुसती मराठी भाषेच्या अभिमानानें ? मुंबई महाराष्ट्रांत आहे म्हणून ? आणि मुंबई तरी तिचें माहेरघर कुठें होतें ? स्वतःचें घर म्हणायला तिला कुठेंच नव्हतें. तिचे वाडवडील मुंबईत भाड्याच्या घरांत रहात आले होते.

पण तें भाड्याचें घर त्यांना आपल्या घरासारखें वाटे. मुंबई आपली मायभूमी असें वाटे. त्या 'वास्तूला' महत्त्व नव्हतें—महत्त्व होतें तें मुंबईच्या 'भूमीचें'–अभिमान होता तो मुंबईचा. पण मुंबई म्हणजे महाराष्ट्र हें तिच्या वाडवडिलांना माहीत नव्हतें. तिला तें कळलें म्हणूनच ती मराठी शिकली.

गोविंदाला वाटलें, एवढेंच का त्याचें कारण ?

नर्गिजला मराठी बोलतां येतें हें पाहून रमाबाई आनंदित झाली. कोणत्याही मराठी मुलींपेक्षां तिच्यांत रमाबाईला फरक दिसला. मराठी घराण्यांच्या आचाराप्रमाणें तिची चालचलणूक तिला अतिरेकाची वाटली. नर्गिज तिचा हात धरीत असे, तिच्या खांद्यावर हात ठेवीत असे, तिला कवटाळून धरीत असे, अगदीं मोकळ्या मनानें बोलतांना आणि थट्टाविनोद करतांना हंसत हंसत तिच्या अंगावर कोसळून पडत असे—हें सारें रमाबाईला आवडत होतें. पण तिला प्रश्न पडे तो हाच, कीं तिची पोटची मुलगीसुद्धां या वयांत तिच्याशीं इतक्या मोकळेपणानें वागली नसती.

नर्गिजची ही वागणूक रमाबाईला आवडत नव्हती असें नाहीं, पण हे आचार आपले नव्हत ही जाणीव तिच्या मनांतून नाहींशी होईना.

वात्सल्याचा एवढा प्रत्यक्ष आविर्भाव दाखवायला तिच्या आयुष्यांत कधींच संधि आली नव्हती. नर्गिजच्या त्या प्रेमळपणामुळें पूर्वसंस्कारानें उत्पन्न झालेल्या संकोचाचा हळू हळू लोप होऊं लागला. तिला जवळ घेऊन कवटाळून बसण्यांत रमाबाईला आनंद वाटूं लागला. परजातीला शिवल्यामुळें विटाळ होण्याची कल्पनाही एकाएकीं तिच्या मनांतून नाहींशी झाली.

गोविंदापेक्षां नर्गिज रमाबाईशींच जास्त बोलत बसत असे. तिनें आपल्या आयुष्यांत घडलेल्या साऱ्या प्रसंगांची हकीकत अगदीं मोकळ्या मनानें सांगितली तेव्हां रमाबाईला जितकें आश्चर्य वाटलें तितकाच आनंद झाला.

नर्गिज देखणी होती. पारशी मुलींत बहुधा दिसून येणारें नाकाचें आणि दांतांचें वैगुण्य तिच्या ठायीं नव्हतें. कुंकू नसल्यामुळें आणि उलटा पदर असल्यामुळें जेवढा कांहीं परकेपणा वाटत होता तेवढाच. पण चारसहा दिवसांच्या अवधींत तोही भेद रमाबाईला जाणवेनासा झाला.

त्या दोघींनीं गोविंदाला एक प्रकारें वाळींत टाकलें होतें. गोविंदा घरीं असला तरी त्या दोघी दिवाणखान्याच्या एका कोपऱ्यांत बसून कुजबुजत असत. गोविंदाला त्यांचा मत्सर वाटे. पण आईनें बोलावल्याशिवाय गोविंदा केव्हांच त्यांच्या बैठकींत मिसळत नसे.

एका अर्थी त्याला हा सारा प्रकार आवडत होता. नर्गिजनें आपल्या आईचें मन काबीज केलें तर—

गांवांत मात्र या गोष्टीचा मोठा बभ्रा झाला होता. पारशाच्या मुलीला घेऊन ही ब्राह्मणबाई फिरते याचें सर्वांनाच वैषम्य वाटत होतें. विशेषतः गांवच्या श्रीमंतांना—त्यांतूनही विशेषतः ज्या श्रीमंतांनीं आपल्या मुलीबद्दल रमाबाईकडे शब्द टाकला होता त्यांना.

'एवढी म्हालम्हातारी ब्राह्मण बाई, आपला धर्म विसरून एका चवचाल पारश्याच्या पोरीला घेऊन हिंडते! त्यांतून लग्न न झालेली मुलगी—कदाचित् साहेबांशीं पूर्वींच कांहीं तरी सूत जुळलेलें असेल!'—सर्वांना चीड येत होती ती याच गोष्टीची, कीं या अनाचारांत ही म्हातारी सामील कशी?

आणि मग लोक मुळाला हात घालूं लागले. गोविंदाचा पूर्वेतिहास ज्यांना माहीत होता ते म्हणूं लागले, 'अहो किती झालं तरी सांपडलेलं कारटं! हें कांहीं अस्सल ब्राह्मणाचं बीज नव्हे. नाळ तोडण्यापूर्वी आणून पाळला म्हणून ब्राह्मण म्हणायचं, एवढंच. आणि असल्या माणसाला तुम्ही आपल्या मुली सांगून जात होतां! असला मुलगा कुठं तरी 'असलीच' मुलगी शोधायचा. पण आश्चर्य वाटतं तें या बाईचं, ही कशी एवढी तिला भाळली अगदीं? कशा हंसत खिदळत जात असतात! जशा कांहीं पाठल्यापुढल्या बहिणीच! चांगली धर्मनिष्ठ बाई म्हणून आम्हीं समजत होतों—दानधर्म, व्रतंवैकल्यं सारं कांहीं यथास्थित करीत होती. पण आतां हिच्या घरीं धर्मकर्म करायला जायला आम्हांला संकोच वाटूं लागलाय!'

गांवांत चालत असलेल्या ह्या कुटाळक्या रमाबाईच्या कानीं येत नव्हत्या. तरीही वस्तुस्थिति तिला जाणवत होती. नर्गिजला घेऊन आपण फिरतों हें लोकांना आवडायचें नाहीं याची तिला कल्पना होती.

पण त्या प्रेमळ मुलीनें रमाबाईच्या अंतःकरणांतील झांकून पडलेल्या वात्सल्याच्या ठिणगीवर फुंकर घातली होती. तिचें आकर्षण रमाबाईला अनावर झालें होतें.

रमाबाईला वाटे, 'आपल्याला एकादी मुलगी असती तर!—

## प्रकरण १० वें.

नर्गिजला बरोबर घेऊन गांवांतून फिरूं लागल्यापासून रमाबाईबद्दल गावच्या लोकांचें मन कलुषित होऊं लागलें. साहेबांची आई म्हणून यापूर्वी तिला गांवांतल्या मोठमोठ्या लोकांकडून मुद्दाम आमंत्रणें येत असत. पण आतां तिची ओळख दाखवायलादेखील गांवची मंडळी माघार घेऊं लागली.

ती परिस्थिति रमाबाईच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. सहज बोलतांना हा विषय निघाला, तेव्हां गोविंदा म्हणाला, 'काय करायचंय् आपल्याला गांवच्या लोकांशीं ? जेवढा त्यांचा संबंध न येईल तेवढाच बरा. उगीच कुणाचे वशिले यायला नकोत.'

'तसं नव्हे रे,—' रमाबाई म्हणाली, 'कांहीं झालं तरी आम्ही गृहस्थ माणसं. सणसुदीन आहे, कार्यप्रस्थान आहे, एकमेकांच्या घरीं एकमेकांनीं जावं असं वाटत असतं आम्हां लोकांना. आधीं हे तुमचे बंगले म्हारवड्यासारखे गांवाबाहेर— त्यांतून तुम्ही साहेबलोक म्हणजे गांवापासून फटकून वागणारे—गांवचे लोकसुद्धां निष्कारण तुमच्या घरीं यायला भितात ! मी आपली गांवांत वागलेली बायको, —किती दिवस अशी एकातांत राहूं ? आतां ही नर्गिज आहे इथं, म्हणून घरांत बोलायला तरी कोण आहे ! —पण ती नसती आली तर तुरुंगांतल्या कैद्यासारखं

इथं मला डांबून रहावं लागलं असतं. मधून मधून कुणी बोलावीत होतीं गांवांत, म्हणून तेवढाच विरंगुळा वाटत होता. आतां तूं एकदां लग्न तरी कर —! नाहीं तर मला तरी गांवीं जाऊं दे.'

रमाबाईच्या बोलण्याचा गोविंदाच्या मनावर फार चमत्कारिक परिणाम झाला: नर्गिज जवळच बसलेली होती; पण ती एक शब्दही बोलली नाहीं. ती कांहीं तरी बोलेल या अपेक्षेनें गोविंदानें तिच्याकडे पाहिलें; पण ती चेहरा निर्विकार करून स्वस्थ बसून राहिली होती.

गोविंदा तिथून उठून गेला, त्यामुळें बोलणें तेवढेंच राहिलें.

तो निघून गेल्यावर नर्गिज रमाबाईला म्हणाली, 'जरा मनाला लागलेलं दिसतं त्यांच्या! उगीच लग्नाची गोष्ट कशाला काढतां?'

'तें तुला कळायचं नाहीं.' रमाबाई म्हणाली, 'आमचा जीव आसावलेला असतो. पोटचं मूल झालं नाहीं म्हणून आधींच माझा जीव पिचत असलेला—आतां वाटलं, पोसका कां होईना, मुलगा कर्तासवरता झाला, तेव्हां सुनमुख पहायची मला घाई झाली तर तो काय माझा अपराध? तिकडे घरींही गडगंज आहे—इथं यालाही चांगला पगार मिळतो. संपत्ति आहे तिथं संतति नसते असं म्हणतात, तें खरं वाटूं लागतं. आतां या वयांत नातवंडं घेऊन खेळवावीं असं मला वाटूं लागलं तर तो माझा दोष का? कुणी सांगावं, आज आहे उद्यां नाहीं—डोळे उघडे आहेत तोंपर्यंत घरांत चार मुलं रांगतांबागडतांना दिसलीं कीं जिवाचं सार्थक झालंसं वाटेल!'

'तें कुणाच्या हातचं का आहे?' नर्गिज म्हणाली, 'तसं असतं तर तुम्हालाच हा मुलगा दत्तक कां घ्यावा लागला असता?'

रमाबाईला तो प्रश्न आवडला नाहीं. ती उगीच राहिली. नर्गिजच्या तें ध्यानीं आलें.

नर्गिज म्हणाली, 'तुम्हाला काय वाटतं तें मला कळतं, पण या योगायोगाच्या गोष्टी आहेत. आपल्याला खरी उणीव कशाची भासत असते हें निश्चितपणें कळत नाहीं. मुलं होणं कांहीं कुणाच्या हातचं नाहीं. पण आपल्या मुलानं लग्न करावं असं नुसतंच वाटत असेल तर ती गोष्ट निराळी. पूर्वीच्या माणसांना तसं वाटे. आपल्या

मुलांवर आपला विश्वास नसतो असं नाहीं, तरी पण तीं साशंक असतात. तरुण मुलं आडमार्गाला जातील असं त्यांना वाटत असतं. ती खबरदारी घेण्यासाठीं म्हणून लग्न करायचीं टुमणीं तीं आपल्या मुलांच्या मागं लावतात. आमच्या जातींत देखील असेच प्रकार घडले आहेत. सतरा अठरा वर्षांच्या मुलांचींसुद्धां आमच्या जातींत लग्नं झालेलीं आहेत, तीं अशींच आईबापांच्या हट्टामुळं. पण त्याचे परिणाम चांगले होतातच असं नाहीं. मुलगा आडमार्गाला जायचा तो जातोच नि एकाऐवजीं दोन जीवांचं मातेरं होतं.—'

थोडा वेळ थांबून ती म्हणाली, 'आणि आमच्याकडे दुसरंही एक कारण असतं. लग्न करणं ही आमच्याकडे इस्टेट मिळवायची एक बाब असते. तेवढ्यासाठीं अशीं हीं लग्नं होतात. मला वाटतं तुम्हीं उगीच त्यांना सक्ती करूं नका—'

रमाबाई चटकन् उठली, नर्गिजच्या समोर येऊन उभी राहिली अन् म्हणाली, 'तूंच कां नाहीं लग्न करीत त्याच्याशीं?'

'मी?' नर्गिज गंभीर होऊन म्हणाली, 'मग जातीचं काय?'

'जातीचं राहूं दे,' रमाबाई नर्गिजजवळ बसत म्हणाली, 'जातीपेक्षां मला गोविंदाच्या सुखाची चाड जास्त आहे. मला वाटतं गोविंदाचं तुझ्यावर फार प्रेम आहे. तुझ्याशीं लग्न करण्यांत त्याला जर सौख्य होत असेल तर मीं जगाचीसुद्धां पर्वा करणार नाहीं! फार काय, तिकडच्या मताचीसुद्धां पर्वा करणार नाहीं.—'

ही जुन्या काळची बायको इतकें अंतःकरण पिळवटून बोलते आहे असें पाहून नर्गिजच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. चटकन् होय म्हणून जावें, असेंसुद्धां तिला वाटलें; पण हा उभ्या आयुष्याचा प्रश्न होता!

तिची वृत्ति भावनात्मक नव्हती. कोणतीही गोष्ट करतांना भविष्यकाळाचा पूर्ण विचार केल्याशिवाय कोणताच अविचार करूं नये असें तिचें ठाम मत झालेलें होतें. गोविंदाबद्दल तिच्या मनांत आदर होता-प्रेम ती जाणत नसे-प्रेमावर आपला विश्वास नाहीं असें ती उघड उघड बोलून दाखवी.—

आणि रमाबाई तर प्रेमाची गोष्ट बोलत होती. जिचें लग्न अगदीं लहानपणीं झालेलें

ती ही जुन्या काळची, जुन्या मताची बाई आज प्रेमाच्या गोष्टी बोलते आहे याचें नर्गिजला आश्चर्य वाटलें.

नर्गिज कांहींच बोलत नाहीं असें पाहून रमाबाई म्हणाली, ' तो कांहीं बोलणार नाहीं. त्याचा स्वभाव मी जाणतें. अगदीं लहान होता तेव्हांपासून पहातें आहें, शाळेंतल्या पोरांनीं छळ केला तरी कित्येक दिवस त्यानं मला सांगितलं नाहीं. झुरून आजारी पडला तेव्हां कुठं मला कळलं. आज देखील तो कांहीं बोलायचा नाहीं—मीं विचारलं तरी सरळ उत्तर द्यायचा नाहीं. म्हणूनच तुला सांगतें आहें. माझी एवढी काकुळती ध्यानीं घे. मला वाटतं, माझ्या मुलाचं आयुष्य सुखाचं व्हायला तुझी जोड पाहिजे. त्याला सुखी कर. संशय वाटत असला, संकोच वाटत असला तरी देखील नाहीं म्हणूं नकोस. बायकांची जात मोठी विलक्षण असते. पुरुषांना कळत नाहीं त्यांचं अंतरंग ! मला ठाऊक आहे, तो विद्वान् असला तरी दुबळा आहे—अधिकारी असला तरी पांगळा आहे. त्याला सांवरून धरणारी कुणी तरी पाहिजे. त्याचं मन मोठं हळवं आहे. तरुण मुलं आपली अंतरींची वेदना आईला सांगत नाहींत. मन उघडं करायला एका वयाचीं माणसं जोडीला यावीं लागतात. त्यानं कुणी मित्र जोडले नाहींत अन् या सरकारी आयुष्यांत त्याला मित्र जोडतां यायचे नाहींत. म्हणून म्हणतें, तुझ्यासारखी जोडीदारीण त्याला पाहिजे तरच त्याचा पुढं निभाव लागेल. तो माझा पोटचा गोळा नव्हे–जोडलेली माया आहे खरी—पण हें आईचं हृदय बोलतं आहे. तिथं आपला परका असा भाव नसतो. आई ती सर्वत्रांचीच आई ! तूंदेखील जातीची आई आहेस—म्हणूनच तुला सांगतें आहें, एवढा माझा मुलगा पदरांत घे अन् त्याला सुखी कर ! '

नर्गिजच्या डोळ्यांतून टपाटप आंसवें गळूं लागलीं. सुप्त असलेली एक अनिर्वच-नीय भावना रमाबाईच्या भाषणानें तिच्या हृदयांत जागी झाली. कवि आणि कथाकार ज्या प्रेमाचें वर्णन फुलवलेल्या भाषेंत करीत असतात तसलें तें प्रेम नव्हतें. तें वात्सल्य होतें—मातृवात्सल्य होतें. त्या वात्सल्यांत वडीलकीचा कठोरपणा नव्हता. समानता नव्हती. नर्गिजला प्रश्न पडला, ती अनुकंपा होती का ? दुबळ्या जीवा-बद्दलची दया होती का ? बलवानानें निर्बलाला द्यायचें तें आश्वासन होतें का ?

नर्गिजला वाटलें, चटकन होय म्हणून जावें. तो शब्द तिच्या ओठांशीं आला— तरीही तिनें आत्मसंयमन केलें.

ती विचारी होती—अतिविचारी होती. प्रत्येक गोष्ट अगदीं काटेकोरपणें छानून पहाण्याची तिची प्रवृत्ति सर्वसाधारण नव्हती. त्या असाधारण प्रवृत्तीनें तिला आत्मसंयमन करण्याचें सामर्थ्य दिलें.

ती म्हणाली, 'तुमचा भावार्थ मला कळला. इतक्या काकुळतीनं तुम्हीं बोलत असतांही मी अजून कठोर राहूं शकलें याचं तुम्हाला आश्चर्य वाटेल, पण मला परिस्थिति पडताळून पाहिली पाहिजे. मीजात गोविंदरावांच्या ओळखीची नाहीं. पहिली ओळख काय ती माझीच. इतरांशीं त्यांचा संबंध फारच क्वचित् आला. अजून त्यांच्या मनाचा ठाव मला लागला नाहीं. अजून माझाही त्यांना पुरा परिचय झाला नाहीं. लग्नाच्या बंधनांत पडावं कीं न पडावं हें मींही अजून ठरवलेलं नाहीं. मी गोविंदरावांच्या वडिलांना सांगितलं तेंच तुम्हालाही सांगतें, कीं लग्न करावं असं मीं ठरवलं तर मी तुमचीच सून होईन.'

रमाबाई गंभीर झाली. या उत्तरानें तिचें समाधान झालें नाहीं. तिची अपेक्षा अगदींच वेगळी होती. जातीचा आणि धर्माचा प्रश्न विसरून आपण कबुली दिल्यावर नर्गिज एकदम 'होय' म्हणेल असें तिला वाटलें होतें. बुद्धिप्रधान तरुणांची मनोरचना तिच्या परिचयाची नव्हती म्हणूनच तिची निराशा झाली.

गोविंदाची भेट झाली त्या वेळीं झालेली सर्व हकिकत नर्गिजनें त्याला सांगितली. ती ऐकून तो अस्वस्थ झाला. आपल्या मानीव आईनें आपलें अंतरंग इतकें पुरेपूर ओळखलें कसें याचें त्याला आश्चर्य वाटलें. रक्ताचें नातें असल्याशिवाय अंतरींचा जिव्हाळा उत्पन्न होत नाहीं असा त्याचा समज होता. पण या प्रकारामुळें तो त्याचा समज डळमळूं लागला. रमाबाईबद्दल त्याच्या मनांत प्रत्यक्ष रक्ताच्या आईइतकेंच प्रेमाचें नातें निर्माण झालें.

तो नर्गिजला म्हणाला, 'माझी मनःस्थिती तुला सांगतां येणं शक्य नाहीं. या अफाट जगांत मी एकटाच, असा माझा समज होता. जगांतील प्रत्येक व्यक्तीपासून

आजवर मीं दूर रहात आलों. तूं होऊन माझा परिचय करून घेतलास हा अपराध तुझा आहे. या तुझ्या अपराधामुळं माझ्या मनांत नव्या आकांक्षा निर्माण झाल्या. जगाशीं माझा संबंध येत नाहीं-यावा असा प्रयत्न मीं करीत नाहीं. मी आपला आपल्याशींच चोर होऊन बसलों आहें. मन मोकळं करायला मला कुठं आधार नाहीं. आईबापसुद्धां परकी.-परक्याचंच प्रेम जर संपादन करायचं तर वयाची आणि बुद्धिची तरी समता पहावी असं मला अलिकडे वाटूं लागलं होतं. तूं होऊन इथं आलीस—मी बोलावतांच आलीस—याचं मला कौतुक वाटलं—तूं मुद्दामच आलीस असं मला वाटलं. तुझी वृत्ती स्वतंत्र आहे—वडिलांचा जोरासुद्धां तुला सहन होत नाहीं, हें मीं पाहिलं आहे. आई म्हणाली तें कांहीं खोटं नाहीं—मी अपंग आहें, दुबळा आहें, जगाच्या न्याय मी निवडतों पण मी कोणत्या न्यायाधीशासमोर उभा राहूं? मींही अपराधी आहें. मीं जगाशीं फटकून वागलों आहें. मीं जगाची बेपर्वा केली नाहीं, पण जगांतल्या कोणत्याही व्यक्तीशीं मीं जिव्हाळ्याचं नातं जोडलं नाहीं, हाही माझा अपराध आहे. ती वृत्ती माझ्या रक्तांत नाहीं. मीं असा कां झालों हें माझं मलाच कळत नाहीं. परिस्थितीनं मला असं बनवलं, कीं तो माझा जन्म-जात दोष आहे, हें सुद्धां मला कळत नाहीं. म्हणूनच मीं गोंधळून गेलों आहें. मला कुणाचा तरी आधार पाहिजे आहे—कुणी तरी मला सावरून धरलं पाहिजे आहे—कुणी तरी मला माणसांत आणलं पाहिजे आहे. अन् तसं करण्याचं सामर्थ्य फक्त तुलाच आहे असं मला वाटतं—'

त्याचा आवाज अवरुद्ध झाला. त्याला पुढें बोलतां येईना.

नर्गिजच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा वाहूं लागल्या.

## प्रकरण ११ वें.

फार दिवस तिथें रहावें असें जरी नर्गिजच्या मनांत होतें तरीही लोकदृष्टया तें योग्य झालें नसतें म्हणून तिनें जाण्याचा उपक्रम केला. तिला निरोप देणें रमाबाईच्या जिवावर आलें होतें. त्या दोघांचा मोठा लोभ जडला होता.

रमाबाई म्हणाली, 'असं पहा मुली, आईच्या जिवाला मुलापेक्षांही मुलींची आवड जास्त असते. मुलगा व्हावा असं तिला वाटत असतं तें नुसतं व्यवहाराच्या दृष्टीनं. नांव चालवायला कुणी तरी आधार पाहिजे म्हणून. तेंदेखील तिला स्वतःला तसं वाटत असतं, कीं घरच्या कर्त्या माणसाची तशी इच्छा असते म्हणून वाटत असतं, हेंही सांगतां यायचं नाहीं. ज्याला त्याला आपल्या जातीचा अभिमान असतो—आपल्या जातीकडे जो तो जास्त मोकळ्या मनानं बोलतो, तसंच आहे हें. मी पाहिलं आहे, कीं मुलापेक्षां आई मुलीजवळच मन मोकळं करून बोलत असते. मुलगा म्हटला कीं तिला तो कर्ता पुरुष वाटतो—वरिष्ठ वाटतो—वयानं लहान असला तरीसुद्धां मोठा माणूस वाटतो. तसं मुलीचं नाहीं. म्हणूनच मुलीजवळ आई मन जास्त मोकळं करून बोलते—अर्थातच मला हा अनुभव नाहीं, पण मीं पाहिलं आहे. पूर्वी अनुभव नव्हता—आतां अनुभव आला. तुम्हां दोघांचीही माया म्हणजे लावून घेतलेली. पण तुझ्याशीं मीं जितकी मोकळ्या मनानं बोललें तितकं मला

गोविंदाशीं बोलावंसं वाटत नाहीं. लहानपणापासून गोविंदाची माया लावून घेतलेली; तूं ही आत्तांच आलीस—आत्तांच परिचय झाला—पण लोभ जडला तो मात्र जसा केव्हांपासूनचा ! असं आहे हें आईचं मन !—' नकळत डोळ्यांत येणारीं आंसवें हळूच पुसून ती पुढें म्हणाली, ' तुझी जातसुद्धां वेगळी—आम्ही लोक तुम्हांला शिवतसुद्धां नाहीं. गांवीं असतांना तुला शिवलें असतें तर मला आंघोळ करावी लागली असती. पण या इथं आपण कशीं जंगलांत राहिल्यासारखीं आहोंत ! सरकारी अधिकाऱ्यांनीं वसवलेलं हें भर गांवांतलं जंगल, हें कांहीं दिवस तरी सुखाचं वाटलं. गांवांतील लोक कुटाळक्या करीत असतील; पण त्या कांहीं कानीं येत नाहींत. आठवणच नाहींशी होते गांवांतल्या माणसांची. एका अर्थी बरं वाटतं हें आयुष्य—' नर्गिजला जवळ ओढून घेऊन ती म्हणाली, ' आतां मी म्हातारीच झालें आहें म्हणेनास, अशा वेळीं हें आयुष्य बरं वाटतं. आपले जनाचे व्याप विसरून जाऊन जंगलांतल्या पर्णकुटींत रहाण्यासारखं हें इथलं रहाणं मला बरं वाटतं खरं, पण तुझ्यासारख्या तरण्याताठ्या मुलीला, मला नाहीं वाटत तें आवडेल म्हणून ! त्यांतून तूं ही अशी—जगाला गवसणी घालायची हांव आहे तुला—ती तूं या सरकारी जंगलांत कशी रहाणार ? पुन्हां पुन्हां वाटतं, कीं तुम्हां दोघांचं जमून जावं—जुने संस्कारसुद्धां आतां येत नाहींत माझ्या मनांत ! पण लगेच वाटतं, हें असलं कोंडवाड्यांतलं आयुष्य तुला कांहीं रुचायचं नाहीं—' एक मोठा सुस्कारा टाकून ती म्हणली, ' आणि हें तर गोविंदाच्या आयुष्याला खिळलं आहे—'

नर्गिजचें हृदय भरून आलें होतें. उभ्या आयुष्यांत प्रत्यक्ष तिच्या आईनेंसुद्धां तिला एवढ्या वात्सल्यानें वागवलें नव्हतें. सरकारी अधिकाराचा बडेजाव तिच्या आईच्या अंगीं एवढा खिळला होता, कीं स्वत:च्या मुलांशीं वागतांनासुद्धां ती करडा अंमल गाजवीत असे. प्रत्यक्ष नवऱ्यावरसुद्धां तिचा अधिकार गाजत असलेला पाहिला म्हणजे मुलांना तिच्याबद्दल माया वाटण्याच्या ऐवजीं भीति वाटत असे.

म्हणूनच नर्गिजला हा अनुभव हृद्य वाटला. कांहींही होवो, पण शक्य तेवढें त्या बाईच्या सहवासांत रहावें, तिच्या प्रेमळ स्वभावाच्या पांखरीखालीं वाढावें, वेळीं—प्रसंगीं

तिच्या सल्ल्यानें चालावें—क्वचित् भांडावें आणि पुन्हां तिचे पाय धरावे—अशा किती तरी गोड कल्पना क्षणार्धांत तिच्या अंतर्दृष्टीसमोरून निघून गेल्या.

तिला भडभडून आलें, आणि रमाबाईच्या गळ्याला मिठी घालून ती उसासे टाकीत रडूं लागली.

'उगी उगी, पोरी!' तिच्या डोक्यावरून हात फिरवीत रमाबाई म्हणाली, 'घटकाभर हें असं वाटतं, पण जगाच्या बाजाराच्या गर्दींत आपण घुसलों कीं हा सारा कोंवळेपणा करपून जातो. तुझं नाहीं व्हायचं तसं—मीं तर ही अशी एकलकोंडीच आहें—आणि असं वाटतं—'

क्षणभर थांबून रमाबाईनें आपल्या पदरानें तिचे डोळे पुसले. आपल्या दोन्ही हातांत तिचा चेहरा धरून, भरून आलेल्या तिच्या डोळ्यांकडे पहात ती म्हणाली, 'सारं मनांत येतं खरं, पण भवितव्य कांहीं तुझ्या हातीं नाहीं अन् माझ्याही नाहीं. चार दिवस आपण एका जागीं राहिलों, लोभ जडला, जिव्हाळा उत्पन्न झाला, पण उद्यां काय होईल कुणी सांगावं? अजून तूं लहान आहेस, अजून तुझं मन तयार व्हायचं आहे. आम्हां हिंदु लोकांसारखं कांहीं तुमचं नाहीं. आज तुला गोविंदाचा ओढा वाटत असेल, पण मला वाटतं—उद्यां तो टिकणार नाहीं. हें कोंडवाड्यांतलं आयुष्य तुला पटणार नाहीं. धकाधकीची तुला आवड आहे. नांवलौकिकाचा मोठा केवा आहे. इथं स्वतंत्र नांव मिळवायची तुला आशा नाहीं. साहेबाची बायको म्हणूनच जेवढा मोठेपणा मिळेल तेवढाच! माझ्या स्वार्थासाठीं मला वाटतं, कीं तूं माझी सून व्हावंस! पण आहे या परिस्थितींत तुला सुख लागणार नाहीं. माझं एक—हें सारं कळूनसवरून खाईत उडी घ्यायची तयारी नसेल तर पुन्हां इकडे येऊं नकोस. गोविंदाला मुळींसुद्धां भेटूं नकोस. जातांना त्याचा निरोपसुद्धां घेऊं नकोस—' तिला एकदम भडभडून आलें आणि तिच्या तोंडून शब्द निघेनासा झाला.

गोविंदा दारांत उभा राहून हें सारें भाषण ऐकत होता, याची त्या दोघींनाही कल्पना नव्हती. आईच्या तोंडचे ते उद्गार ऐकतांच तो चट्कन् तिथून निघून गेला.

आईच्या भाषणाचा गोविंदाच्या मनावर परिणाम झाला होता. विचारांची सांखळी त्याच्या बुद्धीच्या अवकाशांत खळखळूं लागली होती.

नर्गिज त्याचा निरोप घ्यायला आली त्या वेळीं उसना कठोरपणा आणून तो म्हणाला, 'आईची अवज्ञा कां केलीस ? जातांना माझा निरोपसुद्धां घेऊं नकोस असं तिनं सांगितलं होतं ना ?—'

'तुम्हीं ऐकलंत ?' नर्गिज दचकून म्हणाली.

'हो.' म्हणून तो उगीच राहिला.

क्षणभर कुणीच कांहीं बोललें नाहीं. तो क्षण त्या दोघांनाही भारावलेला वाटला. विषयाचा उपक्रम कसा करावा हें गोविंदाला समजेना. त्याचें मन दुश्चित झालें होतें—खिळखिळें झालें होतें. स्वतःच्या वृत्तीचा अंदाज त्याला करतां येत नव्हता.

'मी आज जातें आहें,' नर्गिज म्हणाली, 'पण मी पुन्हां येणार आहें.'

'आईची आज्ञा मोडून ?' गोविंदानें विचारलें.

'नाहीं !' नर्गिज निश्चयपूर्वक उद्गारली. 'मी येणार ती आज्ञाभंग करून नव्हे. आईचं म्हणणं खरं आहे. आहे या परिस्थितींत मला सुख लागणार नाहीं; पण आहे ही परिस्थिति बदलणार नाहीं कशावरून ? मीं वारंवार आलें, पुन्हां पुन्हां भेटलें, माझ्या सुखाची चाड तुमच्या ठायीं उत्पन्न झाली, तर कदाचित् ही परिस्थितिसुद्धां बदलेल—' गोविंदाच्या डोळ्याला डोळा देऊन ती म्हणाली, 'या सोनेरी तुरुंगांत तुम्ही पडून रहावं असं मला वाटत नाहीं. हें सिंहासन आहे—अधिकाराचा राजदंड इथं तुमच्या हातीं आहे—पण असल्या कैदी राजाची राणी होण्यापेक्षां फकिराच्या शेजारीं काखेला झोळी लावून रस्त्यांतून भीक मागणंसुद्धां मला जास्त गोड वाटेल—'

नुसत्या भावनात्मकतेनें ती बोलत नव्हती. त्यागाच्या वैभवाचें असामान्य तेज तिच्या डोळ्यांत चमकत होतें. तिच्या डोळ्यांकडे पहात असतां गोविंदा दिपून गेला. तिच्यापुढें आपण कुणी तरी क्षुद्र कीटक आहों असें त्याला वाटूं लागलें.

ती म्हणाली, 'मीं आतां येतें—तुम्हीं मला पोंचवायला येऊं नका. माझं एवढंच सांगणं आहे, कीं आईला घरीं पाठवूं नका. त्यांना इथंच राहूंद्या. इथंच

रहाण्यांत त्यांना सुख आहे. त्यांना हा कोंडवाडा वाटतो खरा, पण गांवच्या बाजार-गर्दीत राहून त्यांचा जीव पेंगूळला आहे. या एकान्तात राहिल्यानं त्यांना हुशारी येईल—' निघून जाण्यासाठीं मागें वळून त्याच्याकडे न पहातांच ती म्हणाली, 'मी पुन्हां येईन—पण आई इथं आहेत असं कळलं तरच येईन!' आणखी एक शब्द-सुद्धां न बोलतां ती एकदम तिथून निघून गेली.

गोविंदा कोसळून एका कोचावर पडला.

खालीं मोटार निघाल्याचा आवाज ऐकूं आला. त्याचें हृदय धडधडूं लागलें. धांवत जाऊन नर्गिजला पुन्हां बोलावून आणावें असें त्याला वाटत होतें. पण मनाबरोबर त्याचा देहावरचा ताबाही सुटला होता.

रमाबाई तितक्यांत तिथें आली. गोविंदाची मनःस्थिति तिच्या लक्षांत आली. त्याच्या शेजारीं बसून त्याच्या पाठीवरून हात फिरवीत ती म्हणाली, 'एवढा मोठा झालास, पण अजून तूं पोरच आहे गोंदू! जगाचे न्याय निवडतोस पण स्वतःची फिर्याद कशी लिहावी हेंच तुला कळत नाहीं—ऐकलंस? तिला विसरून जा. पुन्हां भेटूं नकोस तिला. आहे या परिस्थितींत तिला सुख लागणार नाहीं—'

'मी सारं कांहीं ऐकलं आई!' गोविंदा सद्गदित स्वरांत म्हणाला.

'गोविंदा, ऐकलंस ना?,' रमाबाई त्याला कुरवाळीत म्हणाली, 'फार उत्तम झालं! उघड उघड सांगवलं नसतं मला. गरुडाचं आणि कबुतराचं कधीं जुळायचं नाहीं. या खुराड्यांत तूं अडकून पडला आहेस—तिला विसरून जा!—'

'नाहीं आई!' गोविंदा म्हणाला, 'ते शक्य नाहीं.' त्याच्या तो निश्चयात्मक उद्गार ऐकून रमाबाई स्तंभित झाली.

## प्रकरण १२ वें.

नर्गिज निघून गेल्यावर गोविंदाला उदासवाणें वाटूं लागलें. रोजच्या सरकारी कामाकडेही त्याचें चांगलेंसें लक्ष लागेना.

त्याला वाटलें, रजा घेऊन कांहीं दिवस स्वस्थ बसावें. पण रजा घेऊन तरी जाणार कुणीकडे? घरीं जाऊन रहायला त्याचें मन फारसें उत्सुक नव्हतें. घरापासून दूर झाल्यामुळें रमाबाईलाही एक प्रकारें सौख्य लागलें आहे याजबद्दल त्याला समाधान वाटत होतें.

रमाबाईला त्यानें आपली मनस्थिती सांगितली. ती विचारांत पडली. परिस्थितीचा परिणाम गोविंदाच्या मनोवृत्तीवर कशा प्रकारें झाला असेल याची तिला अटकळ होती. कांहीं दिवस स्थलांतर करावें असें तिलासुद्धां वाटत होतें. त्या एकाकी घरांत नर्गिजची गैरहजेरी तिलाही जाणवत होती. मायलेकीसारख्या त्या या घरांत राहिल्या होत्या. मायलेकीसारखींच त्यांची हितगुजें चालत असत. आतां गोविंदा ऑफिसांत गेल्यावर तिलाही घर खायला येत असे. कुठेंतरी जावें—ज्या जागीं समाधानी वृत्तींत दिवस काढले त्याच जागीं एकलकोंड्यासारखें रहावें हें दोघांनाहीं पटेना असें पाहून गोविंदानें रजा घेण्याचें निश्चित केलें.

गांवीं जायचें नाहीं, हें त्यानें ठरवलेंच होतें. मग जायचें कुठें हा प्रश्न पडला. कुठेतरी थंड हवेच्या जागीं जाऊन रहावें असा विचार करून त्यानें अण्णासाहेबांनाही बरोबर येण्यासाठीं पत्र लिहिलें.

अण्णासाहेबांना तें शक्य नव्हतें. त्यांच्या हातीं कांहीं महत्त्वाचे दावे होते. ते दुसऱ्याच्या हातीं देऊन जायला कदाचित् ते तयार झाले असते पण कुळांनीं तें कबूल केलें नसतें, हें निश्चितपणें माहित असल्यामुळें ह्या दौऱ्यांतून स्वतःला वगळण्याबद्दल त्यांनीं गोविंदाला लिहून कळवलें.

जायचें कुठें, हा प्रश्न अजून तसाच राहिला होता. रमाबाईला कांहीं कल्पनाच नव्हती. घर सोडून यापूर्वी ती कुठेंच गेली नव्हती. कुठेंतरी गेलेल्या लोकांशींही तिचा संबंध आला नव्हता. गोविंदाचीही तीच स्थिती झाली होती. हिंदुस्तानांत तोही कुठें फिरला नव्हता. कुठें जावें असें कुणाला विचारलें तर आपलें अज्ञान प्रगट होईल, अशीही त्याला शंका वाटत होती.

शेवटीं त्यानें ठरवलें, कीं कोणत्याही हवेच्या ठिकाणीं जाण्यापेक्षां गर्दींत घुसून एकांताचा अनुभव घ्यावा.

रजा घेऊन मुंबईलाच राहायचें असें ज्यावेळीं गोविंदानें ठरवलें त्यावेळीं रमाबाईलाही तें नापसंत झालें नाहीं. मुंबईला रहावें असें तिलाही वाटत होतें.

दुसरीही एक आशा गोविंदाच्या मनांत असावी अशीही रमाबाईला शंका आली. नर्गिज त्यावेळीं मुंबईला रहात होती. मुंबईला रहायचें ठरलें त्यावेळीं रमाबाई म्हणाली, 'मुंबईची कांहीं मला कल्पना नाहीं. तिथं रहायला इथल्यासारखे स्वतंत्र बंगले मिळायचे नाहींत असं वाटतं. चाळीचाळींतून शेंकड्यांनीं बिऱ्हाडं असतात तिथं कसं रहायचं? तुला मुंबईची माहिती आहे—'

'नाहीं,' गोविंदा म्हणाला, 'मला सुद्धां तशी चांगलीशी माहिती नाहीं. मी तिथं शिकत होतों त्यावेळीं इंग्लिश हॉटेलांत रहात असें. एकंदरींत तिथली रहाणी बरी असते, पण तुला तें जमायचं नाहीं. सध्यांतरी मीं सरदारगृहांत रहायचं ठरवलं आहे. महाराष्ट्रांतले लहानसहान संस्थानिकसुद्धां तिथं रहातात, तसेच मध्यम स्थितीं-तले गृहस्थही रहातात. तिथं गेल्यानंतर मग कुठं रहायच तें निश्चित करूं—''

सरदारगृहाचीही रमाबाईला कल्पना नव्हती. सरदारगृह म्हणजे एक साधारणपणें बडयांतली खाणावळ आहे, याचा अंदाज गोविंदाला होता. इंग्लिश हॉटेलांतल्या सुखसोई तिथें नाहींत याची त्याला कल्पना होती. पण रमाबाईला घेऊन रहायचें म्हणजे तिथें राहण्याखेरीज गत्यंतर नव्हतें.

मुंबईला नार्गीज कुठें रहाते हें त्याला माहीत होतें. या कामीं तिचा सल्ला घ्यावा, असेंही क्षणभर त्याच्या मनांत आलें—

पण तसें करणें त्याला पटेना. ती निघून गेली तरी तिचा पाठपुरावा करण्यासाठीं आपण मुंबईला आलों असा तिचा गैरसमज होऊं नये म्हणूनच तिला कांहीं कळवायचें नाहीं असें त्यानें ठरवलें.

तीं दोघेंही येऊन सरदारगृहांत राहिलीं. चारपांच माणसांची सोय ज्यांत केलेली असे, अशी एक मोठी खोली त्यानें ठरवून घेतली होती.

जेवणासाठीं सार्वजनिक पंक्तींत जावें लागत नसे. सरदारगृहाचे मॅनेजर मोठे प्रेमळ माणूस होते. कुटुंबवत्सल माणसांची ते विशेष काळजी घेत असत. त्यांच्या जेवणाची व्यवस्था खोलींतच करतां येईल अशी योजना त्यांनी करून दिली होती.

पण तें वातावरण रमाबाईना आवडेना. आपलें घर म्हणजे आपलें राज्य अशा परिस्थितींत सारें आयुष्य काढलेल्या त्या बाईला सरदारगृहांतली रहाणी बाजारी वाटूं लागली. ही एक मोठी खाणावळ आहे अशी कल्पना तिला यापूर्वी नव्हती. सरदारगृहाबद्दल तिनें केलेल्या अटकळी पुऱ्या पडल्या नाहींत, म्हणून स्वतंत्र जागा घेऊन रहाण्याबद्दल तिनें गोविंदाला आग्रह केला.

मुंबईला आल्यापासून गोविंदाच्या मनांत फार येत होतें, कीं नर्गिजला जाऊन भेटावें. रमाबाईलाही तसें वाटत होतें, पण उघडपणें तिनें गोविंदाजवळ तसें बोलून दाखवलें नाहीं. दोघेंही एकमेकांशी लपवालपवी करीत होतीं.

गर्दींत राहून एकांत मिळवण्याची गोविंदाची इच्छा मात्र पुरी झाली नाहीं. तो कोण आहे याची वाच्यता चोहोंकडे झाल्यामुळें कुणी ना कुणी, कुठली ना कुठली तरी ओळख काढून त्यांना भेटायला यायचा प्रयत्न करूं लागला. त्याला तें नको

होतें. शिवाय एकाच खोलींत आईसह रहातानां बाहेरून येणाऱ्या माणसांच्या भेटी घेत बसणेंही त्याला प्रशस्त वाटेना.

स्वतंत्र जागा घेऊन रहाण्याचें म्हणूनच त्यानें ठरवलें. पण जागा पहायची कुठें याचा त्याला प्रश्न पडला !

अशावेळीं त्यांच्या शेजारच्या खोलींत महाराष्ट्रांतले एक बडे सरदार सहकुटुंब रहायला आले.

मुंबईला महीना दीड महीना रहाण्याच्या विचारानें त्यानींही अशीच एक स्वतंत्र खोली ठरवून घेतली होती. नोकरलोकांसाठीं निराळी व्यवस्था केली होती. पण 'सरकार' मात्र आपल्या राणीसाहेबांसह या मुख्य खोलींत रहात होते.

आपल्या शेजारच्या खोलींत कुणी आय्. सी. एस्. येऊन राहिला आहे असा पत्ता लागतांच राणीसाहेबांनीं गोविंदाच्या आईशीं परिचय करून घेण्याचा उपक्रम केला. रमाबाईलाही तिथें कंटाळवाणें वाटत होतें. अशा वेळीं या राणीसाहेबांचा परिचय झाल्यामुळें तिला एक प्रकारचा विरंगुळा वाटला.

राणीसाहेबांनीं जो रमाबाईशीं परिचय करून घेतला, तो नुसता शेजारधर्माला अनुसरूनच नव्हता. त्यांना एक मुलगी होती, तिचें लग्न व्हायचें होतें. यंदांच ती बी. ए. च्या परिक्षेला बसली होती—आणि रमाबाईचे चिरंजीव एक अविवाहित आय्. सी. एस्. आहेत हें तिला कळलें होतें.

महाराष्ट्रांत जे छोटे छोटे संस्थानिक आहेत, ते बहुतेक ब्राम्हण आहेत. सर्वच संस्थानिकांच्या मुलींना संस्थानिक नवरे लाभतातच असें नाहीं. महाराष्ट्रांतल्या कांहीं लहरी संस्थानिकांनीं मध्यम वस्तींतील कुटुंबांतून आपल्या राण्या शोधून काढल्यामुळें, अशा किरकोळ संस्थानिक आणि सरदारांवर मोठी आपत्ती ओढवली होती.

मोठमोठे संस्थानिकसुद्धां आपल्या मुलींसाठीं शक्य तेवढेंकरून आय्. सी. एस्. नवरे शोधीत असत, आणि कांहीं महाराष्ट्रीय 'राजकन्या' आज 'साहेबिणी' होऊन राहिल्या आहेत त्या याच कारणामुळें.

त्या राणीसाहेबांनीं रमाबाईशीं ओळख करण्याचा जो उपक्रम केला, तो याच उद्देशानें! सहज बोलतांना ज्यावेळीं गोष्टी निघाल्या त्यावेळीं राणीसाहेब म्हणाल्या, ' कसले आम्ही सरदार आणि कसले आम्ही संस्थानिक! त्यापेक्षां एकादा कलेक्टर लोकांना केवढा तरी मोठा वाटतो. आतां आपले चिरंजीव असे जिल्हाधिकारी झाले, म्हणजे त्यांच्या तोलाला शोभेल अशीच बायको त्यांना पाहिजे असते. बी. ए. झालेल्या मुली मिळायला हल्लीं कांहीं अडचण पडत नाहीं. पण मुलगी नुसती बी. ए. झाली म्हणजे तिला सारं कांहीं कळत नाहीं. कुठल्यातरी वकीलाडॉक्टराची मुलगी जिल्हाधिकाऱ्याची बायको झाली, तर मोठ्या लोकांत कसं वागावें हें कांहीं तिला कळायचं नाहीं. आम्हीं आपले लहानसे सरदार असलों तरी आमचं घराणं खानदानी आहे. मुलगी पुण्याला कॉलेजांत असते पण तिच्या तैनातीसाठीं स्वतंत्र कारकून, भटजी, मास्तर, शिपाई, दासदासी, सारा कांहीं इतमाम नांवाला शोभण्याजोगा ठेवला आहे. इथं आम्ही सरदारगृहांत रहातों म्हणजे काय—आपली पूर्वापार रूढी आहे म्हणून! डॉक्टरला प्रकृती दाखवण्यासाठीं आम्हीं आलों आहोंत. डॉक्टरला आमच्या तिकडे घेऊन जाणं कांहीं अशक्य नाहीं. पण कसलेसे विजेचे उपचार करायचे आहेत म्हणून मुंबईला येणं भाग पडलं—' आपल्या जहागिरीची इत्थंभूत हकिकत सांगायला ज्यावेळीं राणीसाहेबांनी सुरवात केली त्यावेळीं बिचारी रमाबाई अगदीं दिपून गेली.

मुलीच्या लग्नाची प्रत्यक्ष गोष्ट कांहीं राणीसाहेबांनीं काढली नव्हती. पण त्यांचे एकंदर धोरण रमाबाईच्या ध्यानीं आलें. तिच्याही तोंडाला पाणी सुटल्यावांचून राहिलें नाहीं. मुलगी खरोखरच चांगली असली तर असल्या जहागिरदाराशीं शरीरसंबंध जोडला जाण्यांत मोठेपणा आहे, असें पूर्वसंस्कारामुळें तिला वाटूं लागलें. नर्गिजचा विचार तिच्या मनांत येत नसे असें नाहीं, पण कोणत्याही रीतीनें धर्म न मोडतां अशी मानाची सोयरीक जुळून येत असेल तर—

रमाबाईचें मन मागेंपुढें होत होतें. मुलीला एकदां आणून दाखवा, असें म्हणावें

असेंही तिच्या मनांत येत होतें. पण तसें म्हटल्यानें वरपक्षाला कमीपणा आला असता हें जाणून तिनें आत्मसंयमन केलें.

पण तसें करण्याची कांहीं जरुरीच नव्हती. या बाबतींत रमाबाईपेक्षां राणीसाहेबांना जास्त कळकळ होती.

या बाबतींत गोविंदाकडे आधीं कांहीं बोलायचें नाहीं असें रमाबाईनें ठरवलें होतें. तोंपर्यंत जहागिरदारांचा आणि गोविंदाचा परिचयही झाला नव्हता—इतकेंच नव्हे, तर राणीसाहेबांशीं परिचय झाल्याचेंहीं रमाबाईनें गोविंदाला सांगितलें नव्हतें.

पण ज्यावेळीं राणीसाहेबांची कन्या येऊन अचानक एके दिवशीं हजर झाली त्यावेळीं सारीच हवा बदलून गेली.

## प्रकरण १३ वें.

‘ या आमच्या अक्कासाहेब ! ’ राणीसाहेब रमाबाईला म्हणाल्या.

अक्कासाहेबांनी रमाबाईंना अगदीं जमिनीपर्यंत वांकून नमस्कार केला. एवढ्या मोठ्या घराण्यांतील मुलगी असूनसुद्धां विनयशील आहे, हें पाहून रमाबाईला कौतुक वाटलें.

‘ आतां आणखिन् एक महिन्यानं रिझल्ट लागेल !’ राणीसाहेब म्हणाल्या,‘कोणता क्लास एवढंच पाहायचं, बाकी पास व्हायची खात्रीच आहे. ’

चहा मागवण्यांत आला होता. ट्रे येतांच अक्कासाहेबांनी पुढें येऊन चहा तयार करून पेले भरून दिले. रमाबाईला आणखी कौतुक वाटलें.

रमाबाई निरीक्षण करीत होती. नर्गिजशीं अक्कासाहेबाची तुलना करण्याचा मोह तिला आवरतां आला नाहीं. तिला वाटलें, नर्गिजपेक्षां अक्कासाहेब सुंदर होती— जास्त टवटवित होती—थोडीशी गुबगुबीत होती म्हटलें तरी चालेल–नाकाडोळ्यांत नर्गिजपेक्षां जरा उजवीच होती. नर्गिजपेक्षां साधारण ठेंगणी होती. शिवाय पोशाखाच्या फरकामुळं जी एक आपुलीकी वाटते, तसलाच कांहींसा परिणाम तिच्या मनावर झाला.

दोघींच्या मुद्रेशीं तुलना करतांना मात्र केवढा तरी फरक वाटूं लागला. दोघीं-च्याही नजरेंत चमक होती—पण त्या चमकेंत मोठाच फरक होता. नर्गिजकडे पहातांना स्त्रीत्त्वाची कल्पना येत नसे पण आक्कासाहेबांची तरळतीं बुबुळें कटाक्षांचीं फेंक करताहेत कीं काय असें वाटूं लागे.

बोलायचा उपक्रम कसा करावा याचा रमाबाईला विचार पडला. ही मुलगी आपल्याला दाखवायला आणली आहे असें जरी रमाबाईला वाटत होतें, तरी एकंदर गोष्टी सहजगत्या घडत आहेत असें भासवण्याचा राणीसाहेबांचा प्रयत्न होता. कॉलेजांतल्या गोष्टी निघाल्या—राणीसाहेबांनींच सुरवात केली आणि आक्कासाहेब बोलूं लागल्या. तिच्या बोलण्यांत कृत्रिमता स्पष्ट दिसत होती. पण असल्याच कृत्रिमतेला 'शालीन्य' असें नांव देण्यांत येत असतें. बोलतांना प्रत्येक शब्द ती अगदीं मोजून-मापून बोलत होती. बोलत असतां मधून मधून रमाबाईकडे पहायचें, पुन्हां राणीसाहे-बांकडे डोळा द्यायचा, क्षणभर जमिनीकडे पहात रहात बोलायचें—अशा रीतीनें तिचें बोलणें चाललें होतें.

रमाबाईला वाटलें, नर्गिजला पहाण्यापूर्वी जर या मुलीला पाहिलें असतें, तर चट्कन् ती डोळ्यांत भरली असती—पण तिच्या प्रत्येक हालचालीबरोबर रमाबाईला नर्गिजची आठवण होई. तुलना करण्याची कल्पना मनांत आली कीं तिचें मन द्विधा होई. तिला वाटे, हिंदूंत आणि पारशांत एवढा हा फरक असणारच. हिंदूंच्या मुलींना पारशांच्या इतक्या मोकळेपणानें वागवलें जात नाहीं. त्यांतून ही घरंदाज मुलगी—पहिल्यापासून शिस्तींत वाढलेली—कॉलेजांत होती म्हणून काय झालें ?—घरीं तिच्यावर नजर ठेवायला दिवाणजी होतेच ना ?

तुलना करतां करतां रमाबाईचें मन विरघळलें. हळूहळू आक्कासाहेबांच्या तुलनेंत नर्गिज मागें हटूं लागली. हिंदुपणानें उचल खाल्ली. हिंदूची मुलगी ही अशी असायचीच—त्यांतून ब्राह्मणाची—त्यांतून जहागिरदाराची—हिची तुलना पारशांच्या मुलीबरोबर कशी करायची ?

त्या दिवशीं गोविंदाची भेट झाली तेव्हां रमाबाई म्हणाली, 'शेजारीं एक

जहागिरदार आले आहेत. आपले ब्राह्मणच आहेत. त्यांची फार इच्छा आहे तुझा परिचय करून घ्यायची. उद्यां मी त्यांना चहाला बोलावलं आहे—'

' उद्यांच बोलावलंस म्हणून बरं झालं. ' गोविंदा म्हणाला, ' परवां आपल्याला मलबार हिलवर रहायला जायचं आहे. तिथं एक छोटीशी बंगली मिळाली आहे. स्वयंपाकी वगैरे येऊन सारी व्यवस्था होईपर्यंत जेवायला आपण इकडेच येऊं—तसं छान असतं इथलं जेवण ! '

गोविंदा काय म्हणतो याच्याकडे रमाबाईचें लक्ष नव्हतें. अक्कासाहेबांची गोष्ट त्याच्याकडे काढावी कीं काय याची तिला शंका वाटत होती. गोविंदा नव्या घरच्या गोष्टी बोलत होता. नव्या घरांत रहाण्यासाठीं कोणत्या कोणत्या योजना करायच्या, कोणते नोकर ठेवायचे, कोणत्या जुन्या नोकरांना बोलवायचें वगैरे गोष्टी तो इतक्या तन्मयतेनें सांगत होता, कीं अक्कासाहेबांची गोष्ट काढणें रमाबाईला अशक्य झालें. त्या दिवशीं जाऊन नवें घर पाहून यायचें ठरलें. रमाबाईला एकदां वाटलें, कीं ही संधी साधून राणीसाहेब आणि अक्कासाहेब यांनाही बरोबर घ्यावें. पण पुन्हां तिनें तो बेत रहीत केला.

हा संबंध जुळून यावा असें तिला वाटूं लागलें होतें. मध्यम स्थितींतलीं आपण माणसें, जहागिरदाराशीं संबंध आला तर गांवांत मोठा लौकिक होईल. पण तसें होण्यांत रमाबाईच्या हितापेक्षां राणीसाहेबांचाच स्वार्थ जास्त होता याची तिला कल्पना नव्हती.

त्या दिवशीं गोविंदाबरोबर जाऊन ती घर पाहून आली. जागा पसंत पडली. बंगल्यांत सामान पूर्वीचेंच होतें. नवीन सामान घेण्याची कांहीं जरूरी नव्हती. फक्त सैंपाकाचीं भांडींकुंडीं आणलीं कीं लगेच संसार थाटतां येत होता.

त्याच दिवशीं गोविंदानें एक नवीन मोटार घेतली. पूर्वीच्या मोटारीपेक्षां ही जास्त प्रशस्त होती. किंमतीनेंही जास्त होती. रमाबाईला वाटलें, जहागिरदारांच्या मोटारी-पेक्षांही ही मोटार जास्त किंमतीची असावी. त्या मोटारींतून सरदारगृहाच्या दारांत तीं दोघें उतरत आहेत तोंच जहागिरदारांचीही मोटार येऊन थडकली. तिथेंच फुटपाथवर परिचयाचा विधी उरकण्यांत आला.

रमाबाई निरखून पहात होती, पण आक्कासाहेबांना पाहून गोविंदाच्या मनावर कांहीं परिणाम झाल्याचें तिला दिसून आलें नाहीं. आक्कासाहेब मात्र बळेंच ओढून-ताणून फाजील विनयाचा आव आणते आहे असा क्षणभर तिला भास झाला.

तरीही तिला आश्चर्य वाटलें नाहीं किंवा वाईटही वाटलें नाहीं. वस्तुस्थिती काय होती याची अक्कासाहेबांना जशी कल्पना होती, जशी गोविंदाला नव्हती. म्हणूनच अक्कासाहेबाला संकोच वाटला असावा अशी तिनें आपल्या मनाची समजूत केली.

दुसऱ्या दिवशीं चहाचा समारंभ झाला. जहागिरदार मोठ्या खुषींत होते. राणी-साहेब देखील फार अघळपघळ बोलत होत्या. बोलत नव्हती एक अक्कासाहेब.

मंडळी निघून जातांच रमाबाई गोविंदाला म्हणाली, 'मोठीं चांगलीं माणसं आहेत नाहीं ?'

'मला हा एक नवाच नमुना पहायला मिळाला,' गोविंदा म्हणाला, 'या आमच्या गांवठी 'सरकारां' बद्दल मीं बऱ्याच गोष्टी ऐकल्या आहेत. पण ही वल्ली मीं पहिल्यानंच पाहिली. म्हातारा मोठा लघळ दिसतो. जहागिरीचीं सूत्रं, मला वाटतं, बहुधा राणीसाहेबच चालवीत असाव्या. राणीसाहेबांनीं बोलावं आणि सरकारांनी होय म्हणावं असं जें आतां चाललं होतं तें पाहून मला हसूं आवरणं मोठं कठीण गेलं—'

'पण त्या मुलीबद्दल-आक्कासाहेबांबद्दल काय वाटलं ?—' रमाबाईनें विचारलें.

'काय वाटायचं ?' गोविंदा गालांतल्या गालांत हंसत म्हणाला, 'याच काटेरी जंगलांतलं रानफूल तें—शहरांत कॉलेजच्या कुंडींत नेऊन लावलं खरं, पण मुळची जहागिरी चांगलीच डोकावत असलेली दिसते. आधीं बोलतच नव्हती ती फार—त्यांतून बोललीच तर अगदीं मोजूनमापून. सारा बनावटांचा बाजार दिसला मला !—' याच धोरणानें गोविंदा त्या राजकुटुंबाचें वर्णन करीत होता.

रमाबाईला तें कांहीं बरें वाटलें नाहीं. विलायतेंत राहून गोविंदाची हिंदुपणाची आवड कमी झाली, असाच तिला संशय आला.

त्या रात्रीं जहागिरदार साहेबांनीं सिनेमाला जायचें आमंत्रण दिलें. अर्थात्च आमंत्रण स्वीकारणें भाग आलें. सिनेमांत बसतांना राणीसाहेबांनी असा कांहीं बनाव बनवून आणला, कीं आक्कासाहेब गोविंदाच्या शेजारीं बसावी.

सिनेमा सुरू व्हायला वेळ होता. आक्कासाहेबांनीं हळूहळू गोविंदाशीं बोलायचा उपक्रम सुरू केला. आतां पूर्वीचा संकोच राहिला नव्हता. अगदीं मोकळेपणानें ती विलायतेच्या हकिकती त्याला विचारीत होती. तोही अगदीं निर्विकारपणें प्रश्नांचीं उत्तरें सरळ सरळ देत होता.

मधल्या वेळांत पुन्हां तिनें गोविंदाशीं बोलायला सुरवात केली. गोविंदाला असें दिसून आलें, कीं त्याला पहिल्यानें वाटलें तितकी ही मुलगी कांहीं अगदींच साधी भोळी नव्हे. ती जितकी चौकस, तितकीच मधुभाषी असल्याचें त्याला दिसून आलें. बोलत असतांना ती त्याच्याशीं अशा कांहीं विलक्षण मुद्रेनें पाही, कीं तिला उत्तर देतांना गोविंदा तिच्याकडे पाहीनासा झाला.

दुसऱ्या दिवशीं नव्या बंगल्यांत जायचें ठरलें होतें. पण गडीमाणसें येईपर्यंत सरदारगृहांतच राहायचा रमाबाईनें आग्रह धरला.

आक्कासाहेबांना घेऊन राणीसाहेब येऊन गोविंदाच्या खोलींत बसूं लागल्या आणि त्यांचें दोघांचें बोलणें सुरू होतांच रमाबाईंना घेऊन त्या आपल्या खोलींत जाऊं लागल्या.

त्या गेल्यानंतर आक्कासाहेब आपलें खरें स्वरूप गोविंदाला दाखवी. परदेशांतील कोणत्याही सुशिक्षित मुलींइतकीच डेक्कन कॉलेजांत वाढलेली ही मुलगी चाणाक्ष आहे असें पाहून गोविंदालाही क्षणभर कौतुक वाटलें.

गोविंदाला असें दिसून आलें, कीं तिचें वाचनही बरेंच व्यापक असावें. आधुनिक ग्रंथकारांच्या पुस्तकांवर ती ज्या वेळीं चर्चा सुरू करी त्या वेळीं आपण तीं पुस्तकें अलीकडे वाचलीं हें बरें झालें असें गोविंदाला वाटूं लागे.

एक प्रकारें तीं दोघें एकमेकांशीं बौद्धिक आट्यापाट्या खेळत होतीं.

शेवटीं गोविंदानें तिच्यावर मात केली. त्यानें निर्वाणीचें पाशुपतास्त्र बाहेर काढलें. 'मार्क्स् आणि एंजल' यांच्या ग्रंथावर बोलायला गोविंदानें सुरवात करतांच आक्कासाहेबांची मुलुखमैदान तोफ एकदम थंड पडली.

या ग्रंथकारांचीं नांवेंसुद्धां तिला माहीत नव्हतीं. आधुनिक नाटककादंबरी—कारांपलिकडे तिच्या वाचनाची मजल गेली नव्हती. तरीही ती म्हणाली, 'हें एक नवीनच शास्त्र अलीकडे फैलावूं लागलं आहे. आमच्या कॉलेजांत हीं पुस्तकं कांहीं मिळत नाहींत. आतां यापुढं मी अर्थशास्त्राचा अभ्यास करणार आहें. एम्. ए. साठीं तोच विषय घ्यावा, असं मीं ठरवलं आहे—'

तिचा हजरजबाबीपणा पाहून गोविंदाला कौतुक वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

त्या चारपांच दिवसांत हाच प्रकार सुरू होता. राणीसाहेब रमाबाईला घेऊन कुठें तरी जात असत आणि आक्कासाहेब गोविंदाला पकडून धरून बसत असे. तो बाहेर जायला निघाला तरीही ही बया पाठ सोडीत नाहीं असें पाहून त्याचा जीव मेटाकुटीला आला.

तिला घेऊन तो अपोलो बंदरवर गेला होता. तिच्या आग्रहामुळें चहा घेण्यासाठीं तीं ग्रीनस् हॉटेलमधें गेलीं. ज्या टेबलावर ती बसलीं होतीं त्याच्याच समोरच्या टेबलाजवळ एक बाई एकटीच बसली होती. गोविंदानें चहा मागवण्यासाठीं वेटरशीं बोलायला सुरवात केली, तोंच त्या बाईनें मागें वळून पाहिलें—

' कोण ! मि. सप्रे ? '

गोविंदा दचकला. ती नर्गिज होती.

## प्रकरण १४ वें.

चोरी करतांना मुद्देमालासह पकडलेल्या चोराची जशी मनःस्थिति होते, तशीच गोविंदाची स्थिति ह्या वेळीं झाली होती. वास्तविक असें वाटायला त्याला कांहीं कारण नव्हतें. आक्कासाहेबांना मुद्दाम घेऊन तो कांहीं आला नव्हता—पण त्याच्या मनाला मात्र तसें वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

नर्गिज येऊन त्यांच्या टेबलाजवळ बसली. तिघांसाठींही चहा आणि खाण्याचे जिन्नस मागवण्यांत आले.

आक्कासाहेबांचा परिचय करून दिल्यानंतर मुंबईला रमाबाईसह आपण आल्याची हकीकत त्यानें नर्गिजला सांगितली.

'मला कळलं असतं तर मीदेखील येऊन भेटलें असतें,' नर्गिज अगदीं औपचारिकरीत्या म्हणाली. वेळ काळ जाणण्याची पात्रता तिच्या अंगीं होती. आक्कासाहेबांसमोर आपण जास्त सलगी दाखवूं नये असेंच तिला वाटलें.

नव्या बंगल्याचा पत्ता गोविंदाकडून लिहून घेऊन ती एकाएकीं निघून गेली.

गोविंदाला अगदीं ओशाळल्यागत वाटत होतें. त्याच्या मनाला रुखरुख लागली होती. आपल्याच विचारांत तो गुंग असतां आक्कासाहेब म्हणाली, 'कोण ही ? पारशीण आहे वाटतं ? हिची कुठली तुमच्याशीं ओळख झाली ?'

'तिचा बाप आणि मीं एकाच जिल्ह्याला होतों!' गोविंदा म्हणाला, 'तो सिव्हिल सर्जन होता तिथं–त्यावेळीं रजेंत ती तिथं येत असे—'

'ही पारशांची जात फारच फाजील!' आक्कासाहेब नाक मुरडून म्हणाली, 'तुम्हीं बोलावल्याशिवायच इथं येऊन बसली. मुंबईच्या लोकांना—विशेषतः पारशांना रीतभात चांगली कळते म्हणतात—पण अगदींच धसमुसळी दिसली ही पारशीण!'

गोविंदानें कांहींच उत्तर केलें नाहीं. तिच्या बोलण्याकडे त्याचें लक्षच नव्हतें. दोघींनाही समोरासमोर पहाण्याचा योग येईल, असें कधीं त्याला वाटलें नव्हतें. गुणदोषांची तुलना दूरच राहो, पण नुसती ती शेजारीं येऊन बसतांच आक्कासाहेब निस्तेज पडली असें त्याला वाटलें.

सरदारगृहांत गेल्यावर नर्गिज भेटल्याची हकीकत आक्कासाहेबांनीं रमाबाईंना सांगितली. नुसता तिचा उल्लेख करतांच रमाबाईही कावरीबावरी झाली. ती अशी भेटेल अशी तिची अपेक्षा नव्हती, किंबहुना तिची अन् गोविंदाची गांठ पडूं नये असेंच तिला वाटत होतें. नव्या घरचा पत्ता गोविंदानें तिला लिहून दिला हें कळतांच ती फार अस्वस्थ झाली. तिनें तसें बोलून दाखवलें नाहीं.

त्याला कारण झालें होतें. गोविंदा आणि आक्कासाहेब फिरायला गेल्यावर राणीसाहेबांनीं आक्कासाहेबांच्या लग्नाची गोष्ट रमाबाईकडे काढली होती. पस्तीस हजार रुपये हुंडा देण्याचा उल्लेख ऐकूं येतांच रमाबाई चकीत झाली. 'पस्तीस हजार!' असें जेव्हां ती उद्गारली तेव्हां राणीसाहेब म्हणाल्या होत्या, 'हें आपलं माझं म्हणणं आहे. सरकार कदाचित् आणखीही रक्कम वाढवतील. शिवाय तिच्या आंगावर जे कांहीं दहापांच हजारांचे दागिने आहेत, तेही तिच्याबरोबरच जायचे. आमच्या जहागिरीच्या रिवाजाप्रमाणं करणीकौतुक सारं कांहीं केलं पाहिजे. त्यांत कमी व्हायचं नाहीं. पूर्वींच्या पद्धती गेल्या आहेत, आतां आतांच्या पद्धतीप्रमाणें सामानसुमान फर्निचर वगैर जें कांहीं द्यायचं त्यांत कांहीं कमतरता व्हायची नाहीं—' राणीसाहेब करणी-कौतुकाची एक एक यादी सांगूं लागल्या तेव्हां

रमाबाईचा स्वतःच्या कानावरसुद्धां विश्वास बसेना. लग्नाच्या बाजारांत आपल्या मुलाची किंमत एवढी मोठी आहे, याची तिला कल्पनासुद्धां नव्हती. यापूर्वी मुली सांगून आल्या होत्या, हुंड्याच्या रकमाही दहापांच हजारांपर्यंत गेल्या होत्या, पण पस्तीस हजारांपेक्षां सुद्धां जास्त रकम द्यायला हीं असलीं घरंदाज माणसं तयार झालीं हें पाहून ती आश्चर्यचकित होऊन गेली होती.

म्हणूनच नर्गिजची भेट झाल्याबद्दल तिला बरें वाटलें नाहीं. त्या उभयतांचें आकर्षण कोणत्या प्रकारचें होतें, याची तिला पूर्ण कल्पना होती.

नर्गिज स्वतः तिला येऊन भेटली तर आपलेंही मन डळमळूं लागेल असें तिला वाटलें.

आक्कासाहेब निघून गेल्यावर रमाबाईनें राणीसाहेबांशीं झालेल्या बोलण्याची सर्व हकीकत गोविंदाला सांगितली. एक शब्दसुद्धां न बोलतां तो सारें कांहीं ऐकून घेत होता. बोलणें संपल्यावरही तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून रमाबाई म्हणाली, ' माझ्या दृष्टीनं मुलगी बरी वाटते. चांगली देखणी आहे—घरंदाज आहे—शिकलेली आहे—अर्थातच तुझ्या तोलाची आहे. अशी मुलगी कुठल्या तरी राजाची राणी व्हायची—'

' खरं आहे तुझं म्हणणं,' गोविंदा अगदीं रुक्षपणें म्हणाला, ' राजाची राणी व्हायलाच ती जास्त लायक आहे. माझ्यासारख्या सामान्य माणसाचं तिच्याशीं जमायचं नाहीं !'

' तूं सामान्य कसा ? उद्यां जिल्ह्याचा कलेक्टर झालास म्हणजे एक संस्थानिकच झाल्यासारखं नव्हे का ?—'

गोविंदा नुसता हंसला, आणि बाहेर गॅलरींत जाऊन रस्त्याकडे पहात राहिला.

रमाबाईला अगदीं ओशाळवाणें वाटलें. आपण थोडीशी घाई केली, एव्हां कांहीं सांगितलें नसतें तर बरें झालें असतें असेंच तिला वाटलें.

दुसरे दिवशीं मलबार हिलवरच्या बंगल्यांत त्यांनीं आपलें बिऱ्हाड थाटलें, पण राणीसाहेबांचा ससेमिरा कांहीं सुटला नाहीं. त्या आक्कासाहेबांना घेऊन दुपारींच ज्या

गोविंदाच्या बंगल्यावर आल्या त्या परत जाण्याची गोष्टच बोलेनात. हळूच नजर चुकवून गोविंदा बाहेर गेला, ड्रायव्हरला बोलावून मोटारींत बसणार तोंच त्याच्या शेजारीं आक्कासाहेब उभी असल्याचें पाहून तो सर्द झाला ! नाइलाजानें तिला घेऊन त्याला निघावें लागलें.

नित्याप्रमाणें चक्कर मारून तीं दोघेंही परत आलीं तरीही राणीसाहेब कांहीं गेल्या नव्हत्या. गोविंदाला वाटलें, या बाईनें आपल्या आईचा अगदीं पाठपुरावा चालवला आहे.

दोन तीन दिवस रोज हाच क्रम चालला होता. गोविंदाचा जीव अगदीं रडकुंडीला आला. कुणालाही एकदम तोडून टाकणें त्याला साध्य नव्हतें.

नर्गिजनें पत्ता लिहून घेतला, पण अजून ती येत नाहीं, म्हणून तो तिच्यावर याच पाठपुराव्यामुळें रागावला होता.

शेवटीं त्या दिवशीं नर्गिज आली. जसें कांहीं तिला कळलेंच होतें. ती आली ती सकाळींच आली. राणीसाहेब आक्कासाहेबांना घेऊन येत असे ती दुपारीं जेवण-खाण आटोपल्यानंतर.

नर्गिजला प्रत्यक्ष पहातांच रमाबाईला जुन्या वात्सल्याचा उमाळा आल्यावाचून राहिला नाहीं. दोघीही एकमेकांना कडकडून भेटल्या. दोघीही जुन्या गोष्टी बोलत बसल्या. नव्या ओळखीची आठवण घटकाभर रमाबाईच्या हृदयांतून पार पुसली गेली.

गोविंदा मात्र अगदीं बाजूला बसला होता. त्या दोघींच्या हिशेबीं त्यावेळीं त्याचें अस्तित्व शून्य होतें.

तो सबंध दिवस तिथेंच रहाण्याचा बेत करून नर्गिज आली होती, हें जेव्हां रमाबाईला कळलें तेव्हांच तिला मायलेकींची आठवण झाली आणि साऱ्या तिच्या आनंदावर विरजण पडलें.

पुन्हां तिच्या मनाची खळबळ सुरू झाली. पुन्हां ती दोघींची तुलना करून पाहूं लागली.

खरें पाहिलें तर तशा रीतीनें विचार करण्याचा अधिकार गोविंदाचा होता. पण रमाबाई एक जुन्या काळची बाई होती. आपल्या मुलाचें लग्न ठरवण्याचा भार आपला आहे असेंच तिला वाटत होतें. त्याचा संसार सुखाचा व्हावा, त्याच्या उत्तर आयुष्यांत त्याला कोणत्याही प्रकारें त्रास होऊं नये अशी पत्नी त्याला मिळावी, अशी जी तळमळ तिच्या अंतःकरणाला लागली होती, तिला अनुसरूनच ती ही तुलना करून पहात होती.

म्हणूनच तिला त्या दिवशींचा हा योग महत्त्वाचा वाटला. दुपारपासून संध्याकाळपर्यंत त्या दोघीही समोरासमोर होत्या. नर्गिज कुणालाच बोलूं देत नव्हती. संस्थानीक राजकारणाच्या गोष्टी ती जितक्या अधिकारपूर्ण वाणीनें बोलत होती तितक्याच अधिकारानें ती कौटुंबिक गोष्टींची ज्यावेळीं चर्चा करूं लागे, त्यावेळीं रमाबाईला तिच्याबद्दल अभिमान वाटे. संभाषणपटुत्वांत आक्कासाहेब तिच्यासमोर अगदीं काळवंडून गेल्यासारखी दिसली. दोघीही सुशिक्षित असल्यामुळें कोणत्याही विषयाच्या चर्चेत दोघींची चकमक उडेल अशी रमाबाईची अपेक्षा होती. पण सार्वजनिक विषयाच्या वाटाघाटींत आक्कासाहेब अगदींच अनभ्यस्त आहे असेंच रमाबाईंना दिसून आलें.

या पारशिणीजवळ रमाबाई सोंवळयाओंवळयाचा फारसा प्रपंच मानीत नाहीं याचें राणीसाहेबांनाही आश्चर्य वाटलें. घरच्या मालकिणीप्रमाणें नर्गिज चहाचे पेले भरून देऊं लागली अन् रमाबाई घेऊं लागली हें पाहून राणीसाहेबांनाही नकार देतां येईना. त्यांना मनापासून रमाबाईचा राग आला होता. असला भ्रष्टाकार त्यांना पसंत नव्हता. पण पुढल्या आशेवर नजर ठेवून मनांतला राग मनांत गिळून मुकाट्यानें चहा पिणें त्यांना भाग पडत होतें. आक्कासाहेबांना मात्र त्या प्रकाराचें कांहीं विशेष वाटल्याचें दिसून आलें नाहीं.

त्या दिवशीं नर्गिज आणि आक्कासाहेब या दोघींनाही बरोबर घेऊन गोविंदा फिरायला गेला. आक्कासाहेब मनांतल्या मनांत धुमसत होती. तिला संशय आला

होता. या दोघांची जी ओळख आहे, ती नुसत्या तोंडओळखीच्या पुष्कळच पलीकडे गेलेली आहे, असा तिनें कयास बांधला.

दुसऱ्या दिवशीं नर्गिज आली नव्हती, ती संधी साधून राणीसाहेब रमाबाईला म्हणाल्या, 'काल तुम्हीं त्या पारशिणीच्या हातचा चहा घेतलात त्याचं मला कसंसंच वाटलं—'

'लोभाचं हें असं आहे,' रमाबाई म्हणाली, 'मोठी गोड आहे ती पोरगी. अगदीं पोटच्या मुलीसारखी वाटते मला, म्हणूनच मला संकोच वाटत नाहीं. बाकी तसं पाहिलं तर गोविंदाच्या घरांत तरी सोवळं कुठं आहे? माझ्यापुरती तो वेगळी व्यवस्था करतो. बाकी मी त्याच्याकडे येऊन रहायच्यापूर्वी एक किरिस्तांव बबर्जीच जेवण करीत होता. साहेबलोकांत वागायचं, तेव्हां सारा थाट तसाच ठेवावा लागतो!'

राणीसाहेबांनीं एक मोठा सुस्कारा टाकला. त्या म्हणाल्या, 'तेंही खरं आहे. देश तसा वेष अन् गुरू तसा उपदेश. आमचे कित्येक ब्राह्मण संस्थानिकसुद्धां हल्लीं गोंव्याचे बबर्जी ठेवूं लागले आहेत. कलियुग आहे हें—तेव्हां हें असं व्हायचंच!'

एकंदरींत या प्रकाराच्या बाबतींतील तात्त्विक विरोध वस्तुस्थितीकडे पाहून हिशेबांत न घेण्याची राणीसाहेबांची तयारी दिसून आली.

बाजूला बसलेला गोविंदा हे उद्गार ऐकून गालांतल्या गालांत हंसत होता. आक्कासाहेबांचा चेहरा गोरामोरा झाला होता. आपल्या आईनें भलतीच गोष्ट काढून वातावरण बिघडवलें असेंच तिला वाटलें.

आणखी दोनतीन दिवस नर्गिज कांहीं आली नाहीं. त्या मायलेकींनीं मात्र गोविंदाचा अगदीं पिच्छा पुरवला होता. कुठली दुर्बुद्धि झाली आणि आपण सरदारगृहांत राहिलों असें गोविंदाला वाटूं लागलें होतें.

त्या दिवशीं स्वतः जहागिरदारसाहेबच त्या दोघींना घेऊन आले. गोविंदा अगदीं घाबरून गेला. आतां ही सारी मंडळी आपल्या घरीं कायमच तळ देऊन रहाणार असें त्याला वाटूं लागलें.

जहागिरदारसाहेबांनीं त्या दिवशीं रमाबाईकडे गोविंदाच्या समोरच मुलीच्या लग्नाची गोष्ट काढली. पस्तीसांचे एकदम पन्नास झाले होते. घासघीस न करतां आंकडा पंधरा हजारांनीं वाढायला नर्गिजचें अस्तित्व कारणीभूत झालें असावें असें रमाबाईना वाटलें. ती म्हणाली, 'या बाबतींत मीं कांहीं बोलूं शकत नाहीं. खरं पाहिलं तर त्याचा तो मुखत्यार आहे. पण वडील माणसांचाच जर सल्ला घ्यायचा म्हटलं तर माझ्यापेक्षां त्याच्या वडिलांनाच विचारणं बरं—'

'तर मग आपण तुमच्या गांवीं जाऊं!' जहागिरदार म्हणाले, 'मुहूर्त जवळ आले आहेत, तेव्हां यांची रजा संपायच्या पूर्वींच कार्य उरकून घेणं शक्य असलं, तर आमची तयारी आहे.'

प्रकरण हातघाईला आलें आहे असें पाहून गोविंदा सरसावला आणि म्हणाला, 'पण एक हकीकत आपल्याला माहीत आहे का? मीं यांचा औरस मुलगा नाहीं.—'

'दत्तकच ना?' जहागिदारसाहेब म्हणाले, 'अहो आमचे किती तरी संस्थानिक आणि जहागिरदार दत्तकच आहेत!'

'मीं दत्तकसुद्धां नाहीं!' गोविंदा म्हणाला.

'दत्तकसुद्धां नाहीं?' जहागिरदार स्तंभित होऊन म्हणाले, 'म्हणजे काय?'

'म्हणजे असं—' गोविंदा गंभीरपणें म्हणाला, 'कीं मी एक अनाथालयांतलं पोसायला घेतलेलं मूल आहे. माझ्या आईबापांचा थांगपत्ता नाहीं. मीं कुणाचं मूल आहें हें कुणालाच माहीत नाहीं!'

जहागिरदार कुटुंब स्तंभित झालें. क्षणभर कुणाच्याच तोंडून शब्द निघेना.

'नाळ न कापतां घेतलेल्या मुलाची जातकुळी कुणी पहात नाहींत—' रमाबाई उद्गारली.

एकदम प्रफुल्लित होऊन जहागिरदार म्हणाले, 'असं आहे ना? मग कांहींच हरकत नाहीं. तो धर्मच आहे मुळीं. तसा शास्त्राधारच आहे. जो नाळ कापील त्याचं तें औरस मूल—' राणीसाहेबांकडे एक नजर फेंकून पुन्हां रमाबाईकडे वळून

जहागिरदार म्हणाले, 'मग केव्हां जायचं तुमच्या गांवीं ?' जहागिरदारांचा ह्या उतावीळपणा पाहून गोविंदाला अत्यंत आश्चर्य वाटलें. आय्. सी. एस्. झालेल्या माणसाबद्दल घरंदाज जहागिरदारांनासुद्धां जर एवढा आदर वाटतो, तर सामान्य माणसांची काय कथा !

जहागिरदारांची ती मनोवृत्ति पाहून गोविंदाला शिसारी आली.

'आधीं मीं पत्र लिहून कळवतें', रमाबाई म्हणाल्या, 'उत्तर येईल त्याप्रमाणें मग पुढचं काय तें ठरवूं.'

विजयाच्या आनंदानें तें जहागिरदारकुटुंब त्या दिवशीं हर्षोत्फुल्ल अंतःकरणानें सरदारगृहांत जातें झालें.

## प्रकरण १५ वें.

पन्नास हजार रुपये हुंड्याचा मोह मोठाच होता यांत शंका नाहीं आणि म्हणूनच रमाबाईनें कबूल केल्याप्रमाणें अण्णासाहेबांना पत्र लिहिलें.

अण्णासाहेब आले, त्यांनीं मुलगी पाहिली, मुलगी त्यांना पसंत पडली. आतां निश्चित होण्याचें काय तें बाकी राहिलें.

प्रश्न होता तो गोविंदाच्या संमतीचा! गोविंदाला मुलगी पसंत आहे असें धरून अण्णासाहेब चालत होते. पण रमाबाईला संशय होता. नर्गिजची भेट पुन्हां होईपर्यंत तिला विशेष कांहीं वाटत नव्हतें. पण ती येऊन भेटल्यानंतर आणि त्या दोघींनाही समोरासमोर पाहिल्यानंर स्वतः रमाबाईलाच संकोच उत्पन्न झाला होता.

अण्णासाहेबांनीं गोविंदाला विचारलें तेव्हां तो म्हणाला, 'आईनं तुम्हाला पत्र लिहिण्यापूर्वी मला विचारलं असतं तर मीं तिला पत्र लिहूं दिलं नसतं, यांतच काय तें समजा म्हणजे झालं!'

अण्णासाहेबांना मोठा धक्का बसला. रमाबाईपेक्षांही पन्नास हजार रकमेचा त्यांच्या मनावर मोठा परिणाम झाला होता. शिवाय एका जहागिरदाराशीं शरीरसंबंध—गांवच्या दृष्टीनें त्यांची इभ्रत केवढी तरी वाढली असती.

अण्णासाहेबांनीं गोविंदाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. त्यानें या विषयाची चर्चा करण्याचेंच मुळीं सोडून दिलें.

जहागिरदारांना कांहींच उत्तर न देतां अण्णासाहेब निघून गेले यावरून त्यांना उत्तराची कल्पना आली पाहिजे होती. पण तीं माणसें मोठीं चिकट होतीं. गोविंदाच्या बंगल्यावर येण्याचें त्यांनीं बंद केलें नाहीं. पूर्वीचा क्रम तसाच चालू होता.

योगायोगानें या दोन दिवसांत नर्गिज मात्र गोविंदाच्या घरीं आली नव्हती आणि त्यानेंही मुद्दाम होऊन तिला भेटायचा प्रयत्न केला नाहीं. पण ती जेव्हां आली, त्यावेळीं मात्र त्याला हायसें वाटलें. झालेली सर्व हकीकत गोविंदानें नर्गिजला सांगितली. त्यावेळीं तिलाही चमत्कारिक वाटलें. आधींच या प्रकाराचा तिला थोडासा अंदाज आला होता.

गोविंदा म्हणाला, 'रजा रद्द करून पुन्हां जाऊन नोकरीवर हजर व्हावं असं एकदां मला वाटूं लागलं होतं. या जहागिरदारकुटुंबानं मला सतावून सोडलं आहे. पण तुझी भेट झाल्यामुळं जायचं माझ्या जिवावर येतंय.'

गोविंदाचे ते उद्गार ऐकून नर्गिज अस्वस्थ झाली. रमाबाईच्या वृत्तींत झालेला फरक पाहूनही तिला आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. कांहीं तरी बोलायचें म्हणून ती म्हणाली, 'मला वाटतं, जहागिरदारांची का होईना, पण मुलगी एकंदरींत बरी दिसते. पन्नास हजार म्हणजे कांहीं लहान रक्कम नव्हे—'

'तूंच म्हणतेस का हें?' गोविंदा म्हणाला, 'पैशासाठीं का मी लग्न करूं? खरोखरच ती मुलगी चांगली आहे—म्हणजे ती मला पसंत आहे असं नव्हे, माझ्या एखाद्या मित्रानं जर मला तिच्याबद्दल मत विचारलं असतं तर मीं तिच्याबद्दल शिफारसच केली असती. पण प्रश्न आहे तो चांगुलपणाचा नाहीं कीं पैशाचा नाहीं.—त्या मुलीबद्दल मला कांहींच वाटत नाहीं. ती तरुण आहे, प्रकृतीनं सुदृढ आहे, दिसायला देखणी आहे, तरीदेखील मला तिच्याबद्दल कांहींसुद्धां वाटत नाहीं. ती मुद्दाम माझ्याशीं लगट करायचा प्रयत्न करते, पण तिच्या स्पर्शानं माझ्या आंगावर शहारे येतात. असं कां होतं तें मला सांगतां येत नाहीं. तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणत्याच तरुण स्त्रीशीं माझा परिचय झाला नव्हता—झाला काय तो हिचा —पण रस्त्यांतून जाणाऱ्या एखाद्या तरुणीबद्दल जसं मला कांहींच वाटत नाहीं तसंच कांहींसं हिच्याबद्दल होतं.'

'आणि माझ्याबद्दल ?' नर्गिजनें एकदम मधेंच विचारलें.

'तो प्रश्न विचारूं नकोस !' गोविंदा म्हणाला.

दोघेंही क्षणभर स्तब्ध राहिलीं. तितक्यांत रमाबाई आली नसती तर पुढें काय बोलावें याची त्या दोघांनाही पंचाईत पडली असती. नर्गिजला पहातांच रमाबाई थोडीशी ओशाळल्यासारखी झाली. झालेली हकिकत गोविंदानें तिला सांगितली असावी, असें तिला वाटलें.

गोविंदा म्हणाला, 'मला वाटतं, रजा रद्द करून पुन्हां नोकरीवर जावं. तुला काय वाटतं आई ?'

'एवढी घाई कां ?' रमाबाई म्हणाली, 'आलोंच आहों मुंबईला, त्यासारखं राहूं कांहीं दिवस ! पुन्हां इकडे यायचा योग लवकर येईल असं कांहीं वाटत नाहीं. रजा घेतलीच आहे, मग उगीच घाई कां ?'

मुंबईच्या इतर गोष्टी निघाल्या आणि त्यांत बराच वेळ उगीच गेला. बोलण्यांत कुणाचेंच अंतःकरण नव्हतें. एकमेक एकमेकांना फसवायचा प्रयत्न करीत होतीं.

नर्गिजचा अस्वस्थपणा वाढूं लागला. औपचारिक भाषणाचा तिला स्वभावतःच मोठा कंटाळा असे. त्या दिवशींची ती औपचारिकता तिला पहिल्यानेंच अनुभवावी लागली होती. या कुटुंबांत कित्येक दिवस ती आपलेपणाच्या भावनेनें राहिली होती. कुणीच कुणाशीं संकोच धरला नव्हता. पण तें वातावरण आतां बदललेलें पाहून नर्गिजला वाटलें, कीं या घरांत यापुढें आपण येणें श्रेयस्कर नाहीं. एकदम निरोप घेऊन ती जायला उठली त्यावेळीं रमाबाईनें तिला रहाण्याचा आग्रह केला नाहीं. ती गोष्ट तिच्या मनाला लागली गाडीपर्यंत पोंचवण्यासाठीं गोविंदा ज्यावेळीं खालीं आला त्यावेळीं ती म्हणाली, 'मला वाटतं परिस्थिति बदलली आहे; माझ्या येण्यानं तुमच्या कौटुंबिक वातावरणांत विक्षेप होतो आहे. यापुढं मी येऊं नये हेंच बरं !—' ती मोटरमध्यें बसण्यासाठीं दरवाजा उघडीत असतां तिची नजर गोविंदाच्या चेहऱ्याकडे गेली. त्याचे डोळे भरून आले होते. भावनावशतेची आत्यंतिकता कधींही न दिसूं देणारा हा पुरुष असा गहिंवरलेला दिसतांच तिची मनःस्थिति चमत्कारिक झाली.

सद्गदित स्वरानें गोविंदा म्हणाला, 'हें तुला शोभतं का नर्गिज ?—' नर्गिजच्या तोंडांतून शब्द निघेना. 'ठीक आहे,' गोविंदा म्हणाला, 'मी जन्माचाच दुर्दैवी !—जन्माचाच एकलकोंडा—या एकलेपणांतच मीं मरावं असा योग असला तर त्याला तूं तरी काय करणार अन् मी तरी काय करणार ? '

गाडींत बसत बसत नर्गिज म्हणाली, ' जा कपडे करून या. आपण बरोबरच जाऊं ! '

गोविंदाचा चेहरा फुलून निघाला. तो धांवतच बंगल्यांत जाऊन कपडे करून आला. गाडींत येऊन बसतांच नर्गिजनें गाडी चालू केली. ती स्वतःच गाडी हांकीत होती.

' असं वाटलं, ' गोविंदा म्हणाला, ' कीं अजून जगायला जागा आहे. '

' एवढे हताश कां झालांत ? मी नुसतं येत नाहीं म्हटलं म्हणून ? '

' असं झालं खरं ! माझ्या मनःस्थितिची तुला कल्पना असली पाहिजे होती. मीं अगदींच एकमार्गी माणूस आहें. एकमार्गी रहाण्याची मला पहिल्यापासून संवय लागली आहे. प्रेम, प्रेम—काय म्हणतात तें अजूनही मला कळलेलं नाहीं अन् मला वाटतं, तें मला कळणारही नाहीं—अन् कळायला नकोही आहे. कादंबऱ्यांतील प्रेमाच्या गोष्टींवर माझा विश्वास बसत नाहीं. तसंच प्राकृतिक आकर्षणसुद्धां माझ्या ठिकाणीं तेवढं तीव्र नाहीं. तूं जवळ असलीस तर माझं मन चंचल होतं खरं, पण ती जहागिरदाराची पोरटी जवळ आली तर शिसारी कां येते हेंच मला कळत नाहीं. तसं पाहिलं तर प्राकृतिक आकर्षणाला ती सत्पात्र आहे—' तो क्षणभर स्वस्थ राहिला. मोटर मुंबईच्या गर्दीच्या रस्त्यानें जात होती. मधून मधून पोलीसनें हात दाखविल्यामुळें थांबावें लागत होतें–तरीही नर्गिज कांहीं बोलत नव्हती. ' कुठं चाललों आहोंत आपण ? ' गोविंदानें मधेंच विचारलें.

' जिकडे रस्ता नेईल तिकडे ! ' नर्गिज हळूच हंसत म्हणाली.

' कोणता रस्ता ? '

' सरळ रस्ता ! '

' पुष्कळच सरळ रस्ते आहेत या मुंबईत ! '

' मुंबईतला नव्हे--आयुष्याच्या ! आयुष्याच्या सरळ रस्त्यानं आपण चाललों आहोंत, अशी आजच मला खात्री पटली. कुठं स्वस्थ बसून रहाणं मला आवडत नाहीं म्हणून मी सारखी मोटरींतून हिंडत असतें--जिकडे वाट फुटेल तिकडे हिंडत असतें. इथं मी स्वतंत्र आहें--एका स्वतंत्र ब्लॉकमधें रहातें आहें--इथं कुणाचा उपसर्ग नाहीं. कोण माझ्यावर सत्ता गाजवीत नाहीं. उशीर कां झाला, लवकर कां आलीस, असले मायेचे प्रश्न कुणीच करीत नाहीं ! मीं वाटेल तेव्हां येतें, वाटेल तेव्हां जातें, वाटेल तिकडे भटकतें, कुणी बरोबरचे विद्यार्थी आले तर त्यांच्याशीं गप्पा मारतें, पण कुणीच मला कसलीही मर्यादा घालीत नाहीं. मला अमर्याद व्हावंसं वाटतं. कुटुंबांत मर्यादा असते, शिष्टाचार असतात, मला दोन्हीही आवडत नाहींत, म्हणूनच मीं इथं एकटी रहातें. माझ्या आईबापांना हें माझं वागणं आवडत नाहीं. तुम्हांला मीं सांगितलं नव्हतं, पण आतां सांगतें, माझ्या आईबापांना पटत नसलेल्या विषयाची मी चर्चा करतें म्हणून मला त्यांनीं टाकलं आहे. माझ्या आजीकडून मला जें कांहीं मिळालं आहे त्याच्यावरच सध्यां माझा चरितार्थ चालला आहे--नव्हे चैन चालली आहे. जन्मभर एकटं राहून चैन करण्याइतकी रक्कम माझ्या आजीनं माझ्यासाठीं ठेवली आहे. मीं कुणाचीच मिंधी नाहीं--' एकदम गाडी थांबवून ती म्हणाली, ' येतां का माझ्या घरीं ?'

' तेवढ्याच् साठीं तर मीं बरोबर आलोंय् !' गोविंदा म्हणाला. नर्गिजनें गाडी फिरवली आणि ताडदेववर असलेल्या एका छोट्याशा बंगलीजवळ आणून उभी केली.

ती इमारत दोन मजलीच होती. त्यांत चार कुटुंबें रहात होतीं. चारी पारशी कुटुंबेंच होतीं. पण त्यांतील कुणाशींही नर्गिजचा परिचय होता असें गोविंदाला दिसून आलें नाहीं. ती ज्या ब्लॉकमध्यें रहात होती तो ब्लॉक उत्तम रीतीनें सजवलेला होता. अगदीं आधुनिक असें फर्निचर प्रत्येक खोलींत नीटनेटक्या रीतीनें मांडलेलें होतें. त्या ब्लॉकमध्यें एक हॉल अन् तीन खोल्या होत्या. त्या एवढ्या

मोठ्या जागेंत ती एकटीच रहात होती. कामासाठीं एक ख्रिश्चन मुलगी ठराविक वेळीं येत असे. कुठें तरी कोणत्याही हॉटेलांत जाऊन केव्हां तरी जेवायचा तिचा नित्यक्रम होता.

आंत येतांच तिनें गॅसचा स्टोव्ह पेटवला आणि वर चहाचें भांडें ठेवलें. चहा करीत करीत ती बोलत होती, ' मी इथं एकटीच रहातें. वाटेल तेव्हां वाटेल तीं माणसं इथं येत जात असतात, हें माझ्या शेजाऱ्यांना खपत नाहीं. येणारीं माणसं नुसतीं पारशीच असतीं तर त्यांनीं तक्रार केली नसती. पण इथं सारेच येतात. येत नाहींत बहुधा पारशीच —याचाच त्यांना राग येतो. म्हणूनच माझ्याशीं कुणी बोलत नाहीं—म्हणूनच मी मोठी सुखांत आहें.'

चहा तयार करून तिनें पेला त्याच्या हातीं दिला. गोविंदाचें लक्ष कुणीकडे होतें कुणाला ठाऊक, त्याच्या हातून पेला एकदम गळून पडला तो नर्गिजच्या आंगावर—

' काय वेंधळे आहांत ? ' असें म्हणत ती मोठमोठ्यानें हंसत सुटली, ' आतां जरा थांबा, मीं ही साडी सोडून ठेवतें. ' असें म्हणून तिनें भिजलेली साडी सोडून एकदम बाजूला ठेवली——

पारशी बायका आपल्या घरीं बहुधा याच पोशाखांत असतात याची कल्पना गोविंदाला नव्हती ! दुसरा चहाचा पेला भरून घेऊन तशीच ती त्याच्या हातीं देऊं लागली तेव्हां संकोचानें तो तिच्याकडे पाहूं लागला, तेव्हां ती म्हणाली, ' पहातां काय ? हाच आमचा घरचा पोशाख ! कुणी परकं आलं तरच आम्हीं साडी पेहेनतों—'

गोविंदाला कळून चुकलें कीं नर्गिज आपल्याला परका मानीत नाहीं.

## प्रकरण १६ वें.

नुसती तुमान आणि सदरा घातलेली स्त्री गोविंदानें यापूर्वी कधींच पाहिली नव्हती. तो विलायतेंत राहिला होता. पण विलायतेंतील सुखासीन लोकांचीं चैनीचीं स्थानें त्यानें कधींच पाहिलीं नव्हतीं. आपला अभ्यास भला कीं आपण भला, यापलीकडे त्यानें कुणाचा परिचयसुद्धां करून घेतला नव्हता. त्यामुळें सुधारलेल्या देशांतले वेशभूषेचे निरनिराळे प्रकार त्याच्या पहाण्यांत आले नव्हते.

पण ही वेशभूषा सुधारलेल्या देशांतलीही नव्हती. आपले हिंदु लोक आधीं पारशी लोकांशीं फारसा संबंध ठेवीत नाहींत. अन् त्यांतून ठेवलाच तर तो नुसता भेटीगांठी आणि व्यवहारापुरता. अर्थात् पारशी लोकांच्या कौटुंबिक रहाणीची पुष्कळशा हिंदू लोकांना जिथें मुळीं कल्पनाच नाहीं, तिथें मुंबईतसुद्धां क्वचित्च रहाटलेल्या गोविंदाला तो तिचा पोशाख पाहून नवल वाटलें असल्यास नवल नाहीं.

नर्गिजनें बोलायला सुरवात केली पण गोविंदाचें तिकडे लक्ष नव्हतें. त्याचें मस्तक भ्रमण करीत होतें. कितीतरी प्रकारचे विचित्र विचार त्याच्या डोक्यांत येऊन जात होते—

'मीं काय बोलतें तें ऐकलंत का ?'' नर्गिज त्याला हालवून म्हणाली. गोविंदा दचकला आणि ओशाळवाणा हंसला. त्याला काय वाटलें तें त्यानें जेव्हां स्पष्टपणें सांगि-

तलें तेव्हां नर्गिज म्हणालीं, 'तसं वाटणारच! तुम्ही हिंदुलोक—त्यांतून महाराष्ट्रीय लोक अगदीं कूपमंडूक वृत्तीचे आहांत. दुसऱ्यांच्या चालीरीति, आचारविचार समजून घ्यायचा तुम्ही प्रयत्नच करीत नाहीं. आणि म्हणूनच तुम्हांला असा कांहीं प्रसंग आला म्हणजे चमत्कारीक वाटतं—'

'तसं नव्हे' गोविंदा म्हणाला, 'यांत आचाराचा प्रश्न नाहीं. विचाराचाही प्रश्न नाहीं. हा विकाराचा प्रश्न आहे.—माझ्या मनावर झालेल्या पहिल्याच वैकारीक भावनेचा हा परिणाम आहे. मीं जातों आतां. यावेळीं मीं इथं रहाणं बरं नव्हे—'

'इतकं का तुमचं मन बेसावध आहे?' नर्गिज म्हणाली, 'मन काबूंत ठेवायला माणसानं शिकलं पाहिजे. आमच्या जातींत एक बरं आहे. तुमच्यासारखे वेडगळ आचार नाहींत. एकमेकांना आम्हीं खेटून बसलों तरी आम्हांला त्याचं कांहीं वाटत नाहीं—कारण पहिल्यापासूनच तशी संवय असते आम्हां लोकांना! चांगले एकमेकांना कवटाळून बसतों आम्हीं! —पण तुम्ही लोक नुसता आंगाला हात लावायलासुद्धां भितां! पाणीग्रहण म्हणजे लग्न, असा समज असल्यामुळें कोणत्याही स्त्रीच्या हाताला हात देणं देखील तुम्हां लोकांना निषिद्ध वाटतं—' गोविंदाचा हात धरून त्याला उठवून एका शेजारच्या कोचावर बसवीत ती म्हणाली, 'कांहीं नाहीं जायचं. बसा इथं. मला पुष्कळ बोलायचं आहे अजून.'

'खरं सांगूं?' गोविंदा म्हणाला, 'मला मोठं चमत्कारिक वाटलं. जहागिरदारांची मुलगी अशीच खेटून बसायचा प्रयत्न करी, त्यावेळीं मला तिची शिसारी येई. पण—पण—' त्याला पुढें बोलतां येईना.

नर्गिज मोठमोठ्यानें हंसत सुटली. हसतां हसतां मुरकुंडी वळून ती त्याच्या आंगावर लोटली त्यावेळीं तो आंग चोरूं लागला.

'माफ कर, माफ कर,' गोविंदा म्हणाला, 'माझा असा अंत पाहूं नकोस. मीं एक खुळाभोळा जीव आहें. मला जगाचा अनुभव नाहीं. बरं काय—वाईट काय, पाप काय—पुण्य काय, याचा अजून मला ठाव लागला नाहीं. हें सारं पाहिलं म्हणजे असं वाटतं, कीं जगाचे कारभार चालवण्याचं जोखमीचं काम

आमच्यासारख्यांवर टाकण्यांत सरकारनं मोठी चूक केली आहे. सगळेच कांहीं माझ्यासारखे नसतील. पण माझ्यासारखा जो कुणी असेल त्याला असल्या जबाबदारीच्या नोकरीवरून एकदम दूर केलं पाहिजे असं वाटतं—'

'पुरे झालं.' नर्गिज म्हणाली, 'हा तुमचा दुबळेपणाच मला काढून टाकायचा आहे. एकदां तुम्हीं माझं शिष्यत्त्व कबूल केलं होतं.—चांगलं तरबेज केलं पाहिजे तुम्हांला. जगाचे टक्केटोणपे खायला शिकवलं पाहिजे—' एक मोठा सुस्कारा सोडून ती गंभीरपणानें म्हणाली, 'मला वाटतं, साऱ्या महत्त्वाकांक्षा बाजूला टाकून तुमच्या संगोपनाची जबाबदारी मला पत्करावी लागणार!' ती गंभीरपणानें असें बोलली खरी पण लगेच एकदम हांसत सुटली. गोविंदा बावरून गेला.

'या जगांत माझा कसा निभाव लागणार!' तो उद्गारला, 'मला वाटतं मला ही नोकरी सोडून द्यावी लागणार! जगाचा जसजसा अनुभव येतो आहे–तो अगदींच थोडा आहे खरा–पण त्याचा परिणाम मोठा प्रभावी आहे—तसतसं मला वाटतंय, कीं या नोकरीला मी नालायक आहें. आज ना उद्यां मला ही नोकरी सोडावी लागणार खास!—'

'किती छान होईल!' नर्गिज म्हणाली. गोविंदाला आश्चर्य वाटलें. 'किती छान होईल!' नर्गिज पुन्हां म्हणाली, 'तुमच्या बाबतींत जर मला कांहीं आवडत नसेल तर ही तुमची नोकरी!'

'पण त्या नोकरीमुळंच ना हे जहागिरदार माझ्या गळीं पडतात?'

'म्हणूनच तुमची ही नोकरी सुटली पाहिजे. आज चार लोक तुम्हांला मानतात ते केवळ तुमच्यासाठीं नव्हे—तुमच्या अधिकारासाठीं! "Heaven-born" असलेले असे हे तुम्हीं, ब्रिटिश सरकारच्या "Steel frame" चे घटक, म्हणूनच लोक तुम्हांला मानतात. या पोलादी चौकटींतून तुम्हांला केव्हां एकदां उखडून काढीन असं मला वाटतंय्!—'

'पण मग पुढं काय करणार?' गोविंदा अगदीं पोरकटपणें म्हणाला, 'ही नोकरी सोडली तर नंतर काय करतां येईल—कसा उदरनिर्वाह करतां येईल, याचा मला आज तरी अंदाज करतां येत नाहीं.'

'पायांतला बूट फेंकल्याशिवाय कुणी अनवाणी चालत नाहीं ! आणि एकदां अनवाणी चालायची संवय लागली म्हणजे मग बुटाची कुणी पर्वा करीत नाहीं. धैर्य लागतें तें बूट फेंकण्यांत !—'

नर्गिजच्या भाषणांत त्वेषाची प्रखरता होती. तें भाषण गोविंदाच्या हृदयाला झोंबून गेलें. या मुलीला आपल्याबद्दल कांहीं तरी आकर्षण आहे, असें त्याला निश्चित वाटलें होतें. तें आकर्षण जहागिरदाराच्या मुलीसारखें नव्हतें. जहागिरदाराच्या त्या विद्वान मुलीला अधिकारी नवऱ्याची जरुरी होती. जन्मापासून ती अधिकारी परिस्थितींत वाढली होती. म्हणून लग्न झाल्यावर आपल्या जहागिरीप्रमाणेंच जिथें आपल्याला अधिकार गाजवतां येईल, अशी परिस्थिती तिला पाहिजे होती. महाराष्ट्रांत पुष्कळ विद्वान होते, त्यांत कुणी वकील होते, कुणी डॉक्टर होते-कुणी व्यापारीही होते, त्यांतले कित्येक गोविंदापेक्षांही जास्त मिळकत मिळवणारे होते. पण जहागिरदारसाहेबांना तें पसंत पडले नसते. त्यांच्याकडे विद्वत्ता होती, श्रीमंती होती, पण अधिकार नव्हता. आणि म्हणूनच आक्कासाहेबानीं गोविंदाचा पाठपुरावा चालवला होता.

नर्गिजच्या बाबतींत म्हणूनच त्याला आश्चर्य वाटलें. जी परिस्थिती आक्कासाहेबांना आकर्षक वाटत होती तीच परिस्थिती नर्गिजच्या दृष्टीनें तिरस्करार्ह असल्यानें ज्यावेळीं तिनें सांगितलें त्यावेळीं त्याचा नर्गिजबद्दलचा आदर विशेष वाढला. तो म्हणाला, 'मीं अविचार करावा असं का तुला वाटतं ? ही सरकारी अधिकाराची पायांतली वहाण फेंकून मीं जगाच्या रस्त्यावर अनवाणी चालायला निघालों तर उदरनिर्वाह कसा करणार ? वडिलांच्या कृपेवर जगावं हें मला नामुष्कीचं वाटतं. त्यांनीं मला भरपूर शिक्षण दिलं-त्यांचं कर्तव्य संपलं. त्या कर्तव्य-फेडीच्या मोबदल्यांत वृद्धापकाळीं मीं त्यांना पोसलं पाहिजे, अशीही अपेक्षा ते करीत नाहींत ! त्यांनीं स्वतः भरपूर बेगमी करून ठेवली आहे-पण त्या बेगमींतला मूठपसा घेऊन जगावं हें मात्र मला केव्हांही आवडणार नाहीं.'

नर्गिज हंसली अन् म्हणाली, 'तुमचा अन् माझा परिचय झाल्यापासून असलं

जोरदार भाषण पहिल्यानंच मी तुमच्या तोंडून ऐकलं. विचार केला कीं मनुष्याला उपाय सुचतो. विचारपूर्वक अविचार केला म्हणजे त्या अविचाराचे परिणाम दुःखदायक होत नाहींत. तुम्हीं अमुक एक करा असं मीं केव्हांच सांगणार नाहीं. तसं सांगायचा मला अधिकारही नाहीं. पण मीं काय करणार आहें तें मात्र तुम्हांला आज सांगणार आहें—'

'कृपा करून मला कांहीं सांगूं नकोस !' गोविंदा म्हणाला, 'तूं काय करणार आहेस हें विचारायचं जसा मला अधिकार नाहीं, तसाच ऐकायचाही नाहीं. तूं काय करणार आहेस तें मला आपोआपच दिसून येईल. त्यापूर्वी तें मला कळायला नको आहे—' असें अर्धवटच बोलून गोविंदा एकदम स्वस्थ बसला.

क्षणभर वाट पाहून नर्गिज म्हणाली, 'तर मग बोलणंच खुंटलं. मग यापुढं आपण भेटायचं कशाला !'

तो बाण गोविंदाच्या वर्मी लागला तो एकदम गहींवरून आला अन् म्हणाला, 'पूर्वी मला कसंसंच वाटत होतं, पण आतां काय वाटतं आहे तें कसं सांगूं ? या क्षणाला—अगदीं या इथं आपण दुरावा विसरून जीं बसलों आहोंत त्या क्षणाला मला असं वाटतंय, कीं जन्मभर असंच बसून रहावं. हळव्या मनाच्या या असल्या भावना फारच थोडा वेळ टिकतात हें मला माहित आहे. पण मन हळवं असलं म्हणजे असल्या भावना निर्माण होणारच ! आयुष्यांत पहिल्यानंच आपण दोघेंही अशीं एकांतात एका जागीं आलों आहोंत. तरुणांच्या जीवनांत असले प्रसंग येणं बरं नव्हे, पण हा प्रसंग आला—मला वाटतं आजच्यापुरता तरी मीं या प्रसंगांतून निभावून गेलोंय्. पुढं केव्हां असा प्रसंग आला, तर मला नाहीं वाटत कीं मीं त्यांतून सहीसलामत निभावून निघेन म्हणून ! म्हणूनच मीं म्हटलं —' तो पुन्हां क्षणभर स्तब्ध राहिला अन् म्हणाला, 'काय बरं मीं म्हटलं ? यापुढं आपण एकमेकांना भेटूं नये असं मी म्हटलं का ? तसं म्हटलं असेल तर ती माझी चूक आहे. तसं तूं म्हटलं असलंस तर तुझीही चूक आहे. आपण एकमेकांसाठीं घडवलीं गेलों आहोंत. कांहींही झालं तरी आपल्याला दुरावतां येणार नाहीं-' त्या तसल्या परिस्थितींतही

नर्गिजच्या चेहऱ्यावर हंसण्याची लहानशी लकेर झळकल्यावांचून राहिली नाहीं। ती म्हणाली, 'मग आतां काय करायचं ठरवलं आहे तुम्हीं ?'

'त्याचाच मी विचार करतों आहें. आज मी एक प्रयोग करून पहाणार आहें, त्याचा परिणाम काय होतो तें मला कळलं, कीं तुझ्या प्रश्नाचं उत्तर मी देईन !'

नर्गिजचा निरोप घेऊन तो एकाएकीं तिथून निघून गेला.

घरीं आला त्या वेळीं आक्कासाहेबांची स्वारी तिथें त्याची वाट पहात बसल्याचें त्याला कळून आलें. हंसतमुखानें त्यानें आक्कासाहेबांचें स्वागत केल्याचें पाहून तिला आश्चर्य वाटलें. रमाबाईही थोडीशी आश्चर्यचकित झाली.

'फिरायला येतां का ?' त्यानें आक्कासाहेबांना विचारलें.

अर्थातच ती तयार होती. दोघेंही फिरायला निघालीं. हॅंगिंग गार्डनवरच्या एका बांकावर जाऊन तीं दोघेंही ज्यावेळीं बसलीं त्यावेळीं गोविंदानें पूर्वीची संकोच-वृत्ति सोडून दिली आहे असें आक्कासाहेबाला दिसून आलें. तो म्हणाला, 'मुंबईत आल्यापासून मला मोठा उत्साह वाटूं लागला आहे. जिल्ह्याच्या गांवीं कसं कोंडल्यासारखं वाटत असे. इथं मुंबईलाच येऊन रहावं असं आतां मला वाटूं लागलं आहे.'

'इथं घेणार का बदली करून ?' तिनें विचारलें.

'तें कांहीं माझ्या हातचं नाहीं. अन् इथं मुंबईत यायचं तर मग पारतंत्र्यांत कशाला रहायचं ? आय्. सी. एस्. झालों त्याच वेळीं मीं बॅरिस्टरची परीक्षा दिली आहे. शिवाय मी केंब्रिजचा पदवीधर आहें. बॅरिस्टर किंवा प्रोफेसर होणं मला दोन्हींही शक्य आहेत. यांतला कोणता पेशा पत्करावा असं तुम्हांला वाटतं ?'

आक्कासाहेबांचा चेहरा काळवंडला. ती म्हणाली, 'दोन्हीं पत्करूं नयेत. आहे तें काय वाईट आहे ? उद्यां कुठल्या जिल्ह्याचे कलेक्टर किंवा जज्ज म्हणून गेलांत तर राजाच्या थाटांत रहातां येईल. मुंबईत येऊन बॅरिस्टरी केली तर कदाचित् कलेक्टरच्या पगारापेक्षांही जास्त पैसे मिळतील—पण तें वैभव मिळायचं नाहीं !' कलेक्टरच्या वैभवाचीं काल्पनिक चित्रें रेखाटीत

प्रांतिक सरकारच्या होम मेंबर होईपर्यंतचा चित्रपट जेव्हां तिनें रंगवून दाखवला तेव्हां गोविंदाला खरोखरच कौतुक वाटलें. किती दूरवर विचार केला होता या जहागिरदाराच्या मुलीनें ! आणि आपण काय करणार होतों ? नोकरी सोडणार होतों ! बॅरिस्टर होणार होतों ! प्रोफेसर होणार होतों ! कदाचित् राजकारणांतही भाग घेण्याचा आपल्या मनांत विचार आला असता ! आणि त्याचे परिणाम काय झाले असते ? तें वर्णन ज्यावेळीं गोविंदानें केलें त्या वेळीं आक्कासाहेबानीं त्याचें बोलणें हंसण्यावारी उडवलें. ती म्हणाली, 'आपण कादंबऱ्या ल्याहायला घ्याल तर बरं होईल ! काल्पनिक चित्रं आपल्याला फार छान रेखाटतां येतात ! असल्या कल्पना कथा–कादंबऱ्यांत बऱ्या वाटतात ! पण हा व्यवहार नव्हे ! जगांत मोठं व्हायचं असलं, तर मला वाटतं, आपल्याला माझ्याच उपदेशाप्रमाणं चालावं लागेल. तुम्ही कितीही नाहीं म्हटलं, तरी तुम्हांला माझ्या बरोबर लग्न केल्यावांचून गत्यंतर नाहीं. ईश्वरानंच आपला जोडा घडवला आहे. त्याशिवाय का ही आपली अचानक गांठ पडली ?'

'खरं आहे तुझं म्हणणं !' असं म्हणून गोविंदानें एक समाधानाचा सुस्कारा सोडला.

दोघेंही आपआपल्यापरीनें संतुष्ट होऊन त्या दिवशीं आपल्या निवासस्थानीं गेलीं.

## प्रकरण १७ वें.

आक्कासाहेबांना सरदारगृहांत सोडून गोविंदा ज्यावेळीं परत आपल्या बंगल्यांत आला, त्या वेळीं त्याची प्रसन्न मुद्रा पाहून रमाबाई विचारांत पडली. कांहीं तरी विशेष झालें असावें असेंच तिला वाटलें. तिनें तसें विचारलेंसुद्धां, तेव्हां गोविंदा नुसता हंसून उगीच राहिला.

रमाबाईच्यानें रहावेना. ती म्हणाली, 'अगदीं हंसण्यावारी नेतो आहेस असं झालं आहे तरी काय?'

'आतां सांगतोंच', गोविंदा अवसानांत येऊन म्हणाला, 'अगदीं वेगवेगळ्या अशा दोन समाजांतल्या या दोन मुली माझ्या परिचयाच्या झाल्या. या दोघींपैकीं कुणा तरी एकीशीं लग्न करावं लागेल असा माझा योग दिसतो. दोघींशीं लग्न करणं शक्य नाहीं—नाहीं तर तसंही केलं असतं!–कारण एक मला मनःपूर्वक आवडते, आणि दुसरी आपल्या कौटुंबिक नजरेच्या दृष्टीनं आणि आर्थिक दृष्टीनं आपल्याला फायदेशीर वाटते! पन्नास हजार रुपये घरांत येणार!—दिसायलाही कांहीं वाईट नाहीं–सुशिक्षित आहे—घरंदाज आहे—'

'असं कुजकं कां बोलतोस?' रमाबाई म्हणाल्या, 'आमची नजर काय नुसती पैशावरच आहे?'

'मीं असं कुठं म्हटलं ?' गोविंदा म्हणाला, 'मीं तिचे सर्व गुण पुढं मांडले. पण दुसरीच्या बाबतींत मांडायला गुणांची यादी नाहीं. तिथं वैगुण्यंच आहेत. आधीं ती परजातीची आहे! हुंड्याची आशा नाहीं! शिकलेली असली तरी लोकदृष्टया ती फाजील आहे! सरकारी अधिकारी असलेला नवरा तिला आवडत नाहीं!—'

'कुणीं म्हटलं असं ?'

'तिनंच आज मला सांगितलं. अधिकारी माणसाचा तिला तिटकारा आहे. तिच्या दृष्टीनं माझ्यांत तेवढंच वैगुण्य आहे! आणि ही जी पन्नास हजारवाली आहे तिला अधिकारी असलेलाच नवरा पाहिजे. माझ्या दृष्टीनं तिच्यांत तेवढंच वैगुण्य आहे! तें प्रेम वगैरे काय म्हणतात तसला रोग काहीं मला जडलेला नाहीं! आतां तूंच सांग— तुला दोघींचीही चांगली पारख करतां आली आहे—व्यवहारी दृष्टीनं सांगूं नकोस—मीं अण्णासाहेब वकीलांच्या बायकोला विचारीत नाहीं—मीं माझ्या आईला विचारतोंय—सांग पाहूं मीं यांतली कोणती पसंत करूं ?'

रमाबाई विचारांत पडली. 'आई' हा शब्द उच्चारून गोविंदानें तिला संकटांत घातलें होतें. आईच्या हृदयानें ती विचार करूं लागली तेव्हां तिचें मन नर्गिजकडे ओढूं लागलें. व्यावहारिक दृष्टीनें—म्हणजे नुसत्या पैशाच्याच नव्हे— मानाच्या अन् इभ्रतीच्या दृष्टीनें पाहिलें तर आक्कासाहेबांचें नांव तोलाला भारी होत होतें!

ती म्हणाली, 'समज, नर्गिजशीं लग्न कर असं मीं म्हटलं, तर तेवढ्यासाठीं तूं काय नोकरी सोडणार आहेस ?'

'ती अटच आहे!' गोविंदा म्हणाला, 'त्याशिवाय तिच्याशीं लग्न होणं शक्य नाहीं!'

पुन्हां रमाबाई विचारांत पडली. तिला निश्चित मत देतां येईना. ती म्हणाली, 'नोकरी सोडावी असं तुला वाटतंय का ?'

'मला प्रश्न पडला आहे.' गोविंदा म्हणाला, 'माणसाच्या आयुष्यांत महत्त्व

द्यायचं नोकरीला कीं लग्नाला ? या प्रश्नाच्या उत्तरावरच पुढला निर्णय अवलंबून रहाणार ?'

'तें कांहीं मला सांगतां यायचं नाहीं.' रमाबाई म्हणाल्या, 'मीं कांहीं नोकराच्या संसारांत वाढलें नाहीं. त्यांचा धंदा वकीलीचा आहे. पण वकीलालासुद्धां ज्याच्यापुढं वाकावं लागतं अशा प्रकारची तुझी नोकरी आहे ! पैसा मोठा कीं अधिकार मोठा—मानमरातब मोठा—हें ज्याचं त्यानं ठरवायचं असतं ! तुझी आई म्हणून—साहेबांची आई म्हणून मी तुझ्याबरोबर राहिलें. तिथं गांवचे लोक माझा मान ठेवीत होते, पण त्या मानांत कांहीं सलोखा नव्हता. गांवच्या चार वकीलांच्या बायकांत यापेक्षां जास्त सलोखा असतो. तेव्हां या बाबतींत मला तरी कांहीं मत देतां यायचं नाहीं.'

'मग हें कोडं सुटणार कसं !' गोविंदा म्हणाला, 'हें कोडं सोडवीत बसलों असतांना माझं सारं आयुष्य कोरडंच जाणार का ?'

रमाबाई उगीच राहिली. आईच्या हृदयानें तिनें त्या प्रश्नाकडे पहायचें ठरवलें होतें म्हणून तिला कांहींच उत्तर देतां येईना. गोविंदानें उत्तरासाठींही आग्रह धरला नाहीं.

त्या दिवशीं तो विषय तेवढाच राहिला. दुसऱ्या दिवशीं नित्यप्रमाणें आक्कासाहेब आल्या त्यावेळीं त्या मोठ्या खुषींत असल्याचें पाहून रमाबाईला चोज वाटलें. या पोरीला घेऊन गोविंदा खेळवीत तर नसेल ना, अशीही शंका तिच्या मनांत आली.

त्या दिवशीं गोविंदा तिच्याशीं फार मोकळ्या मनानें बोलत होता. हांसत खिदळत होता. तीही तितकीच खुषींत होती. रमाबाईनें दोघांनाही कांहींच विचारलें नाहीं. आणि आक्कासाहेबानें त्या दिवशीं रमाबाईचीही खिजगणती धरली नाहीं.

दोघेंही फिरायला निघालीं. त्या दिवशीं गोविंदानें ड्रायव्हरला बरोबर घेतलें नव्हतें. तोच स्वतः मोटर चालवीत होता, आणि आक्कासाहेब त्याच्या शेजारीं बसली होती.

मोटर ताडदेवला नर्गिजच्या निवासस्थानाकडे येऊन थांबली. दोघेंही वर गेलीं. नर्गिज घरींच होती. त्या दोघांना पाहून नर्गिजला एक क्षणभरच आश्चर्य वाटल्यासारखें दिसलें, पण लगेच भानावर येऊन तिनें दोघांचें स्वागत केलें.

हवापाण्याच्याच बोलण्यानें सुरवात झाली. नर्गिजनें विचारलें, 'चहा घेतां का?'

'हो हो तर!' गोविंदा म्हणाला, 'तेवढ्यासाठीं तर मीं आलों.'

'मला नको चहा!' उसना आव आणीत आक्कासाहेब म्हणाली.

'कां नको?' नर्गिजनें विचारलें, 'तुम्हीं तर तिकडे चहा घेत होतां!'

आक्कासाहेब विचारांत पडली. जातीपातीचें तितकेंसें बंधन जरी ती मानीत नव्हती, तरी इथें धर्माचा प्रश्न होता. विधर्मी माणसाच्या हातचा चहा कसा घ्यायचा? हिच्या घरीं किरिस्तावीण काम करीत होती, हें तिला समोर दिसत होतें.

'कांहीं हरकत नाहीं,' गोविंदा म्हणाला, 'आम्हीं दोघंही घेऊं चहा!'

'कोण करणार चहा?' आक्कासाहेबानें हळूच विचारलें.

'असं होय?' नर्गिज हंसत म्हणाली, 'आतां माझी नोकर बाई आली आहे ती करतेय चहा—ती नसती तर मींच करून देणार होतें!'

'पण ती किरिस्तांव आहे!' आक्कासाहेब म्हणाली.

नर्गिज मोठमोठ्यानें हंसत सुटली. गोविंदाही हंसूं लागला. आक्कासाहेब ओशाळल्यासारखी झाली. ग्रीन्स हॉटेलची आठवण तिच्या समोर उभी राहिली.

'तिकडे माझ्याकडे सैंपाकी गोव्याचा किरिस्तांवच आहे!' गोविंदा म्हणाला, 'तिथं आईपुरता एक ब्राह्मण सैपाकी आणला होता—'

'असं का!' आक्कासाहेब उद्गारली, 'मग चालेल मला चहा!'

साऱ्या कोड्याचा उलगडा झाला. गोष्ट क्षुल्लक होती खरी, पण तेवढ्याच त्या प्रसंगामुळें नर्गिजप्रमाणें गोविंदालाही किती तरी प्रश्नांचीं उत्तरें मिळाल्यासारखीं वाटलीं.

तेवढी चर्चा झाल्यावर आक्कासाहेबांनीं चहा घेतला, पण तो घेत असतांना तिला संकोच वाटत असल्याचें स्पष्ट दिसून येत होतें. माणसाला ज्या गोष्टीचा संस्कार

नसतो, ती गोष्ट करतांना त्या माणसाला जी सक्तीची मुस्कटदाबी होत असते, त्या सक्तीमुळें दांतओंठ खाऊन जसें तें माणूस त्या दिव्यांतून पार पडत असतें तसाच प्रकार यावेळीं होत होता.

नर्गिज म्हणाली, 'चहा घेववत नसेल तर ठेवून द्या. उगीच जिवाला त्रास करून कां घेतां ? '

'नाहीं, नाहीं.' आक्कासाहेब म्हणाली, 'चहा फार छान आहे.— ' पण तिच्या चेहऱ्यावर दिसणाऱ्या विकारांशीं उद्गारांचा मेळ बसत नव्हता.

नर्गिजनें आक्कासाहेबाशीं बोलायला सुरवात केली. एकापरीनें ती तिची परीक्षाच घेत होती. अभ्यासाच्या पुस्तकांपलीकडे तिनें फारसें कांहीं वाचलें नसावें असें तिला दिसून आलें.

'दुसरीं पुस्तकं कशाला वाचायला हवींत ?' गोविंदा म्हणाला, 'हीं तुमचीं मुंबईच्या विद्यार्थ्यांचीं ढोंगं आहेत. असल्या गोष्टीचं मला महत्त्व वाटत नाहीं. पदवी मिळवण्यासाठीं जेवढी आवश्यकता आहे, तेवढ्याच पुस्तकांचा कसून अभ्यास केला म्हणजे झालं. मला वाटतं, विद्यार्थ्यानं तरी आपल्या अभ्यासाबाहेरच्या पुस्तकाकडे विशेषसं लक्ष देऊं नये.'

नर्गिजच्या जागीं दुसरी कुणी असती तर गोविंदाच्या त्या उद्गाराबद्दल तिला आश्चर्य वाटलें असतें. पण नर्गिजला उलट थोडेंसें समाधान वाटलें. या व्यवहारी जगांत बेमालूम खोटें बोलतां येण्याची कला साधल्याशिवाय माणूस यशस्वी होत नाहीं. दांभिकपणाला कुणी कितीही नांवें ठेवीत असले, तरी या गुणां-खेरीज माणूस चारचौघांत खुलून दिसूं शकत नाहीं. या वृत्तीला 'पॉलिसी' असें मोठें, भव्य आणि गोड नांव देण्यांत येतें. या शब्दाला योग्य असा मराठी शब्द—दांभिकपणाखेरीज—अजून कुणी शोधून काढलेला नाहीं. ही वृत्तीच मुळीं परदेशी असल्यामुळें त्या सुटसुटीत अशा परदेशी शब्दानेंच तिचा बरोबर असा अर्थ होऊं शकतो. ही कला अवगत करून घ्यायला आतां गोविंदानें सुरवात केली आहे, असा नर्गिजनें अंदाज केला.

आक्कासाहेबांना घेऊन ज्या वेळीं गोविंदा निघाला त्या वेळीं नर्गिज म्हणाली, ‘ अशीच केव्हा तरी इथं पायधूळ झाडीत चला. मीं इथं अगदीं एकटीच असतें—आमच्या जातीच्या बायका माझ्याशीं फारसा संबंध ठेवीत नाहींत—तुमच्या तिकडे आलें तर तुमच्या आईसमोर तितक्या खुल्या दिलानं बोलतां येत नाहीं; तेव्हां तुम्हीं उभयतां इथं येत जाल तर माझ्यावर फार उपकार होतील. पाहिजे तर आपण वेळ ठरवूं, म्हणजे हमखास भेट होण्याची खात्री राहील.’

वेळ ठरवून घेऊन तीं दोघेंहीं निघून जुहूकडे निघून गेलीं.

जुहूच्या किनाऱ्यावर पुळणींत बसायचा आक्कासाहेबाला हा पहिलाच अनुभव होता. तिनें संकोच सोडून दिला होता. आतां आपलें लग्न ठरलें आहे अशा ठाम समजानें ती गोविंदाशीं वागत होती. आणि तो तिचा समज दृढ व्हावा असेंच गोविंदाचें वर्तन चाललें होतें. त्याचें मन त्याला खात होतें—आपण कांहीं तरी पाप करतों आहोंत असेंही त्याला वाटत होतें. पण आयुष्यांतलें अत्यंत महत्त्वाचें असें कर्तव्य पार पाडण्यासाठीं या दांभिकपणाची आवश्यकता आहे, असा समज करून घेऊन तो चालत होता.

त्यावेळीं जुहूच्या किनाऱ्यावर आजच्यासारखी गर्दी नसे. साऱ्या वाळवंटांत कुणी तरी एकादें दुसरेंच पारशी किंवा ख्रिस्ती जोडपें हिंडत असलेलें दिसून येई. त्यामुळें कोणत्याही प्रकारचा संकोच वाटण्याजोगी परिस्थिति नव्हती.

त्या दिवशीं आक्कासाहेबानें डाव टाकण्याचा निश्चय केला होता. नर्गिजचा आणि गोविंदाचा यापूर्वीचा कांहीं तरी लागाबांधा असावा असा तिला संशय आला होता. तें बंधन आपल्या सहवासानें नुसतें ढिलेंच नव्हे, तर सुटून गेलें पाहिजे असा निश्चय करून तिनें डाव टाकण्यास सुरवात केली होती.

तारुण्यसुलभ मनोवृत्तींच्या कोमलतेची सर्वांगीण भावनात्मक छटा चेहऱ्यावर आणण्याचा आटोकाट प्रयत्न करीत ती त्याच्याशीं बोलत होती. तिच्या दृष्टींतील कामुकतेचे कटाक्ष अकारण आणि बुद्धिपुरस्सर फेंकले जात होते, याची कल्पना गोविंदाला आल्यावांचून राहिली नाहीं. ती म्हणत होती, ‘ प्रेम

म्हणजे काय हें यापूर्वी मला माहीत नव्हतं. प्रेमाचीं वर्णनं मीं वाचीत होतें. प्रेमावरचीं काव्यं माझ्या वाचनांतून ज्यावेळीं येत होतीं, त्यावेळीं शब्दचमत्कारापलीकडे मला त्यांची किंमत वाटत नव्हती. आतां आपला परिचय झाला. हा जो परिचय झाला तो एक प्रकारें सक्तीनें झाला. सरकार आणि राणीसाहेबांनीं मला बोलावून आणलं त्या वेळीं मला मोठा राग आला होता. मी आतां लहान का? माझी संमति घेतल्याशिवाय कां म्हणून माझं लग्न ठरवायचा यांनीं बेत करावा? आलें त्यावेळीं तशी भांडलें सुद्धां. सरकारना राग आला. ते मला टाकून बोलले. केवढं व्याख्यान दिलं मला त्यांनीं! पण त्यावेळीं मला माझं मन कळलं नव्हतं— तुमचा परिचय झाला नव्हता—तो परिचय झाला नि आतां असं वाटूं लागलं—'

तिनें एक मोठा सुस्कारा सोडला, तिरप्या दृष्टीनें गोविंदाकडे पाहिलें. तिला वाटलें, गोविंदाचा सारा जीव डोळ्यांत आला होता. ती पुढें म्हणाली, 'काय वाटतं तें आतां सांगतां येत नाहीं. असं वाटतं, कीं आतां पुन्हां घरीं जाऊंच नये. असं वाटतं, कीं आतां जीवनाची दिशा एकच—दुजेपणाची भावना हळूहळू विरघळत चालली. मी तुमच्याबरोबर येतें-तासन् तास बरोबर असतें—पण सोडून जातें तेव्हां जीव कसा कासावीस होतो. असं वाटतं-असं वाटतं— !'

गोविंदा घाबरला. आक्कासाहेबांच्या दोन्ही हातांचा विळखा आपल्या गळ्याभोंवतीं केव्हां पडला, हें त्याला कळलेंसुद्धां नाहीं. तिच्या वेगेंत त्याचा श्वास कोंडून जात होता. आपल्या दांभिकपणाचें बक्षीस अशा प्रकारें इतक्या लवकर मिळेल, असें त्याला वाटलेंसुद्धां नव्हतें. तिला दूर लोटून द्यावें-एक लाथ मारून निघून जावें-असें वाटत असतांनासुद्धां त्यानें आत्मसंयमन केलें.

तिच्या पाठीवरून हात फिरवीत तो हळूच म्हणाला, 'कुणीतरी पहातील ना? ते पहा—ते पहा! कुणी इकडेच पहात आहेत!—'

'पाहूं देत!' ती त्याला आणखी बिलगत म्हणाली, 'आतां कुणाचीच पर्वा नाहीं मला. अगदीं सरकारच्या समोर—तुमच्या आईच्या समोरसुद्धां अशीच तुम्हांला बिलगून बसेन!'

यापूर्वी गोविंदाला तिची शिसारी येत असे—यावेळींही आली—पण यावेळचा परिणाम मात्र निराळा होता. तो एक तरुण होता. अननुभूतयौवन तरुण होता—स्त्रीजातीच्या कामुकस्पर्शाचा हा पहिलाच प्रसंग होता. तिला दूर लोटावें असें यापूर्वी जरी त्याला वाटत होतें, तरी ओढून आणलेला दांभिकपणा पचवण्यासाठीं त्यानें जो संयम केला तोच संयम घातकी ठरला. त्याचें मन चळलें. त्यानें तिला जवळ कवटाळलें.

सरदारगृहांत आक्कासाहेबाला पोंचवून आपल्या बंगल्यावर न जातां तो तडक ताडदेववर गेला.

नर्गिज त्यावेळीं घरीं भेटेल अशी त्याची अपेक्षा नव्हती. पण योगायोग मोठा विलक्षण होता.

नर्गिज त्यावेळीं घरींच होती—

## प्रकरण १८ वें.

गोविंदा अचानक आल्याचें पाहून नर्गिजला आश्चर्य वाटलें. अस्वस्थपणाची विचित्र छाया त्याच्या चेहऱ्यावर दिसत होती. तिनें घाबरून विचारलें, 'काय झालं?'

कांहींसुद्धां न बोलतां तो तसाच स्वस्थ बसून राहिला असें पाहून त्याला विक्षेप करूं नये म्हणून तिनें पुन्हां प्रश्न केला नाहीं. कांहींतरी विलक्षण प्रकार घडला आहे आणि तोही आक्कासाहेबासंबंधाचाच आहे, अशी शंका तिला आल्यावांचून राहिली नाहीं. मुंबईच्या या लहानशा मुक्कामांत गोविंदाच्या मनावर कितीतरी विलक्षण आघात झाले होते. त्याच्या स्वभावांत फरक पडूं लागला होता. त्याच्या एकमार्गी-पणाला फांटे फुटत होते. सरळ वृत्ती गढूळ होऊं लागली होती. खऱ्याखोट्याची चाड किती प्रमाणांत बाळगायची हें त्याला कळेनासें झालें होतें. अशा त्या विलक्षण मनस्थितींत तो त्यावेळीं नर्गिजला भेटायला आला होता.

'खरोखरच मीं आज घाबरून गेलों आहें,' गोविंदा म्हणाला, 'माणसाच्या जातीपासून मीं आजवर बराच दूर होतों. या माणसाच्या जातींची एक पोटजात—स्त्रीजात इतकी विलक्षण असेल अशी माझी कल्पना नव्हती. या जातीपैकीं माझी आई माझ्या परिचयाची होती—तूंही आईला ओळखतेस. दुसरा

परिचय तुझा—याखेरीज कुणाचाच परिचय करून घेण्याचा मीं कधीं प्रयत्न केला नाहीं. विलायतेंत असतांना असे परिचय झाले असते. पण मीं या स्त्री-जातीला टाळीत आलों. या स्त्रीजातीमुळें विलायतेंत कित्येक विद्यार्थ्यांची कशी बदनामी झाली होती हें कळल्यामुळं मीं त्यानां दूर अंतरावर ठेऊन वागत होतों. पण आज जो मला अनुभव आला, त्यानं मीं वधिर होऊन गेलोंय्. स्त्रीजात इतकी निर्लज्ज आणि नादान असेल, असं मला केव्हांच वाटलं नव्हतं—'

बोलत असतांना त्याच्या मनाला यातना होत होत्या. मन सांवरून घेऊन तो म्हणाला, 'हा सारा तुझा अपराध! तुझ्यामुळं मीं स्त्रीजातीबद्दलच्या भलत्या कल्पना करून घेतल्या. साऱ्या स्त्रिया माझ्या आईसारख्या—आणि नव्या पिढीच्या तुझ्यासारख्या असतील असा गैरसमज मीं बुद्धीपुरस्सर करून घेतला. विलायतेंतले माझ्याबरोबरचे विद्यार्थी ज्या प्रकारची चैन करीत होते ती पाहून मला वाटे, कीं विलायतेंतल्या पोरीच तेवढ्या उल्लू आहेत! पण आज मला विलक्षण अनुभव आला—'

अवसान घेण्यासाठीं तो पुन्हां कांहीं वेळ थांबला. चित्रासारखी तटस्थ बसून नर्गिज त्याच्याकडे पहात होती. नजरेला नजर भिडवून तो तिच्याकडे पहात जरी बोलत होता, तरी त्याला नर्गिज दिसत नव्हती. अज्ञेय अशा एका विशिष्ट भावनेला प्रतिमारूप करून तो तिच्यापुढें आपलें हृद्गत उघडून सांगत होता. तो म्हणाला, 'स्वार्थी वृत्ती एवढ्या थराला जाईल असं मला कधीं वाटलं नव्हतं. त्या जहागिरदाराच्या पोरीच्या मनोरचनेचा ठाव घेण्यासाठीं मीं काल थोडंसं ढोंग केलं. त्या ढोंगाचं प्रायश्चित मला आज मिळालं—'

जुहूच्या वाळवंटांत घडलेली सारी हकिकत त्यानें तिला अक्षरशः सांगितली. ती सांगत असतांना पहिल्यानें त्याला संकोच वाटत होता. बोलतांना तो अडखळत होता. पण सांगतां सांगतां त्याचा तो संकोच आपोआप दूर झाला आणि स्वतःच्या मनाशीं बोलत असतां जितक्या नागवेपणानें त्यानें तें वर्णन केलें असतें तितक्याच निःसंकोचित वृत्तीनें त्यानें त्या उथळ पोरीच्या चवचाल चाळ्याचें वर्णन नर्गिजला सांगितलें.

चेहऱ्यावर कोणत्याही प्रकारचा विकार न दाखवतां नर्गिज ती हकिकत ऐकत होती. ती हकिकत ऐकत असतांना तिला काय वाटलें याची गोविंदालाही पर्वा नव्हती.

पाद्रीसमोर एकादा ख्रिस्ती जसें आत्मकथन करतो, त्याच वृत्तीनें तो आपला पाढा तिच्यापुढें वाचीत होता. तो म्हणाला, 'मला तिच्या वर्तनाचं आश्चर्य वाटत नाहीं, आश्चर्य वाटतं तें माझंच ! माझा कसा तोल सुटला ? मीं मनाचा मोठा खंबीर आहें, असं मला यापूर्वी वाटत असे. तुला मीं सांगितलंच होतं, कीं तिचा स्पर्श झाला कीं मला शिसारी येते—पण त्यावेळीं मला तशी शिसारी आली नाहीं. आतां मीं तुला पश्चात्तापदग्ध अंतःकरणानं ही हकिकत सांगतों आहें खरा, पण ती जी आपल्या घरीं गेली आहे ती माझ्यावर बेहद्द खूष होऊन गेली आहे. मीं म्हटलं असतं तर वाटेल त्या थराला जाऊन पोंचण्याची तिची तयारी होती—'

बोलतांना तो कासावीस झाला होता. घाबरलेल्या लहान मुलाप्रमाणें तो थरथर कांपत होता. तो पुढें म्हणाला, 'मीं आतां हें सरळ बोलतों आहें—तेव्हां मीं तिच्याशीं काय बोललों तें मला आतां आठवत नाहीं. त्यावेळीं मीं बेताल झालों होतों यांत मात्र शंका नाहीं. तिला आनंदाच्या उकळ्या येतील अशाच भाषेंत मीं बोलत होतों. माझं मन माझ्या ताब्यांत नव्हतं. माझी वाणी माझ्या बुद्धीचा लगाम तोडून अनावर झाली होती. मानवी वृत्तीचा एवढा अधःपात माझ्याठायीं दिसून येईल असं मला कधींच वाटलं नव्हतं—'

बोलतां बोलतां तो रडकुंडीला आला. त्याला हुंदका आवरेनासा झाला. मनावरचा ताबा सुटून त्याला एकदम रडें कोसळलें.

गोविंदाची ती स्थिती पाहून नर्गिजलाही गहिंवर आला. तिच्या तोंडातूनही शब्द बाहेर निघेना. कसेंबसें मन आवरून ती म्हणाली, 'काय मनाला लावून घेतां ? काय आहे यांत तुमचा अपराध ? मानवी मनोवृत्तीला कांहीं मर्यादा आहे. परिस्थितीमुळं ती मर्यादा केव्हां केव्हां ओलांडली जाते. त्या परिस्थितीचा तो दोष असतो—'

'पण ती परिस्थिती मींच ना निर्माण केली ?' काकुळतवाणीनें गोविंदा म्हणाला.

'खरं आहे.' नर्गिज त्याला आश्वासन देत म्हणाली, 'पण त्या परिस्थितीचं पर्यवसान अशा प्रकारांत व्हावं म्हणून कांहीं तुम्हीं ती निर्माण केली नव्हती! आतां हें असं झालं—तुमची अपेक्षा नसतांना झालं—तेवढाच अनुभव मिळाला! पण मीं म्हणतें, यांत काय बिघडलं?—' गोविंदा एकदम चमकला असें पाहून ती म्हणाली, 'हो—हो मी म्हणतें, यांत काय बिघडलं? कुणी सांगावं, या पूर्वीही ती अशीच कुणाच्या गळीं पडली असेल! एवढा धीटपणा कांहीं पहिल्याच प्रसंगीं येत नाहीं! परक्याचा विकारी स्पर्श इतक्या लघळपणें सहन करायला आधींचा अनुभव असावा लागतो. कुणी सांगावं, यापूर्वी कदाचित् तिला याच्या उलट अनुभव आला असेल! तुम्हांला भुरळ घालण्यासाठीं त्या अनुभवाच्या विकृत कल्पनेचा तिनं उपयोग केला नसेल कशावरून?—कांहींही असलं तरी मला कांहीं त्याचं विशेष वाटत नाहीं. इतकं मनाला लावून घेण्यांजोगं त्यांत कांहीं आहे, असं यावेळीं तरी मला वाटत नाहीं—'

परोपरीनें ती त्याची समजूत घालीत होती. तो नुसता ऐकत होता. तिच्या भाषणाचा त्याच्या मनावर परिणाम होत होता कीं नाहीं हें त्यालासुद्धां सांगतां आलें नसतें. त्याची मनोवृत्ती बधिर होऊन गेली होती. आपण कांहीं तरी घोर अपराध केला—दांभिकपणाच्या पायीं आपली मनोवृत्ती चळली असें त्याला वाटत होतें. तो म्हणाला, 'मन तपासून पहातांना आतां मला असं वाटतं, एका खोट्यांतून दुसऱ्या खोट्याचा जन्म होतो. यापूर्वी जोंपर्यंत माझी मनोवृत्ती निर्मळ होती तोंपर्यंत मला तिची शिसारी येत होती. पण तिच्या वृत्तीचा अंदाज घेण्यासाठीं ज्यावेळीं मीं ढोंग केलं—उच्चवृत्ती सोडून चार पायऱ्या खालीं आलों, त्याच वेळीं आणखी दहा पायऱ्या घसरून नकळत माझा अधःपात झाला—'

'मुळींच नाहीं.' नर्गिज म्हणाली, 'हा अधःपात नव्हे. ही नुसती ठेंच आहे. ठेंच लागली, तोल गेला पण अधःपात झाला नाहीं. मूळ वृत्ती सात्विक होती म्हणून सांवरतां आलं—' बसल्या जागेवरून उठून त्याच्याजवळ जाऊन नर्गिज म्हणाली, 'पण यांत कांहीं विशेष झालं असं मला मुळींच वाटत नाहीं. पापापुण्याच्या खोट्या कल्पना आमच्या मनांत रुजवून दिलेल्या आहेत, त्यांची वाढत असलेलीं हीं झुडपं जर वेळींच उखडून टाकलीं नाहींत तर पुढं त्याचे वृक्ष होतील. सात्विकपणानं माणसाला

जगतां येत नाहीं. जगाच्या व्यवहारांत सात्विकपणा म्हणजे दुबळेपणा समजला जातो. माणसानं थोडसं चढावाचं धोरण स्वीकारलं पाहिजे. व्यवहारासाठीं तरी सात्विकपणा घटकाभर दूर ठेवला पाहिजे.—' ती पुन्हां थांबली. तिचें भाषण गोविंदाला आवडलें नसावें असें त्याच्या मुद्रेवरून वाटल्यामुळें ती म्हणाली, ' आज तुम्हांला हें पटत नाहीं. जगाच्या व्यवहारांत गुरफटलेला माणूस आपला सात्विकपणा नकळत विसरून त्या व्यवहाराच्या ओघाबरोबर बेफाम बनतो तेव्हांच त्याचा अधःपात होतो. पण बुद्धिपुरस्सर, कारणपरत्वें आपला स्वाभाविक सात्विकपणा माणसानं जर क्षणभर बाजूला ठेवला—तो बाजूला ठेवला आहे, मुळींच नाहींसा झाला नाहीं, अशी जाणीव ठेवून जर तो वागूं लागला—तर केव्हांही त्याचा अधःपात होणार नाहीं.—'

पुन्हां परत आपल्या जागीं बसून त्याचा हात आपल्या हातांत घेऊन ती म्हणाली, 'काय बिघडलं त्यांत ? मूर्खांनां अद्दल घडवायला केव्हां केव्हां पापीसुद्धां व्हावं लागतं माणसाला ! ती तुमच्यावर डाव करूं पहात होती.—तुम्हांला भुरळ घालूं पहात होती.—तुमचा स्वभाव सात्विक आहे हें तिला पक्कं माहीत होतं, म्हणूनच आपल्या एकुलत्या एक शस्त्राचा ती तुमच्यावर मारा करीत होती. अशा वेळीं गोष्टी वाटेल त्या थराला गेल्या असत्या तरी मला त्याचं कांहीं वाटलं नसतं. नव्हे—मीं म्हणतें, तिला अद्दल घडवण्यासाठीं, पाप म्हणून जें तुम्हांला वाटतं तसलं आचरण तुम्हीं जरी केलं असतं—नकळत नव्हे—बुद्धिपुरस्सर तिला तोंडघशीं पाडण्यासाठीं तुम्हीं पापीं बनलां असतां, तरीदेखील मला कांहीं वाटलं नसतं.—'

' काय बोलतेस हें नर्गिज ?' थरथर कांपत गोविंदा म्हणाला.

नर्गिज हंसली—मोठ्या वात्सल्यानें हंसली. ती म्हणाली, ' गैरसमज करून घेऊं नका—मीं हा व्यवहार बोलतें आहें. एका साध्याभोळ्या माणसाला फुसलावून भुरळ घालून फसवायचा प्रयत्न करणाऱ्या आपमतलबी, स्वार्थी व्यक्तीला कुठलीही शिक्षा दिली तरी थोडीच होईल, असं मला वाटतं ! अशी शिक्षा तिला मिळाली पाहिजे होती ! तें पाप झालं नसतं !—उलट तिच्या पापाचं प्रायश्चित्त तिला मिळालं असतं !— '

'आणि मग ?' डोळ्यांत प्राण आणून गोविंदानें विचारिलें.

'आणि मग काय ?' नर्गिज म्हणाली, 'आणि मग काय तें ठरवणं ज्याचं त्याच्यावर आहे. मग पटलं असतं तर तुम्हीं तिचा स्वीकार केला असता, लग्न केलं असतं; पटलं नसतं, तर काकडीसारखी मोडून फेंकून दिली असती!'

'हा निर्दयपणा आहे!' गोविंदा दांतओंठ खाऊन म्हणाला, 'तूं असं म्हणशील असं मला वाटलं नव्हतं!'

'खरं आहे तें!' नर्गिज म्हणाली, 'खरं बोलणं हा मोठा गुन्हा आहे. नुसत्या बोलण्यांत वाटेल तेवढे उच्च विचार पखरून, वागण्याचा प्रसंग आला म्हणजे अगदीं त्याविरुद्ध वर्तन करणं व्यवहारी समजलं जातं. पण तो खरा व्यवहार नव्हे. तिनं तुमच्याशीं लगट केली—बेछूटपणें लगट केली—तिला संकोच वाटला नाहीं याचं तुम्हांला कांहींच का वाटत नाहीं ? मी सांगतें, तिला पूर्वीचा अनुभव आहे—' गोविंदानें तिच्याकडे अर्थपूर्ण नजरेनें पाहिलें तेव्हां ती म्हणाली, 'हो—तुम्हांला वाटलं तें बरोबर आहे. असा प्रसंग माझ्यावर आला होता—नव्हे असे दोन प्रकारचे प्रसंग आले होते. पहिल्या प्रसंगांत त्यानं माझ्याशीं लगट करायचा उपक्रम केला तेव्हां मीं शहारून दूर होऊन पळून गेलें. दुसरा प्रसंग होता तो जरा नाजूक होता. अशी तुमच्यासारखीच चूक मीं केली होती. असाच अंदाज घेऊन मीं पहाणार होतें. त्याच्याबद्दल माझ्या मनांत थोडासा ओलावा होता म्हणूनच मी त्याची परिक्षा घेऊं पहात होतें.—पण मला धैर्य झालं नाहीं.—तितकीच शहारून मीं पळून गेलें. पण तें धैर्य त्याच्या ठिकाणीं होतं—म्हणूनच मीं त्याला झिडकारलं.—आणि म्हणूनच त्यानं आत्महत्त्या केली!' बोलत असतांना कपाळावर आलेले घामाचे बिंदू तिनें आपल्या हातरुमालानें पुसून घेतले आणि ती म्हणाली, 'आणि म्हणूनच मीं असं बोललें. एकदां मीं निर्दयपणा केला आहे. त्या निर्दयपणामुळंच मीं बचावलें गेलें. म्हणूनच माझी वृत्ती एवढी तर्ककर्कश झाली आहे आणि म्हणूनच त्या निर्दयपणाबद्दल मला एवढीसुद्धां दिक्कत वाटत नाहीं.' असें म्हणून ती स्वस्थ बसली. गोविंदाही तसाच विचारांत

भ्रमण करीत स्तब्ध राहिला होता. नर्गिज बोलत असतांना तिच्या प्रत्येक वाक्यावर तो विजेच्या झपाट्यानें विचार करीत होता. त्याचे समाधान होत नव्हतें. कुठेंतरी व्यंग वाटत होतें. गळीं पडणाऱ्या एखाद्या तरुणीचा आपण बिनदिक्कत गळा कापावा कसा ? —असं करायला एक समंजस समजलेली तरुणीच सांगते कशी, याचेंच त्याला आश्चर्य वाटत होतें.

तो म्हणाला, ' व्यवहारी दृष्टीला तुझं म्हणणं सुसंबद्ध वाटेल—अगदींच कोरड्या व्यवहारांत तें योग्य सुद्धां वाटेल ! पण त्यामुळं भावनेला धक्का बसतो. पूर्वीच ती पतित झाली आहे असा आरोप, पुरावा मिळाल्याशिवाय करणं अन्यायाचं नाहीं का होणार ?–'

' नाहीं !' नर्गिज ठांसून म्हणाली, 'तुम्हांला कदाचित् हें पटणार नाहीं. पण मीं सांगतें, माझ्या अनुभवावरून सांगतें, कीं पूर्वानुभवाशिवाय एवढा गळेपडूपणा करण्याचं धैर्य कुणाही सुशील मुलीला होणार नाहीं. '

तिचें तें सिद्धांत वाक्य ऐकून गोविंदा निरुत्तर झाला. समाधान झाल्यानें नव्हे—पण ज्या आवेशानें ती बोलत होती त्या आवेशाचा परिणाम त्याच्या मनावर झाल्यावांचून राहिला नाहीं.

'आतां मीं काय करूं ? ' एखाद्या प्रतिपन्न शिष्यासारख्या मिनतवारीनें त्यानें विचारलें.

' तें मीं काय सांगूं ? ' नर्गिज म्हणाली, 'तुम्हीं सुरवात केली त्यावेळीं मला विचारलं नव्हतं. आतां जें काय मला वाटलं तें मीं तुम्हांला सांगितलं. यापुढं काय करावं हें ठरवायला तुमचे तुम्हींच समर्थ झालं पाहिजे !'

'ठीक आहे ! ' म्हणून गोविंदा उठून उभा राहिला, 'पण मीं असा कांहीं अतिप्रसंग केला तर तुझ्या दृष्टीनं मीं भ्रष्ट ठरेन का ?'

त्याचे दोन्हीही हात आपल्या हातांत घेऊन नर्गिज म्हणाली, ' असला प्रश्न कुणी कुणाला करूं नये. तुमचं माझं नातं या प्रश्नापलिकडचं आहे.' ती गंभीरपणें बोलत होती. गोविंदाच्या मनावर मात्र अगदीं वेगळाच परिणाम झाला.

तो हंसला आणि निघून गेला.

# प्रकरण १९ वें.

बंगल्यावर आल्यापासून गोविंदा बावरल्यासारखा झाला होता. दुसरा दिवस उजाडण्याची त्याला भीति वाटत होती. नित्याप्रमाणें ' ती ' आली तर तिच्याशीं कसें वागावें या विचारानें त्याचें मन कावून गेलें होतें.

दुसऱ्या दिवशीं नित्याप्रमाणें ती आलीच. तोंपर्यंत गोविंदानें मनाची तयारी करून ठेवली होती. कांहींच झालें नाहीं अशा बेफिकीर वृत्तीनें वागायला त्यानें सुरवात केली.

नार्गिजच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य आहे असें त्याला वाटूं लागलें. कारण तीही तितक्याच बेफिकीरीनें वागत होती. दोघांच्या बेफिकीरींत फरक होता. गोविंदाला तशी वृत्ती दाखवायला परिश्रम पडत होते. पण त्याला स्पष्ट दिसून आलें, कीं तिची बेफिकीरी अगदीं स्वभाविक—अगदीं सहाजिक होती.

बोलतां बोलतां ती हळूच म्हणाली, ' आपल्या आईसाहेब गांवीं जाणार आहेत वाटतं ? '

' कुणी सांगितलं ? ' गोविंदानें विचारलें.

' नाहीं !' तीं म्हणाली, ' मला आपलं उगीचच वाटलं. परवां त्या म्हणत होत्या कीं मुंबईचा आपल्याला कंटाळा आला आहे. तेव्हां म्हटलं जातील कदाचित् ! मुद्दाम कशाला सक्तीनं ठेवून घेतां त्यानां ? '

तितक्यांत रमाबाई आंत आली तेव्हां गोविंदानें विचारलें, 'होय आई, तुला कंटाळा आलाय् मुंबईचा ?'

'हो.' रमाबाई म्हणाली, 'कुणी सांगितलं तुला ?'

'मीं सांगितलं.' अक्कासाहेब म्हणाली, 'मीच म्हटलं, कीं मुंबईचा कंटाळा आला आहे, मग उगीच सक्ती करून कशाला राहवून घेतां ?'

'खरंच.' रमाबाई म्हणाली, 'पुन्हां तुझ्या तिकडे यायला हवं असेल, तर एकदां गांवीं जाऊन येईन म्हणतें. घरीं जायला जीवं कसा आसोसल्यासारखा झाला आहे. मीं तिथं नाहीं, संसाराची धुळधाण झाली असेल अगदीं !—'

गोविंदाला संशय आला, हा या सर्वांचाच कट तर नसेल ?

'अन् मीं इथं एकटाच राहूं ?' गोविंदानें विचारलें.

'कां ?' रमाबाई म्हणाली, 'सरकार आहेत, राणीसाहेब आहेत, अक्कासाहेब पण सोबत करील—'

गोविंदाची खात्री झाली—सर्वांनीं बेत करून हा घाट जुळवून आणला आहे.

'काल संध्याकाळीं गेलें होतें सरदारगृहांत,' रमाबाई म्हणाली, 'तेव्हां बोलतां बोलतां सहज गोष्ट निघाली.—तुझी हरकत नसेल तर एकदां जाऊन येईन म्हणतें घरीं.'

गोविंदा हताश झाला. नाहीं म्हणणें त्याच्या जिवावर आलें. त्यानें आढेवढे घेऊन पाहिले, पण रमाबाईचा निश्चयच झाला होता असें त्याला दिसून आलें. तिनेंसुद्धां ह्या कटांत सामील व्हावें ना ! नर्गिजबद्दल तिला जें एवढें वात्सल्य वाटत होतें तें कुठें गेलें ?

त्या दिवशीं जुहूलाच जायचें म्हणून अक्कासाहेब हट्ट धरून बसली.

आदल्या दिवशींच्या इतिहासाची पुनरावृत्ती झाली.

त्या दिवशीं गोविंदा तितका घाबरला नाहीं. त्याचें मन निर्ढावत चाललें होतें. अक्कासाहेबाला स्वर्ग ठेंगणा झाल्यासारखें भासत होतें. तिला वाटलें, गोविंदा अगदीं

आपल्या मुठींत आला. तिचा तसा सहज व्हावा अशाच रीतीनें तो वागत होता. पण कालच्या आणि आजच्या वागण्यांत केवढें तरी अंतर होतें! आज तो अंतर्यामीं सावध होता. कोणत्याही रितीनें तो तिच्या चाळ्यांच्या आहारीं जात नव्हता. नाटकांत काम करणारा नट शेजारच्या पात्राशीं कसल्याही कामुक चेष्टा करीत असतां जितका निर्विकार असतो, तितकाच मनाचा खंबीरपणा राखून त्याचे सर्व व्यवहार चालले होते. तरीही त्याचें मन त्याला दोष देत होतें. हें सारें ढोंग आहे असें सांगून मोकळें व्हावें, असें त्याला प्रतिक्षणाला वाटत होतें.

त्या दिवशीं घरीं परत आल्यावर तो फार बेचैन झाला होता. उभ्या आयुष्याचें सिंहावलोकन करतांना जीं दृश्यें त्याच्या नजरेसमोरून जात होतीं, तीं पाहून त्याचें त्यालाच आश्चर्य वाटत होतें. कोणकोणत्या प्रसंगामुळें आपल्या वृत्तींत कसकसा बदल होत आला हें ज्यावेळीं तो अजमावूं लागला, त्यावेळीं माणसाच्या जीवनाच्या घडणूकीबद्दल त्याला कौतुक वाटूं लागलें. द्रष्टा या नात्यानें तटस्थ राहून स्वतःकडे पहात असतां ‘ गोविंदा ’ या जिवाची त्याला दया आली. त्याला वाटलें, गरीब बिचारा—जगाच्या दांभिकपणाच्या प्रवाहांत वहावत चालला आहे! कुणी त्याला सावध करीत आहेत, तर कुणी त्याला तसाच वाहूं देत आहेत! कुणी त्याची कींव करीत आहेत, तर कुणी त्याला दोषी ठरवून फांसावर चढवीत आहेत!

सिंहावलोकनाबरोबरच भविष्यकालांत नजर फेकण्याचा तो प्रयत्न करूं लागला त्यावेळीं त्याची कल्पनाशक्ती कुंठीत झाली. पुढें काय? नोकरी, खटले चालवणें, निकाल देणें, हातून न्याय होणें किंवा अन्याय होणें—शेवटीं पेन्शन घेणें आणि—आणि काय?—मरून जाणें!—संसाराचा वाढता पसारा पहात मरणें किंवा एकलकोंडें जीवन कंठीत एके दिवशीं देह ठेवणें!

‘ मग काय करायचं? ’ रमाबाई त्याच्यासमोर येऊन म्हणाली त्यावेळीं त्या तंद्रीतून दचकून तो जागा झाला.

‘ काय म्हटलंस? ’ त्यानें विचारलें.

'उद्यां गांवीं जायचं ठरवलंय् मीं.' रमाबाई म्हणाली, 'आतां येईन ती त नोकरीवर हजर झाल्यावर! तितक्यांत आणखी काय काय थारेपालट होतात तेही पाहायचे आहेत!'

'हें काय आरंभलंय्स आई?' तो अस्वस्थ होऊन म्हणाला, 'कां वाटलं तुला जावं म्हणून?'

'त्यांत रे काय विशेष आहे?' रमाबाई हंसून म्हणाली, 'एकदां घरच्या प्रपंचाकडे नजर नको का टाकायला?'

'नाहीं आई,' गोविंदा म्हणाला, 'तुम्हीं लोकांनीं हा कट केला आहे.'

'आम्हीं लोकांनीं? कोण आम्हीं लोक?'

'तूं अन् हें जहागिरदार टोळकं! ही अक्कासाहेबाची घोरपड माझ्या गळ्यांत बांधायचा कट करून तूं निघून जाते आहेस! होय ना?'

बिचारी साधी-भोळी रमाबाई—आयुष्यांत तिनें कधींच कसले डावपेंच लढवले नव्हते. गोविंदाचें ते अंतरींचे उद्गार ऐकून तिच्यानें राहवेना ती म्हणाली, 'असं आहे खरं--खोटं कशाला बोलूं?--राणीसाहेबांनी सुचवलं त्यावेळीं मलासुद्धां पटलं--म्हटलं, तुम्हाला माझी वडिलकीची आडकाठी येत असेल तर ती दूर करावी.'

'तुला विचारल्याशिवाय मीं कोणतीही गोष्ट केली आहे का आई?' गोविंदाने गहिंवरून विचारलें.

'नाहीं.' रमाबाई सद्गदीत होऊन म्हणाली, 'कुणाचा पोटचा गोळादेखील एवढा आज्ञाधारक नसेल!'

'मग कां या कटाला बळी पडलीस?' रमाबाईच्या मनाला तो प्रश्न लागला आपली चूक झाली असें तिला वाटलें. ती म्हणाली, 'आतां खरं सांगतें.--दोघी माझ्या नजरेसमोर आहेत. दोघींचेही गुणदोष त्या त्या परीनं मल दिसताहेत. तसं पाह्यलं, तर नर्गिज असामान्य बुद्धिमान आहे, तितकीच प्रेमळ आहे. पण तिचा प्रेमळपणा मोठा कठोर आहे. ही अगदीं व्यवहारी आहे-

वैभवांत वाढली आहे--वैभवांतच राहावं अशी तिची महत्त्वाकांक्षा आहे. नर्गिजला वैभव नको आहे.--हवंच असलं तर तें अगदीं निराळ्या प्रकारचं आहे!--तसल्या वैभवांत सुख नाहीं—समाधान असेल पण स्वास्थ्य नाहीं. तिच्या संगतीनं—मला वाटलं—तूं नोकरी सोडशील!—' गोविंदा हंसला असें पाहून ती म्हणाली, ' हसूं नकोस—हा हंसायचा विषय नाहीं. एका पारशाच्या पोरीच्या नादीं लागून तूं नोकरी सोडलीस, तर साऱ्या जगांत आमची छीःथू होईल! एवढा खर्च करून, तुला विलायतेला पाठवून जो एवढा मोठा ' साहेब ' करून आणला तो काय नोकरी सोडण्यासाठीं?—' क्षणभर ती त्याच्या चेहऱ्याकडे पहात राहिली. त्याच्या मुद्रेवर आंतरीक व्यथेची छटा दिसत होती. ती त्याची मुद्रा पाहून रमाबाईचें मातृहृदय जागें झालें. ती म्हणाली, ' मीं जगाच्या दृष्टीनं बोलतेंय्—'

' जगाच्या दृष्टीनं बोलूं नकोस!' पेटलेल्या अंतःकरणानें गोविंदा उद्गारला, जगाची दृष्टी मला नको आहे. तुला काय वाटतं तें मला सांग! समज, मीं नोकरी सोडली—'

' नोकरी सोडून तूं काय करणार आहेस?—'

' जगांत पुष्कळ व्यापारी आहेत!—उद्योगधंदा करणारे आहेत! कारखाने काढणारे लोक आहेत! त्यांच्या तुलनेनं पहातां मीं कीडमुंगी आहें! माझ्यासारखे शेंकडों आय्. सी. एस्. आपल्या पदरीं बाळगतील अशीं माणसं या जगाच्या व्यवहारांत हिमालयासारखीं उभीं आहेत! दुसरीकडे पहा! टिळक गांधींसारखे राजकारणी पुरुष हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठीं तुरुंगवाससुद्धां पत्करीत आहेत! उद्यां मीं कुठंतरी असाच जज्ज असेन! असेच गांधीटिळकांसारखे कुणी महात्मे माझ्यासमोर आरोपी म्हणून येतील! मला त्यांना शिक्षा द्यावी लागेल!—हें विष आतां फैलावतं आहे. राजकारणाच्या आगींत नवे तरुण धडाक्यानं उड्या घालताहेत. त्या अशा त्यागी माणसांबद्दल मनांतून आदर वाटत असतांनादेखील मला त्यांना तुरुंगांत पाठवावं लागेल! मला भीति वाटते ती त्याच प्रसंगाची! आज मीं रजेवर आहें,

पण माझ्या बदली काम करीत असणाऱ्या माणसानं अशाच कांहीं खटल्यांत दारु-दुकानावर पिकेटींग करणाऱ्या माणसांना तुरुंगांत पाठवल्याचं मला कळलं ! आज मीं नोकरीवर असतों, तर त्यांना ही शिक्षा मीं देणार होतों !—' त्या कल्पनेनेंच तो शहारला.—रमाबाईच्या मनावर तितकासा परिणाम झाल्याचें दिसून आलें नाहीं. तो पुढें बोलत होता, 'नर्गिजला तूं ओळखतेस. आज ना उद्यां ती राजकारणाच्या भानगडींत पडल्यावांचून रहाणार नाहीं. कुणी सांगावं, तिला शिक्षा द्यायचा प्रसंग कदाचित् माझ्यावरच येईल !—'

'नाहीं—नाहीं—' रमाबाई घाबरून म्हणाली, 'असं कसं होईल ? तसं झालंच तर सोडून दे ती नोकरी त्यावेळीं !'

'सरकारी नोकरी आहे ही आई !' गोविंदा गंभीरपणें म्हणाला, 'कायदे आधींच ठरून गेले आहेत, ते आतां बदलणं शक्य नाहीं. न्यायाधिशानं त्या कायद्यांप्रमाणं न्याय द्यायचा असतो. तिथं आपला परावा हा भेद धरतां येत नाहीं. नर्गिजच काय—पण उद्यां तूं अन् अण्णा देखील माझ्यासमोर आरोपी म्हणून आलांत, तर तुम्हांला देखील तुरुंगांत पाठवावं लागेल मला !'

'छे, छे.' रमाबाई शहारून म्हणाली. आतां तिच्या मनावर परिणाम झाला;—ती कल्पनाच तिला भयंकर वाटली. 'हें असं आहे !' गोविंदा एक सुस्कारा टाकून म्हणाला, 'स्वतःवर बेतल्याशिवाय दुसऱ्याचं दुःख कळत नाहीं. रागावूं नकोस आई,—जरा स्पष्ट बोलतों.—कुणाच्याच रक्ताचा जिव्हाळा माझ्या खातीं जमा नाहीं. साऱ्यांचीच माया उसनी !—साऱ्यांचीच माया उशिरा जडलेली !—पहिल्यापासून घरांतून मी दूर राहिलेलों ! माया लागली ही आतां ! म्हणूनच तूं काय, नर्गिज काय, कीं अण्णा काय, माझ्या हिशेबीं सारे जिव्हाळे सारखेच वाटतात !—असं आहे हें !'

रमाबाई सुन्न झाली. नर्गिजबरोबर आपली तुलना केल्यामुळें तिला क्षणभर वाईट वाटलें खरें, पण नंतर तिच्या ध्यानीं आलें, कीं खरा सहवास हा आतांच

झाला होता. लोभ जडला गेला तो हा आतांच! तिचें तिलाच वाईट वाटलें. सर्वांची शिक्षा सारख्या मोलाची कां नाहीं वाटली आपल्याला? ती निरुत्तर झाली.

'तूं जाणार मला एकटा टाकून?' गोविंदानें विचारलें, 'त्या जहागिरदार ढोल्याच्या तोंडीं देऊन?'

'हें मात्र मला आवडत नाहीं.' रमाबाई म्हणाली, 'काय केलं त्यांनीं? लग्नाची मुलगी आहे त्यांना!—मुलीच्या आईबापांना काय वाटतं तें एव्हां तुला कसं कळणार?'

'पण मीं नोकरी सोडली तर?' गोविंदा म्हणाला, 'तीं लोकं माझ्यामागं लागलीं आहेत तो मी अधिकारी आहें म्हणून! त्यांना गोविंदा सप्रे याला मुलगी द्यायची नाहीं! डिस्ट्रिक्ट जज्जाला मुलगी द्यायची आहे हें तूं विसरतेस!'

'असेल कदाचित्!' रमाबाई म्हणाली, 'पण उद्यां लग्न झाल्यावर तिचीं तुझीं मतं आपोआप जुळतील. मग आपोआपच ती तुझ्याशीं मिळतं घेईल--'

'पण एवढी घाई कशाला?' गोविंदा म्हणाला, 'लग्नाच्या मुली काय थोड्या आहेत? आणखी कुणी तरी भेटतील यापुढं! हिच्यापेक्षांही चांगल्या मुली भेटतील!--नाहींच भेटल्या, आलेल्या साऱ्याच मुली हिच्यापेक्षां हिणकस ठरल्या तर मग हिच्याशींच लग्न करीन! पण उगीच घाई करूं नकोस आई!'

'बरं तर,' रमाबाई म्हणाली, 'आज हें स्थळ नुसतं बोटचेपं करून ठेवूं! कांहीं दिवस वाट पाहूं! मग तर झालं?'

जुहूला घडलेला प्रकार रमाबाईला सांगावा असें पुन्हां पुन्हां गोविंदाच्या मनांत येत होतें. पण ज्या खुल्या दिलानें नर्गिजकडे त्याला बोलतां आलें तितकें त्याचें मन रमाबाईला ही हकिकत सांगायला तयार होईना.

विषय तेवढाच राहिला. रमाबाईनें जाण्याचा बेत रद्द केला. पण ती हकिकत ऐकून आक्कासाहेबाची मात्र निराशा झाली. हिरमुसल्या तोंडानेंच त्या दिवशीं ती गोविंदाबरोबर फिरायला गेली, इतकेंच नव्हे, तर त्या दिवशीं जुहूला जायचाही तिनें आग्रह धरला नाहीं.

## प्रकरण २० वें.

असाच एक आठवडा गेला. त्या मुदतींत गोविंदा नर्गिजला जाऊन भेटला नव्हता. तीही त्याला भेटायला मुद्दाम आली नाहीं.

फिरायला जाण्याचा नित्यक्रम जरी सुरू होता, तरी अक्कासाहेबाला मात्र तितकें मोकळें वाटत नव्हतें. रमाबाई गेली नाहीं यामुळें तिची निराशा झाली होती.

राणीसाहेब येऊन रोज रमाबाईंना सतावीत होत्या. हळुहळू रमाबाईंनाही त्यांचा तिटकारा येऊं लागला होता. लग्नाच्या बाबतींत कोणतेंच उत्तर देणें रमाबाईच्या हातीं नव्हतें. अण्णासाहेबांची जरी संमती मिळाल्यासारखीच होती, तरीही शेवटचा शब्द देणें गोविंदाच्या हातीं होतें.

आणि तो तर कांहीं निश्चित सांगत नव्हता. रमाबाईला मोठें कोडें पडलें होतें. अक्कासाहेबांना बरोबर घेऊन रोज फिरायला जाणें, नर्गिजला न भेटणें, राणीसाहेब आल्यावर त्यांच्याबद्दल तिटकारा न दाखवणें, हीं गोविंदाच्या वर्तनांतील लक्षणें तिच्या दृष्टीनें संबंध जुळून यायला अनुकूल अशीं होतीं. एकदां विचारून पहावें असा मनाचा निश्चय करून रमाबाई म्हणाली, 'राणीसाहेबांनीं सारखा तगादा लावला आहे, त्यांना काय उत्तर सांगायचं ?'

उत्तराला अजून अवधी आहे,' गोविंदा म्हणाला, 'आतां तो पूर्वींचा

काळ राहिलेला नाहीं. नुकता कुठं आमचा परिचय होतो आहे—एकमेकांचीं मनं जुळल्याशिवाय—'

'मग ती काय म्हणते?' रमाबाईनें विचारलें.

'तूंच विचारून पहा ना!' गोविंदा म्हणाला. सरळ वृत्तीच्या आपल्या आईसमोर बनावट उत्तरें देतांना त्याच्या मनाला यातना होत होत्या. पण त्याला उपाय नव्हता. त्यानें या प्रयोगाला सुरवात केली होती. त्याचा शेवट कसा होतो हें पहाण्याकडे त्याचें लक्ष लागलें होतें.

रमाबाईनें आक्कासाहेबाला विचारलें तेव्हां ती म्हणाली, 'आतां कसं सांगायचं? मला कांहींच अंदाज येत नाहीं. वाटतं, त्यांची संमती आहे. पण अजून निश्चित असं कांहींच बोलत नाहींत. एवढं खरं, कीं यांत कांहीं बिघाड येणार नाहीं असं आज तरी मला वाटतंय.' ती मोठ्या मिनतवारीनें बोलत होती. प्रत्येक वाक्य उच्चारतांना थांबत होती. एकदां रमाबाईकडे पहायचें नि नंतर खालीं पाहून बोलायचें अशा रीतीनें नेत्रविक्षेप करीत तिनें तें भाषण पुरें केलें.

रमाबाईचें समाधान झालें नाहीं. नर्गिज न आल्यामुळें तिला एक प्रकारें हुरहुर लागली होती. गोविंदाशीं तिचें कांहीं बिनसलें तर नाहीं ना, अशी शंकाही तिला एकदां आली, पण पुन्हां तिला वाटे, बिनसलें तर काय बिघडलें? तिचें नि गोविंदाचें लग्न होण्याचा प्रश्न निकालांत आल्यासारखा झाला होता.

पण तिला नर्गिजचा जो एक लळा लागला होता, त्यामुळेंच तिच्या न येण्याचा तिच्या मनावर परिणाम होत होता. लग्नाचा प्रश्न असो वा नसो, पण एवढा लोभ लागल्यानंतर तिनें पूर्वीप्रमाणें येऊन कां भेटूं नये? गोविंदाशीं कांहीं बिनसलें असलें तर येऊन तसें कां सांगूं नये? तिला नर्गिजचा राग आला होता.

ती गोविंदाला म्हणाली, 'तुला पत्ता माहित आहे का नर्गिजचा? मी एकदां तिला जाऊन भेटेन म्हणतें!'

'कां?' गोविंदानें विचारलें, 'आतां हें जमवते आहेस ना?'

‘ असं खंवचट बोलूं नकोस ! ’ रमाबाई रागावून म्हणाल्या, ‘ माणसाचा लोभ जडतो तो कांहीं नातं जुळवण्यासाठींच नव्हे ! ती येत होती इथं, अन् एकदम कां बंद झाली यायची म्हणून मीं तुला विचारलं. तुला तरी भेटली का ? ’

‘मी कशाला जाऊं तिला भेटायला ? ’ गोविंदा म्हणाला, ‘ यावंसं वाटलं तर येईल ती !—’ रमाबाईला वाटलें, ‘ आपलाच अंदाज बरोबर आहे खास ! ’ गोविंदा पुढें म्हणाला, ‘चांगली इथं येत होती ! मीं कांहीं नको म्हटलं नाहीं. केव्हां आली असती न् तुला घेऊन गेली असती आपल्या घरीं, तर मला वाटतं, तूं कांहीं नाहीं म्हटलं नसतंस; पण तिलाच जर वाटत नाहीं यावंसं तर मी तरी काय करूं ? ’

‘मग मला घेऊन जा ना एकदां तिच्या घरीं.’ रमाबाई म्हणाली.

‘ मी जाईन घेऊन,’ गोविंदा म्हणाला, ‘ पण तिची कुठं खात्री असते घरीं असायची ! त्या दिवशीं आम्हीं दोघेंही गेलों होतों तिच्या घरीं तर हिनं तिच्या घरचा चहा घ्यायचा नाकारला ! नर्गिज मला भेटली ती प्रीन्स हॉटेलमधें ! तिथं कांहीं कुणी ब्राह्मण सैपाकी नाहींत ! तिथं तिनं जरी चहा घेतला नव्हता, तरी आइस्क्रीम कोल्ड्रींक म्हणजे कांहीं सोंवळ्याचे पदार्थ नव्हेत ! तें नर्गिजनं पाहिलं होतं. पण प्रत्यक्ष तसं कांहीं विचारलं नाहीं तिनं. मला वाटतं त्यामुळंच ती रागावली असावी ! तिच्या घरीं काम करायला किरिस्तांव पोरगी आहे. ती पोरगी नसली तर नर्गिज स्वतःच चहा करते. आपण गेलों म्हणजे ती चहा देणारच ! अन् तूं नको म्हटलंस तर तिलाही वाईट वाटेल न् मलाही वाईट वाटेल—’

‘ कांहीं नाहीं,’ रमाबाई म्हणाली, ‘ मी घेईन तिच्या हातचा चहा ! चहा म्हणजे कांहीं आमटीभात नव्हे ! उकळवलेल्या पाण्याला कांहीं दोष नसतो—’

रमाबाईच्या तोंडचा हा धार्मिक पर्याय ऐकून गोविंदाला हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. तो म्हणाला, ‘ बरं आहे तुझं हें आवडतं शास्त्र ! हवे तसे पर्याय काढतां येतात ! पण मला नाहीं वाटत, कीं वाटेल त्या पारशाच्या हातचा चहा तूं घेशील म्हणून ! ’

‘ खरं आहे तें ! ’ रमाबाई म्हणाली, ‘ एकदां कुठं माया जडली कीं जातपात फारशी मनांत येत नाहीं ! ’

‘ खरं ना हें ? ’ गोविंदा म्हणाला. त्या प्रश्नानें रमाबाईला धक्का बसला. त्यानें असें कां विचारलें ? अक्कासाहेबांच्या सहवासामुळें तो नर्गिजला विसरत चालला आहे, असा जो तिचा समज झाला होता तो चुकीचा आहे कीं काय असें तिला वाटूं लागलें.

त्या दिवशीं आक्कासाहेब आली तेव्हां रमाबाईला बरोबर घेऊन तो नर्गिजच्या बिऱ्हाडीं गेला. ती त्या वेळीं घरीं होती. रमाबाई आलेली पहातांच तिनें धांवत जाऊन तिला मिठी मारली. त्यासरशीं आक्कासाहेबांची मुद्रा बदलल्याचें गोविंदाच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. रमाबाईनें तिच्याबद्दल जो जिव्हाळा दाखवला तो पाहूनही आक्कासाहेबाला बरें वाटलें नाहीं असें स्पष्ट दिसत होतें. नर्गिजनें आक्कासाहेबाकडे पाहिलेंसुद्धां नाहीं. रमाबाईला बाजूला घेऊन ती सारखी बोलत बसली. गोविंदा आणि आक्कासाहेब बाजूला पडल्यासारखीं झालीं.

मधेंच उठून नर्गिज म्हणाली, ‘ चहा करूं का तुमच्यासाठीं ? यांना चालत नाहीं माझ्याकडचा चहा—त्यांच्यासाठीं दूध आहे—नाहीं तर कांहीं तरी सोडालिंबू आणवतां येईल. ’

रमाबाई संकटांत पडल्यासारखी झाली. तिला संकोच वाटत नव्हता, पण एका पारशिणीच्या हातचा चहा आपण घेतला तर आक्कासाहेबाला काय वाटेल ?—ती घेत नसतां आपण घेतला म्हणून कदाचित् तिला वाईट तर वाटायचें नाहीं ना !

‘मला चहाच द्या ! ’ अक्कासाहेब म्हणाली, ‘ या घेतात मग मीं कां घेऊं नये ? ’

गोविंदा थक्क झाला. केवढी पाताळयंत्री मुलगी ही ! आपण चहा घेतला त्यावेळीं तिला असेंच कां वाटलें नाहीं ? कीं रमाबाईला खूष करण्यासाठींच ती चहा घ्यायला तयार झाली ? कीं खरोखरच त्या दिवशींचा तो नुसता दांभिक-पणा होता ? कीं नुसता नर्गिजचा पाणउतारा करण्यासाठींच तिनें त्या दिवशीं चहा नाकारला ?

नर्गिजनें सर्वांना चहा करून दिला. साऱ्यांनींच फिरायला जायचें ठरलें. नर्गिज रमाबाईला म्हणाली, 'तुम्हीं माझ्या गाडींतून चला, उगीच त्यांना विक्षेप कशाला आमचा ?'

गोविंदा कांहींच बोलला नाहीं. अक्कासाहेबाला घेऊन तो निघाला तो सरळ जुहूला गेला. नर्गिजची गाडी कांहीं त्यांच्यामागोमाग आली नाहीं.

अक्कासाहेबाला वाटलें, नर्गिजला टाळण्यासाठींच गोविंदानें मुद्दाम गाडी पुढें काढली. ती अगदीं खुषींत आली होती. मधल्या आठ दिवसांचा संकोच एकदम मावळून गेला.

तीं दोघेंही परत बंगल्यावर आलीं तेव्हां रमाबाई घरीं आली नव्हती. अक्कासाहेबाला हायसें वाटलें. ती म्हणाली, 'आतां किती दिवस वाट पहाणार ? रजा संपत नाहीं का आली ? उद्यांच माझा रिझल्ट लागायचा आहे न् आतां मुहूर्तही जवळ आले आहेत.—'

गोविंदा नुसता हंसला. तिला जवळ घेऊन त्यानें तिच्या मस्तकावरून हात फिरवला. किती तरी वेळ तिच्या डोळ्याला डोळा देऊन तो पहात राहिला होता.

'असं काय पहायचं तें ?' अक्कासाहेब लाडिकपणानें म्हणाली, 'उत्तर नाहीं का द्यायचं माझ्या प्रश्नाचं ?'

तरीही गोविंदा तिच्याकडे पहात होता. तिची मुद्रा बावरल्यासारखी झाली—तरीही तिची वृत्ती तिच्या कह्यांत होती. अवसान आणून ती म्हणाली, 'आपल्या आईसाहेब गांवीं गेल्या असंत्या तर बरं नसतं का झालं ?'

'असं आतां मला वाटूं लागलं आहे खरं.' गोविंदा म्हणाला, 'उगीच मीं तिला राहायचा आग्रह केला. मोठे मजेंत दिवस गेले असते !—नाहीं ?'

आक्कासाहेबाचा आनंद गगनांत मावेना. त्याला अधिकच बिलगून ती म्हणाली, 'खरंच ! आतां किती वाट पहायची ?—'

गोविंदा कांहीं उत्तर देणार होता, तोंच नर्गिजसह रमाबाई आल्याची चाहूल लागल्यामुळें आक्कासाहेब झट्कन् त्याच्यापासून दूर झाली.

'खूप चक्रा मारल्या आम्हीं !' रमाबाई मोठ्या खुषींत येऊन म्हणाली, 'काय

छान मोटर चालवते रे ही गोंदू ! बायका मोटर चालवीत असतील असं नव्हतं मला वाटलं ! मला वाटलं, हिचा ड्रायव्हर असेल ! पण हीच जेव्हां चाकाजवळ बसली न् मलाही आपल्या जवळच बसायला लावलं, तेव्हां मीं तर थक्क होऊन गेलें अगदीं !—'

फिरायला गेल्यानंतरची हकिकत रमाबाई सांगत असतां आक्कासाहेबांच्या अंगाचा जळफळाट होत होता. आपल्या घरींहि मोटरी आहेत पण आपल्याला त्या चालवतां येत नाहींत याबद्दल वाटणाऱ्या उणीवेची जाणीव त्याचवेळीं तिला झाली. पुण्यांत असतांनाच आपण हा अभ्यास केला असता तर !—पण पुण्यांत कुणीच बायका मोटारी चालवीतं नव्हत्या. आधीं त्यावेळीं पुण्यांत फारशा मोटारीच नव्हत्या. अशा संस्थानिकांच्याच कांहीं होत्या तेवढ्याच !

खिन्न मनानें आक्कासाहेब सरदारगृहांत गेली. पहिल्यानें मोटर चालवायला शिकायचें असा त्याचवेळीं तिनें निश्चय केला.

पण दुसऱ्याच दिवशीं तिच्या जीवनाच्या मोटारीला निराळीच गती मिळणार होती याची त्यावेळीं तिला कुठें कल्पना होती !

## प्रकरण २१ वें.

गोविंदाची बदली झाल्याचा हुकूम आला होता. डिस्ट्रिक्ट जज्जाच्या जागेवर त्याची तात्पुरती नेमणूक झाली होती. उरलेली रजा रद्द करून हजर होण्याचा हा हुकूम होता.

अर्थातच गोविंदाला हायसें वाटलें. जहागिरदार-कुटुंबाची बरीच निराशा झाली. गोविंदाचा हुकूम आला त्याच दिवशीं आक्कासाहेब पास होऊन सेकंड क्लासांत आल्याची बातमी कळली. ती बातमी कळवण्यासाठीं पेढे घेऊन आलेल्या जहागिरदार-कुटुंबाला म्हणूनच आनंद होण्याऐवजीं वाईट वाटलें.

त्या वाईटांतही आनंदाचा भाग नव्हता असें नाहीं. नोकरीच्या एवढ्या थोड्या मुदतींत कुणालाही डिस्ट्रिक्ट जज्जाच्या जागीं—बदली कां होईना—नेमल्याचीं उदाहरणें फारच क्वचित् होती, पण गोविंदाच्या आजपर्यंतच्या कामागिरीमुळें सरकारांत त्याचा लौकिक चांगलाच झाला होता त्याचाच हा परिणाम होता.

जहागिरदारांना आनंद झाला तो याच गोष्टीचा—पण वाईट वाटलें तें लग्न लवकर उरकून घेतां येत नाहीं म्हणून! रजेची मुदत पुरी होईपर्यंत जर अवधी असता तर त्यानीं लग्न उरकून घेण्याची घाई खात्रीनें केली असती.

हें लग्न जसें कांहीं ठरून राहिलें आहे, असेंच जे ते समजत होते. त्याला कारण आक्कासाहेबांनी दिलेल्या बातमीमुळें होतें. फारसा संकोच न धरतां तिनें सारी हकिकत आपल्या आईला त्याचवेळीं सांगितली होती.

सध्यांच्या संकटांतून सुटल्याचा गोविंदाला जितका आनंद झाला होता, तितकेंच नर्गिजला सोडून जाणें त्याच्या जिवावर आलें होतें.

नर्गिजचा निरोप घेण्यासाठीं ज्यावेळीं तो गेला, त्यावेळीं आपली मनोभावना झांकून ठेवणें त्याला अशक्य झालें. तो म्हणाला, ' मीं पूर्वींच तुला सांगितलं, कीं मीं एकमार्गी मनुष्य आहें. जें कांहीं मिळवावं म्हणून मीं इच्छा धरली तें मीं मिळवलं आहे. मला असं वाटतं, कीं तुझ्या बाबतींतसुद्धां मला यश लाभलं आहे. पुढं कांहींही होवो—कुणी सांगावं कदाचित् आपलं लग्नसुद्धां होणार नाहीं—पण मीं तुझा झालों आहें न् तूं माझी झाली आहेस. मनाची कसोटी लावून पाहून मला हें असं वाटतं आहे—'

' खरं आहें तें ! नर्गिज म्हणाली, ' मींही मनाची कसोटी लावून पाहिली आहे, मलाही तसंच वाटतं आहे, पण सध्यां माझं मन बावरल्यासारखं झालं आहे. हिंदुस्तानच्या राजकारणाच्या चळवळींत पडावं असं मला वाटूं लागलं आहे. खिलाफतीचा प्रश्न हातीं घेऊन महात्मा गांधीनीं जी चळवळ सुरू केली आहे त्या चळवळींत भाग घ्यावा कीं काय याचा मीं विचार करतें आहें. त्यांचीं माझीं मतं कदाचित जमणार नाहींत पण हा प्रश्न मताचा नसून तत्त्वाचा आहे. हिंदुमुसलमानांची एकी व्हायला हाच काळ मोठा अनुकूल आहे. तुम्हीं इथं नव्हतां—तुमच्या तिकडे या प्रकाराची झळ लागली नव्हती—पण प्रिन्स ऑफ वेल्स इथं आल्यावेळीं जो हरताळ पाडण्यांत आला त्यावेळचा इतिहास जर तुम्हीं पाहिला असता तर माझं म्हणणं तुम्हांला पटलं असतं. हिंदुमुसलमान एक झाले होते न् आमच्या पारशांनं सरकारची बाजू घेऊन हिंदुमुसलमानांविरुद्ध दंगा सुरू केला होता. असा सार्वजनिक दंगा म्हणजे चौरंगी क्रिकेट सामन्याच्यावेळची हुल्लड नव्हे हें त्यांना माहित होतं; पण पोलीसांचा पाठींबा असल्यामुळं त्यांना हा दंगा

बराच परिणामकारक करतां आला. तेव्हांपासूनच आमच्या जातीबद्दल अन् आमच्या जातीच्या वृत्तीबद्दल मला तिटकारा उत्पन्न झाला—' ती क्षणभर स्वस्थ राहून म्हणाली, 'तेव्हांपासूनच मला वाटलं, कीं या सध्यांच्या राजकारणाच्या चळवळींत सनातनी पारशांच्याविरुद्ध आम्हीं तरुणांनीं लढ्यांत भाग घेतला पाहिजे—'

बोलत असतांना ती मधेंच थांबली. तिचें लक्ष दुसरीकडेच वेधलें होतें. क्षणभर गोविंदाची स्मृती नाहींशी झाली होती. ती तिची तंद्रा पाहून गोविंदाही स्तब्ध राहिला.

कितीतरी वेळ तीं दोघेंही कांहींच न बोलतां बसून राहिलीं होतीं.

कसला उमाळा आला कोण जाणे, पण नर्गिज एकदम स्फुंदत स्फुंदत रडूं लागली. उद्वेगाचा भर अनावर होऊन तिनें गोविंदाच्या गळ्याभोवतीं आपले दोन्हीं हात टाकले. निर्विकार मनानें तो तिला समजावण्याचा प्रयत्न करीत होता.

पण समजावणी कसली करायची हेंच त्याला कळत नव्हतें. कारण विचारावें असें वाटत असतांही तसें विचारण्याचें धैर्य होत नव्हतें.

ती तशीच राहिली होती. आवेग ओसरतांच ती रुद्ध कंठानें म्हणाली, ' दोन मार्ग माझ्यापुढं आहेत. एक, संसारांत पडून सुखी होणं—प्रपंच वाढवून त्यांत गुरफटून राहाणं ! दुसरा, राजकारणाच्या खाईंत उडी घेणं ! वैयक्तिक संसाराचा मोह सोडून सार्वजनिक संसाराच्या पसाऱ्यांत गुरफटून क्लेश सोसणं ! दोहींकडेही मन सारखंच ओढतं आहे. पण मनाची निश्चिती होत नाहीं !—'

तिचें सांत्वन करायला गोविंदाकडे शब्द नव्हते. तो स्वतः सरकारी नोकरीच्या बंधनांत पडलेला होता. सुखावा संसार थाटण्याची कल्पना त्याच्या दृष्टीनें आकर्षक होती. पण सार्वजनिक संसारापासून अलिप्त राहा असें तिला सांगण्याचा आपल्याला अधिकार आहे असें त्याला वाटेना. तो स्वार्थं झाला असता. स्वार्थी वृत्तीची नर्गिजला जितकी चीड होती तितकीच त्याला स्वतःलाही होती. आक्का-साहेबांच्या स्वार्थीवृत्तीमुळेंच ती त्याला अप्रिय वाटत होती ना ?

नर्गिज म्हणाली, ' मला हें मोठं कोडं पडलं आहे. दोन्ही ओढी मोठ्या अनावर झाल्या आहेत. यांत कोणत्या वृत्तीचा जोर होतो, तेंच आतां मला पहायचं आहे.—'

गोविंदाला वाटलें, त्यागी वृत्तीनें उत्पन्न होणारे क्लेश सांसारिक सुखापेक्षां श्रेष्ठतर आहेत काय ? त्यागाची कसोटी कशी लावायची ? त्यागाचें वैभव मोठें असेल, पण त्यांतला मोठा त्याग कोणता ? वैयक्तिक जीवनाचा कीं व्यापक संसाराचा ? त्या व्यापक संसारांत पडल्यास नर्गिज त्याच्यापासून दुरावली असती ! पण कुणाचें कल्याण झालें असतें ? वैयक्तिक संसारांत अफाट विश्वांतल्या एका जीवाचा उद्धार केल्याचें जें श्रेय तिला मिळालें असतें तें त्या व्यापक संसारासाठीं केलेल्या त्यागाच्या तुलनेनें कोणत्या मोलाचें ठरलें असतें ?

नार्गिज तशीच राहिली होती. गोविंदानें तिला सांवरून धरलें होतें. तात्त्विक प्रमेयांचा विचार करतां करतां तो हळुहळू माणसांत येऊं लागला होता. निर्विकार-वृत्तीवर प्राकृतिक आकर्षणाचा पगडा बसूं लागला होता. नर्गिजची मनःस्थितीही अशीच बदलत चालली होती.

दुज्या भावाचा हळुहळू लोप होत चालला होता.

संध्याकाळीं तो घरीं आला त्यावेळीं जहागिरदार-कुटुंबानें येऊन तळ दिला असल्याचें त्याला दिसून आलें. सरदारगृहांत त्याच्यासाठीं त्या दिवशीं रात्रीं मेजवानी देण्याचें ठरलें होतें. आमंत्रणाचा स्वीकार रमाबाईनें आधींच केला होता.

नाइलाजानें गोविंदाला जावें लागलें. आमंत्रित मंडळी बरीच आली होती. त्या सर्वांचा परिचय करून देतांना गोविंदा आपला भावी जांवई असल्याचा उल्लेख जहागिरदारसाहेब बुद्धिपुरस्सर करीत होते. त्यांना विरोध करायचें धैर्य गोविंदाला झालें नाहीं. रमाबाईला वाटलें, हा साखरपुडाच झाला.

सर्वत्र आनंदीआनंदाचें वातावरण जरी पसरलें होतें, तरी गोविंदाला मात्र आपण कांहींतरी गुन्हा करीत आहों असें वाटून बाहेर मुद्रेवर गंभीरपणा राखणें दुष्कर होत होतें. ‘जहागिरदाराच्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं, आपलें लग्न ठरलेलें नाहीं.’ असें सांगून एकदम मोकळें व्हावें असें मनांत येत असतांनादेखील तसें बोलून दाखवण्याचें धैर्य त्याच्या वाणीला होत नव्हतें. या दुबळेपणाबद्दल त्याचा त्यालाच राग येत होता. मेजवानी संपून ते जायला निघाले त्यावेळीं त्याच्या गाडींत

येऊन आक्कासाहेब बसली याचें त्याला आश्चर्य वाटलें. तिनें ड्रायव्हरला गाडी चालवायला सांगितलें त्यावेळीं गोविंदा म्हणाला, ' आई यायची आहे ना ?'

' त्या माझ्या आईबरोबर येणार आहेत—' आक्कासाहेब म्हणाली, '—आमच्या गाडींतून थोड्या वेळानं. '

तीं दोघेंही गोविंदाच्या बंगल्यावर आलीं. गोविंदा अगदींच अस्वस्थ झाला होता. ही बया कां आली हेंच त्याला कळत नव्हतें. रमाबाईला मुद्दामच मागें ठेवण्यांत आलें अशी शंका त्याला आल्यावांचून राहिली नाहीं.

मोटारींतून उतरतांच तो म्हणाला, ' बरं आहे.—ड्रायव्हर तुम्हांला पोंचवून परत येईल. '

' नाहीं. ' आक्कासाहेब म्हणाली, ' आमची गाडी येणार आहे तुमच्या आईसाहेबांना घेऊन तेव्हां जाईन मीं परत.' आक्कासाहेबांचा डाव काय होता याची कल्पना गोविंदाला होईना.

वर येऊन त्यानें कपडे काढून ठेवले तशी आक्कासाहेब त्याचा हात धरून त्याला आपल्या शेजारीं एका कोचावर ओढीत म्हणाली, ' बरं झालं तुमच्या आईसाहेब आल्या नाहींत तें. जायच्या पूर्वी एकदां मला मन मोकळं करून बोलतां तरी येईल.—' काय बोलावें हें गोविंदाला सुचेना. भिडस्तपणामुळें आपली बाजू पदोपदीं आंगलट येत आहे हें कळत असूनसुद्धां तो स्वस्थ राहिला असें पाहून ती म्हणाली, ' योगायोग म्हणून कांहीं तरी आहे यांत शंका नाहीं. आपल्याला रजा रद्द करून जावं लागलं—पण त्यामुळं मुहूर्त चुकणार ! पण मी म्हणतें आतां मुहूर्तांची कसली वाट पहायची !—'

ती क्षणभर स्तब्ध राहिली—गोविंदाच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात राहिली. तरीही गोविंदा कांहीं बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, ' मला वाटतं, आमच्या आईसाहेब तुमच्या आईसाहेबांना घेऊन इतक्यांत येतील तोंपर्यंत आपल्याला काय बोलायचं तें बोलून घेतलं पाहिजे.'

'आतां काय बोलायचं राहिलं आहे?' गोविंदा म्हणाला, 'भावी जांवई म्हणून माझ्या नांवाचा डांगोरा पिटायचा तो आज पिटून घेतलात—'

'असं काय बोलतां हें!' लाडिकपणानें आक्कासाहेब म्हणाली, 'त्यांत डांगोरा कसला? केव्हांतरी लग्न होणारच ना? मॅरेज रजिष्टर करून घ्यावं असं देखील मीं म्हटलं असतं, पण तें सरकार आणि आईसाहेबांना पटायचं नाहीं. त्यांना आपली जहागिरदारी मिरवायची आहे ना लग्नाच्या वेळीं! म्हणूनच त्यांना मुहूर्त पाहिजे आहे—अन् लग्नही जहागिरींतच झालं पाहिजे. आमच्या दिवाणजींनी कोंकणस्थ-कऱ्हाडे असाही प्रश्न काढला होता पण सरकारनीं त्यांना एकदम गप्प बसवलं तेव्हां माझ्या जिवांत जीव आला. आतां कसले हे भेद पहायचे? पण लग्नाच्या अवडंबराच्या बाबतींत माघार घ्यायला मात्र ते तयार व्हायचे नाहींत. तो इभ्रतीचा प्रश्न आहे.—' जहागिरींतील सर्वप्रकारच्या कुलाचारांची कुळकथा सांगायला तिनें सुरवात केली. तिची बडबड सारखी सुरू होती. गोविंदा कांहींच बोलत नव्हता. रमाबाईच्या येण्याकडे त्याचे डोळे लागले होते.

सारखी अर्धा तास ती बडबडत होती. एका विषयांतून दुसरा विषय उकरून काढून तिनें आपलें चऱ्हाट चालू ठेवलें होतें, तोंच जहागिरदारांकडून एक माणूस आला आणि रमाबाईना त्या रात्रीं राणीसाहेबांनी ठेवून घेतलें आहे, असा निरोप त्यानें सांगितला.

गोविंदाला वाटलें येणारा माणूस आक्कासाहेबांना नेण्याकरितां मोटर घेऊन आला असेल—पण तो कांहींच न बोलतां निघून गेला. आक्कासाहेबानींही त्याला कांहीं विचारलें नाहीं असें पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

'आतां बराच उशीर झाला,' गोविंदा म्हणाला, 'अजून ड्रायव्हर खालीं असेल त्याला हाक मारून तुम्हाला सरदारगृहांत पोचवायला सांगतों.'

'ड्रायव्हरला मीं मघाशींच लावून दिला,' आक्कासाहेब म्हणाली, 'आमची मोटर येणार होती ना?—बरं झालं नाहीं आली ती! आजची रात्र इथंच राहीन मीं आतां.—'

गोविंदाच्या अंगावर कांटा उभा राहिला. ती पुढें म्हणाली, 'आतां चार महिने वाट पहावी लागणार! तिकडे यायची परवानगी सरकारनीं दिली तर बरंच.—पण त्यांचा स्वभाव अगदीं लहरी आहे. शिवाय जहागिरींत गेल्यावर तिथले आचारविचार पाळावे लागतात! इथं असतें तर गोष्ट निराळी होती. सहज मला आपल्याकडे येतां आलं असतं! बरं झालं गाडी नाहीं आली ती!—'

आक्कासाहेबांच्या डावाचा उमज गोविंदाला आत्तां पडला. तो म्हणाला, 'पण राणीसाहेब तिकडे वाट नाहीं का पहाणार तुझी?—'

'वाट कसली पहायची? मीं इथं आलें आहें हें त्यांना माहित आहे. तसं असतं तर त्यांनीं गाडी नसती का पाठवली?'

गोविंदा भांबावून गेला. या मगरमिठींतून आतां सुटणं अशक्य असेंच त्याला वाटलें. 'चार महिन्यांचा अवधी आहे,' गोविंदा म्हणाला, 'तितक्यांत माझं मन बदललं तर?'

'असं कधीं झालंय?' त्याच्या गळ्यांत हात टाकीत आक्कासाहेब म्हणाली.

पुन्हां त्याच्या अंगावर थरारून कांटा उभा राहिला. बाजारच्या वेश्यांच्या गोष्टी त्यानें वाचल्या होत्या. तसलाच हा प्रकार आहे असें त्याला वाटलें.

'अन् या चार महिन्यांत मीं कदाचित् मेलों तर?' गोविंदा गंभीरपणें म्हणाला.

'तर मीं कुंकूं पुसून विधवा म्हणून मिरवीन, पण आजच्या मुहूर्तावर कांहीं आपलं लग्न झाल्याशिवाय राहायचं नाहीं.'

गोविंदाला तिची शिसारी आली होती. बखोटीला धरून तिला नेऊन गाडींत बसवावी आणि सरदारगृहांत पोंचवावी असें त्याच्या मनांत आलें खरें पण स्वाभाविक दुबळेपणानें त्याच्या मनोवृत्तीवर मात केली. शरीर आणि मन या दोहोंच्या झगड्यांत प्रकृतीचा विजय झाला.

त्या रात्रीं आक्कासाहेब तिथेंच राहिल्या.

## प्रकरण २२ वें.

मुंबई सोडण्यापूर्वी नर्गिजला भेटण्याचें त्याला धैर्य झालें नाहीं.

रमाबाई गांवीं जाणार होती. तिची रवानगी करून दिल्यानंतर तो मोटारनेंच आपल्या नोकरीवर जायला निघाला. जहागिरदार-कुटुंबानें निघतां निघतां त्याला गांठलें. औपचारिक निरोप घेऊन त्यानें कसाबसा तिथून पळ काढला.

ज्या दत्ताला तो भीत होता, तेंच त्याच्यापुढें वाढून ठेवलेलें होतें. आजारी पडून रजेवर गेलेल्या मागल्या डिस्ट्रिक्ट जज्जाच्या कारकिर्दीत राजद्रोहाचा एक खटला चालू होता. खटल्यांतील आरोपी हनीफा बेगम नांवाची एक मुसलमान बाई होती. महात्मा गांधींनीं सुरू केलेल्या खिलापतीच्या चळवळींत आपले दोघे मुलगे महंमदअल्ली आणि शौकतअल्ली यांना घेऊन बी अम्मानें जी चळवळ चालू केली होती तिच्याच अनुषंगानें ही बाई राजकारणाच्या चळवळींत सामिल झाली होती. तिनें दिलेल्या व्याख्यानावरून तिच्यावर हा खटला भरण्यांत आला होता.

खटला सुरू होण्याच्या वेळीं हनीफा बेगमला आणून पिंजऱ्यांत जेव्हां उभें केलें तेव्हां तिला पहातांच गोविंदा दिपून गेला. एक उंचीपुरी भव्य बाई समोर पहातांच त्याला तिच्याबद्दल आदर वाटला. तिची मुद्रा गंभीर होती. बुद्धिप्राधान्याचें तेज तिच्या चेहऱ्यावर झळकत होतें. तिचे डोळे मोठे तेजस्वी असून नुसती नजर फेंकतांच परिणाम होण्याइतके जाज्वल्य होते.

ती येऊन पिंजऱ्यांत उभी राहिली त्यावेळीं आपण तिच्यापुढें एकाद्या कीडमुंगी-सारखा क्षुद्र आहों असें गोविंदाला वाटलें. तिला बसायला खुर्ची द्यायला गोविंदानें सांगितलें तेव्हां शिरस्तेदार आश्चर्यचकित झाला. तो म्हणाला, 'पूर्वी तिला खुर्ची देण्यांत आली नव्हती.'

'मीं सांगतोंय्.—त्यांना खुर्ची द्या बसायला !' गोविंदा म्हणाला.

त्या वृद्ध शिरस्तेदाराला वाटलें, मोठा अधिकार एकदम मिळालेल्या या नव्या पोरांत मुळीं पाणीच नाहीं !

खटला चालू असतांना मोठ्या आदरानें आणि भक्तिभावानें तो तिच्याकडे पहात होता. बराच वेळपर्यंत तिची नजर त्याच्याकडे वळली नव्हती. पण ज्यावेळीं तिनें त्याच्याकडे पाहिलें त्यावेळीं ती एकदम दचकली. खटला चालू असेपर्यंत सारखी डोकावून ती त्याच्याकडे पहात होती.

त्या दिवशीं तिला बोलण्याचा प्रसंग आला नव्हता. पोलीस रिपोर्टराच्या साक्षी सुरू होत्या. तिनें कुणाचीच उलट तपासणी केली नाहीं. तिच्या वतीनें कुणी वकील उभा राहिला नव्हता. ती स्वतःच आपला खटला चालवीत होती. किंबहुना, ती आपला खटला मुळींच चालवीत नव्हती असें म्हणणें जास्त बरोबर झालें असतें.

त्या दिवशींच्या खटल्याचें काम संपतांच गोविंदा उठून चेंबरमधें गेला. बेगमला कोठडींत नेण्यासाठीं पोलीस आले त्यावेळीं ती म्हणाली, 'मला साहेबांची भेट घ्यायची आहे.'

कायद्याप्रमाणें तें शक्य नव्हतें असें त्यांनीं सांगितलें त्यावेळीं ती म्हणाली, 'मला त्यांच्याशीं एक शब्दसुद्धां बोलायचा नाहीं. एक क्षणभर मला नुसतं त्यांच्या अगदीं जवळ नेऊन उभं करा, दुसऱ्याच क्षणाला मीं परत येईन.'

पोलीसांच्या मनांत कांक्षा आली. तिलाही ती कल्पना आली. ती म्हणाली, 'भ्यायचं कारण नाहीं. मी अनत्याचाराचं व्रत घेतलेलं आहे. वाटेल तर माझी झडती घ्या. हातांत बेड्या घालून माझे हात मागें अडकवून टाका. मला एक क्षणभरच

त्यांना पहायचं आहे, त्यापेक्षां जास्त कांहीं नाहीं—पाहिजे तर त्यांची परवानगी विचारा.'

शिपायांनीं इन्स्पेक्टरला सांगितलें. इन्स्पेक्टरनीं शिरस्तेदाराला सांगितलें. साहेबांनीं तिला खुर्ची दिल्यामुळें शिरस्तेदारालाही वाटलें होतें, कीं त्यांचा कांहीं पूर्वीचा परिचय असेल. ते म्हणाले, ' चेंबरमध्यें साहेबांची भेट घेणं कांहीं शक्य नाहीं. मीं साहेबांना विचारून पहातों. त्यांची मर्जी असली तर कोठडींत येऊन भेटतील.' क्षणभर विचार करून शिरस्तेदार म्हणाला, ' तरीपण थांबा, मीं एकदां साहेबांना विचारतों.'

गोविंदानें परवानगी दिली तेव्हां शिरस्तेदारालासुद्धां आश्चर्य वाटलें.

हनीफा बेगमला गोविंदापुढें नेऊन उभें केलें तेव्हां गोविंदा अस्वस्थ झाला होता. तिच्या डोळ्याला डोळा भिडतांच त्याचें ऊर धडधडूं लागलें. त्यानें तिला विचारलें, ' काय आहे ? '

ती एक शब्दही बोलली नाहीं. टेबलाकडून फिरून ती त्याच्या दुसऱ्या बाजूला जाऊन उभी राहिली. अगदीं निरखून ती त्याच्या चेहऱ्याकडे पहात होती.—पहातां पहातां तिचे डोळे पाण्यानें भरून आले. कंठाशीं येणारा हुंदका गिळून एकदम पाठ फिरवून ती तशीच खोलीबाहेर गेली.

गोविंदा नुसता विचार करीत राहिला. त्याचें मन घोटाळयांत पडलें होतें. तिच्या या विलक्षण वर्तनाचा त्याला उलगडा होईना.

दुसऱ्या दिवशीं केस सुरू झाली तेव्हां गोविंदाला असें दिसून आलें, कीं शक्य तेवढें करून ती त्याच्याकडे पहात नव्हती. पण ज्यावेळीं तिची दृष्टी त्याच्या दृष्टीशीं भिडे, त्यावेळीं तिचे डोळे एकदम पाण्यानें भरून येत,—आणि ती झटकन् मान फिरवून घेई.

खटला रेंगाळत चालला होता. बरेच साक्षीदार निष्कारण उभे करण्यांत आले होते. त्यांच्या ठराविक ठशाच्या साक्षी ऐकतांना गोविंदालासुद्धां कंटाळा आला.

याच सुमाराला रमाबाई गांवाहून परत आली. पुन्हां पहिल्यासारखा संसार थाटला गेला. प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणीं परिस्थिती सारखीच होती. तसेंच ते गांवाबाहेरचे भकास बंगले, तसेंच तें उदासवाणें एकलकोंडें जीवन, तसाच तो गांवच्या लोकांपासून पडलेला दुरावा—पूर्वीच्या गांवाहून बदली झाली असें कांहीं रमाबाईला वाटलें नाहीं.

रोज त्या खटल्याची हकिकत गोविंदा रमाबाईला सांगत असे. रोज तोंड भरून हनीफाबेगमची स्तुती करीत असे. तसें पाहिलें तर स्तुती करायला कांहीं कारण नव्हतें. ती फारशी बोललीसुद्धां नव्हती. ती स्तुति म्हणजे नुसतें तिचें वर्णन होतें. तिचा गंभीरपणा, तिची प्रशांत मुद्रा, तिची निर्विकार वृत्ति आणि त्याच्याकडे पहात असतांना होत असलेली तिची विलक्षण मनःस्थिती नि त्या मनःस्थितीच्या मागें असणारी अज्ञात भूमिका वगैरे विषयांची तो रोज रमाबाईपुढें उजळणी करीत असे.

ती बाई बरीच प्रौढ आहे—जवळ जवळ आपल्याच वयाची आहे—हें रमाबाईला कळलें नसतें तर तिनें भलताच संशय घेतला असता, इतक्या आत्यंतिकतेनें गोविंदा तिचें वर्णन करी. एका मुसल्मान बाईबद्दल त्यानें दाखवलेला अवास्तव आदर पाहून रमाबाईला वाईट वाटल्यावांचून रहात नसे.

शेवटीं एकदांचा खटला संपला. व्यासपीठावर राहून व्याख्यान द्यावें त्याप्रमाणें तिनें बचावाचें भाषण केलें. तिच्या भाषणांतील युक्तिवाद, वक्तृत्वाची शैली आणि संभाषणपटुत्वाचें गांभीर्य पाहून गोविंदा अगदीं दिपून गेला.

ज्यूरीला उद्देशून भाषण करतांना त्यानें जें धोरण ठेवलें होतें त्याचा परिणाम होऊन ज्यूरीनें तिला निर्दोषी ठरवलें.

त्या दिवशीं तो घरीं आला त्यावेळीं मनावरचा केवढा तरी भार हलका झाल्या-सारखें त्याला वाटत होतें. तो रमाबाईला म्हणाला, 'आज तिला शिक्षा देण्याचा प्रसंग माझ्यावर आला असता तर मला मरणप्राय दुःख झालं असतं. केस तयार करतांना पोलीसांनीं इतक्या चुका केल्या होत्या, इतके विसंगत साक्षी-

पुरावे आणले होते, कीं त्यामुळंच ती शेवटीं निर्दोषी ठरली. तिचं बचावाचं भाषणही मोठं परिणामकारक झालं. एकाद्या कसलेल्या वकिलाला शोभेल असंच तें भाषण होतं! किती सुंदर बोलत होती ती! निकाल सांगतांच तिची मनोवृत्ती उचंबळून आल्याचं मला स्पष्ट दिसलं. शिक्षेला ती भीत नव्हती. कांहींतरी शिक्षा होईल अशीच तिची अपेक्षा होती! काय असेल तें असो, माझ्याकडे पाहिलं कीं तिचे डोळे कां भरून येतात हेंच मला कळत नाहीं! तिला सोडून देण्यांत आलं त्यावेळीं कितीतरी लोकांनीं येऊन तिच्या गळ्यांत हार घातले—पण तिकडे तिचं लक्ष नव्हतं! ती सारखी माझ्याकडे पहात होती!—'

तो असें बोलतो आहे तोंच पट्टेवाल्यानें हनीफाबेगम आल्याची वर्दी दिली. रमाबाईलाही तिला पहाण्याची उत्कंठा होती. तिनें तिला आंत घेऊन येण्यास सांगितलें.

आंत येतांच पहिल्यानें तिनें हिंदुपद्धतीनें दोघांनाही नमस्कार केला. तिला पहातांच रमाबाईला गोविंदानें केलेल्या वर्णनाची सत्यता पटली. गोविंदानें तिला मोठ्या आदरानें बसायला सांगितलें तेव्हां ती म्हणाली, 'माफ करा, तुम्हीं सरकारी अधिकारी आहांत. आजच्या खटल्यांतून मीं सुटलें असलें तरी मीं एक सरकारच्या इतराजींतली व्यक्ति आहें हें विसरून चालायचं नाहीं.—मीं यायला नको होतं! पण माझा नाइलाज झाला!—'

ती तशीच उभी राहिली होती. गोविंदाकडे सारखी टक लावून पहात होती. क्षणभरानें गोविंदाच्या अगदीं जवळ येऊन ती म्हणाली, 'आपला डावा गाल जरा इकडे फिरवाल का?'

गोविंदा आश्चर्यचकीत झाला. त्याच्या डाव्या गालावर निळ्या रंगाची साधारण चवली एवढी जन्मखूण होती.

त्यानें गाल तिच्याकडे वळवला.—ती पुन्हां म्हणाली, 'कपाळावरचे केस जरा मागं घ्याल का?' तिथेंही एक तशीच जन्मखूण होती.

गोविंदाचें हृदय धडधडूं लागलें. एकदम तिचा तोल सुटला नि ओक्साबोक्शीं रडत ती शेजारच्या खुर्चीत कोसळून पडली. रमाबाईनें जाऊन तिला सांवरून धरलें.

बराच वेळ खुर्चीला टेकून ती आसवें गाळीत होती. डोळे पुसून वर पहात ती गोविंदाला म्हणाली, 'या तुमच्या मातोश्री का ?'

गोविंदा होय म्हणणार होता, पण त्याची जीभ वाहीना.

' होय, ' रमाबाई म्हणाली, ' मीच त्याची आई ! '

' ईश्वर तुमच्या मुलाला उदंड आयुष्य देवो !' असें म्हणून ती उठून जायला निघाली.

बळेंच तिला थांबवून धरून रमाबाई म्हणाली, ' असं कां विचारलंत ? कां असा तुमच्या मनावर परिणाम झाला ? कां तुम्हांला असं रडूं कोसळलं ? '

एक क्षणभर स्तब्ध राहून ती म्हणाली, ' कांहीं झाल्यागेल्या आठवणी आहेत त्या ! कुणालातरी पाहून कुणाचीतरी आठवण होते ! असं व्हायला नको होतं ! मीं माझं जीवन देशाला वाहिलं आहे. माझी संपत्ती मीं महात्माजींच्या चरणीं अर्पण केली आहे. संसाराचा माझा संबंध सुटला आहे. जुनीं क्षतं उकरून काढून, मन कार्यापासून चळेल असं कांहींच माझ्या हातून घडायला नको होतं. या चुकीचं प्रायश्चित्त घेण्यासाठीं आतां मला उपास केला पाहिजे !—'

गोविंदाकडे वळून ती म्हणाली, ' खटला चालत असतांना आपल्याला भेटायची सवलत आपण मला दिलीत—आतांही मला भेट घेऊं दिलीत—याबद्दल मीं आपली फार आभारी आहें. ' असें म्हणून ती जायला निघाली. तिला पोंचवायला रमाबाई दारापर्यंत गेली. गोविंदा तसाच खूर्चीत बसून राहिला होता–तो ताड्कन उठून धांवत तिच्यासमोर जाऊन म्हणाला, ' मीं यांचा औरस मुलगा नाहीं ! '

हनीफाबेगम एकदम स्तंभित होऊन तारवटलेल्या डोळ्यांनीं त्याच्याकडे पहात राहिली. गोविंदा पुढें म्हणाला, ' अनाथालयांतून आणून वाढवलेलं मीं एक पोरकं मूल आहें ! '

चक्कर येऊन ती पडेल कीं काय असें वाटून रमाबाईनें एकदम तिला सावरून धरलें. तिचे डोळे मिटले होते. तिचा भार रमाबाईच्या आंगावर पडत होता. गोविंदानें हातभार लावला नसता, तर दोघीही एकदम कोसळून पडल्या असत्या.

गोविंदानें तिला सांवरून धरून आणून आंत कोचावर बसविलें. अगदीं क्षीण स्वरानें तिनें विचारलें, ' कोणत्या अनाथगृहांतून ? '

गोविंदानें त्या आश्रमाचें नांव सांगतांच पुन्हां तिनें डोळे मिटले. गोविंदाच्या अंगावर थरारून रोमांच उभे राहिले. एका अननुभूत भावनेनें त्याचें सर्वांग शहारून उठलें. त्याच्या सर्वांगाला थरकांप सुटला. तो मट्कन् तिच्या शेजारीं बसला.

रमाबाईही घाबरून गेली होती. तिलाही अंदाज आला होता.

बेगमेनें डोळे उघडून शेजारीं बसलेल्या गोविंदाकडे पाहिलें. मनाचा आवेग तिला अनावर झाला होता. ' माझा बेटा ! ' असें म्हणून गोविंदाला तिनें आपल्या हृदयाशीं कवटाळून धरलें.

गोविंदा सुन्न होऊन गेला होता. त्याचें सर्व शरीर बधिर झालें होतें. हृदयांत धडकी भरली होती. मेंदू काम देत नव्हता. वात्सल्याच्या त्या घट्ट मिठींत तो भग्नबुद्ध होऊन निःस्तब्ध राहिला होता.

' हीच का त्याची आई ! ' रमाबाईनें स्वतःलाच विचारलें. रमाबाईला वाटलें, मग आपण कोण ? तिला तें खरें वाटेना. नाळ तोडण्यापासून एवढा मोठा होईपर्यंत ज्याला आपण आपल्या कुसव्याचा जीव म्हणून मानलें, त्याला ही परकी बाई आपल्याकडून ओढून घेऊन जाणार का ? ' नाहीं, नाहीं ! ' ती एकदम मोठ्यानें किंचाळली, ' तो माझा मुलगा आहे ! तो माझा मुलगा आहे ! ' एकदम पुढें होऊन तिनें गोविंदाला तिच्या मिठींतून सोडवून ओढून घेतलें.

करुणापूर्ण दृष्टीनें बेगम रमाबाईकडे पहात होती. रमाबाई पिसाळल्यासारखी झाली होती. ती एकदम ओरडली, ' चालती हो इथून ! माझ्या मुलाला ' माझा बेटा ' म्हणणारी तूं कोण ? कशावरून हा तुझा मुलगा ? काय आहे पुरावा तुझ्या-

कडे ! काय अधिकार आहे याला जवळ घ्यायचा तुला ? तो माझा मुलगा आहे ! मी लहानाचा मोठा केला ! माझ्या कुसव्याचा किडा आहे तो ! कुठली कोण तूं !—'

'माफ करा ! ' बेगम म्हणाली, ' तुमच्या सुखाच्या संसारांत बिब्बा घालण्याकरतां मीं आलें नाहीं. मला नुसता भ्रम झाला. दुःखी मन असंच आशाळभूत होत असतं ! म्हणूनच मीं म्हटलं, मला प्रायश्चित्त केलं पाहिजे ! क्षमा करा—हा तुमचाच मुलगा आहे ! नीट प्रतिपाळ करा याचा ! येतें मी ! ' असें म्हणून ती तिथून तडक निघून चालती झाली !

दगडाप्रमाणें स्तब्ध होऊन राहिलेल्या गोविंदाला जवळ घेऊन रमाबाई म्हणाली, ' माझा बाळ तो ! '

## प्रकरण २३ वें.

हनीफाबेगम निघून गेल्यानंतर गोविंदा येऊन आपल्या खोलींत बसला. रमाबाईही त्याच्या मागोमाग आली. गोविंदाला जबरदस्त धक्का बसला होता. आपल्या जन्माचें कोडें कधीं सुटेल असें त्याला वाटलें नव्हतें. तें कोडें सुटण्याबद्दलची त्याची तळमळ सदोदीत जागती होती खरी, पण आपल्या आयुष्याच्या शेवटापर्यंत त्याचा उलगडा होणार नाहीं अशा समजानें ती आठवण त्यानें आपल्या हृदयाच्या सांदीकोपऱ्यांत गाडून टाकली होती.

ती ठिणगी पुन्हां तेवली.—अंतःकरणाच्या सर्व भावनांखालीं त्या ठिणगीनें जाळ पेटवला. त्या सर्व कोमल आणि कठोर भावना त्या जाळामुळें जळून खाक होणार कीं काय अशी भीति त्याला वाटूं लागली.

पेटत्या अंतःकरणानें तो या परिस्थितीकडे पहात होता. आंतून भयंकर खळबळाट उडाला असतांही मुद्रा गंभीर ठेवण्याचा प्रयत्न करीत होता. रमाबाईच्या वत्सल दृष्टीला त्याचें तें अंतरंग दिसून आलें. ती म्हणाली, ' मनाचा तोल संभाळायची वेळ हीच आहे गोंदू. मला केवढा धक्का बसला आहे याची कल्पना तुला येणार नाहीं असं मीं म्हणत नाहीं.—पण शांतपणा राखायची वेळ हीच आहे !—' हृदयांतून येणारा उमाळा आवरीत ती म्हणाली, ' ती तुझी आईच—शंकाच नाहीं !—'

गोविंदाला एकदम भडभडून आलें. रमाबाईच्या खांद्यावर डोकें ठेवून तो फुलून फुलून रडूं लागला. तशाच मनःस्थितींत तो बोलत होता, ' नाहीं !— नाहीं !— तूंच माझी आई ! कुणाच्या कुशीला मी जन्म घेतला ? काय करायचं आहे मला त्याच्याशीं ? कळूं लागलं तेव्हांपासून माझी आई तूंच ! तूं मला वाढवलंस—तूं मला माणसांत आणलंस ! तुझ्या प्रेमाच्या पान्ह्यावर मीं लहानाचा मोठा झालों !—' पुढें त्याच्यानें बोलवेना.

तो लहानाहून लहान झाला होता. तान्ह्या मुलासारखा रमाबाईला बिलगत होता. मोठेपणाची जाणीव पूर्णपणें मावळली होती. त्या प्रौढ झालेल्या तान्ह्या बाळाला मांडीवर घेऊन त्याच्या डोक्यावरून हात फिरवीत रमाबाई उद्गारली, 'माझं बाळ तें ! माझं बाळ तें ! उगीच भ्रम झाला असेल तिला ! ती म्हणाली ना तसं ! दुःखी मन आशाळभूत असतं ! बिचारीचं आईचं काळीज !—लहानपणीं पोर टाकून दिलं असेल—आतां वणवण त्याच्यासाठीं शोधीत असेल—कितीजणांकडे पाहून तिनं असाच संशय घेतला नसेल कशावरून ? उगी, उगी—मींच तुझी आई बरं ! कुठली मेली कशाला आली या वेळीं आमच्या सुखाच्या संसारांत माती कालवायला !—' परोपरीनें रमाबाई त्याचें सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत होती.

तो सावध झाला !—माणसांत आला ! प्रौढपणाची जाणीव जागी झाली, त्यासरशीं अलेंबलें डोळे पुसून तो उठून बसला.

' कुठं गेली असेल ती ! ' गोविंदा गंभीरपणें उद्गारला, ' एकदां छाननी करून घेतली पाहिजे मला–उगीच रुखरुख नको मनाला ! मी मुसलमान ?—कधींच कसं नाहीं वाटलं मला असं !—'

'नाहीं, नाहीं ! ' रमाबाई म्हणाली, ' आम्हीं तुझी नाळ कापली ! आम्हीं तुझी मुंज केली ! तूं आमचाच आहेस !—कोण नाहीं हिरावून घ्यायचं तुला आमच्यापासून ! '

ती सारी रात्र गोविंदानें तळमळून काढली. भयंकर स्वप्नांनीं त्याला भंडावून सोडलें होतें. आपण मुसलमान आहें, मुसलमानासारखा वागतों आहें—मुसलमानांत

भिसळतों आहें, मुसल्मानी वृत्तीनें वावरतों आहें, असें त्या स्वप्नांत त्याला दिसत होतें. घाबरून तो जागा झाला त्यावेळीं त्याला दरदरून घाम सुटला होता.

पुन्हां पुन्हां त्या परिस्थितीवर तो विचार करीत होता. आतां त्याला नर्गिजची आठवण झाली !—आक्कासाहेबाची आठवण झाली !—ते विशिष्ट प्रसंग आठवले. ती मुसलमानी वृत्ति होती का ?—पण आक्कासाहेब तर मुसलमान नव्हती ! ती कशी घसरली ! तिनेंच नाहीं का आपल्याला उच्च वृत्तींतून खालीं ओढलें ?

आणि नर्गिज ?—नर्गिजची आठवण येतांच त्याच्या आंगावर रोमांच उभे राहिले. तिला ही हकिकत कळली तर ती काय म्हणेल ? धर्मअधर्मांच्या कल्पनांवर तिचा विश्वास नव्हता !—पण आनुवंशिकता ती कशी मानणार नाहीं ? आनुवंशिक संस्कारामुळेंच नर्गिजकडे आपलें मन ओढत होतें का ? पण मग आक्कासाहेबांचा कां तिटकारा येत होता ? मुसलमानी वृत्ति म्हणजे कामुकतेची उच्छृंखलता ! —तिथें जात, पात, धर्म यांचा प्रश्न येत नाहीं ! मग हें अगदीं स्वाभाविकच होतें का ? धर्मभेदविरहित, आनुवंशिकताविरहित अशी केवळ स्वाभाविक अशी ही मानवीवृत्तीच होती का ?

त्या प्रश्नांनीं त्याला भंडावून सोडलें. त्याला निश्चित उत्तरें मिळेनात ! यावेळीं नर्गिज असती तर !—पण आधीं या नव्या शोधाबद्दल निश्चिती करून घेण्याची जरूरी त्याला आत्यंतिकतेनें भासली. विवश झालेली मनःस्थिती संयमाच्या बळानें दाबून त्यानें नित्याचे व्यवहार सुरू केले आणि त्याबरोबरच या शोधाच्या मुळाचा तपासही त्यानें सुरू केला.

तो सरकारी अधिकारी होता, म्हणूनच त्याला हा तपास करणें शक्य होतें. अशा अनाथालयांतून जन्माला आलेल्या मुलांचा इतिहास त्या संस्थेचे व्यवस्थापक कधींच कुणाला सांगत नसतात. पण खाजगी रीतीनें—सरकारी अधिकाराचा फायदा घेऊन—त्यानें तपास सुरू केला.

त्याचबरोबर हनीफाबेगमला पुन्हां भेटण्याची उत्कंठा त्याला अनावर झाली होती. तो गांव सोडून ती निघून गेली होती. मुंबईला ती कुठेंतरी रहाते

असें त्याला कळलें खरें पण तिचा निश्चित पत्ता सांपडला नाहीं. तिची वृत्ति फिरत्या फकिराची होती. खिलाफतीच्या चळवळीसाठीं हिंदुमुसलमानांच्या एकीवर व्याख्यानें देत ती गांवोगांव हिंडत होती असें त्याला कळलें होतें. असल्या चळवळीशीं नर्गिजचा कांहींना कांहीं संबंध असावा अशी त्याला अंधुक कल्पना होती. म्हणूनच हनीफाबेगमचा पत्ता काढण्याविषयीं त्यानें नर्गिजला पत्र लिहिलें.

नर्गिजकडून बरेच दिवस पत्राचें उत्तर आलें नाहीं त्यामुळें गोविंदा अत्यंत अस्वस्थ झाला. त्यानें पुन्हां एक पत्र पाठवलें. त्याचेंही उत्तर बरेच दिवस आलें नाहीं. त्यानें पत्र पाठविलें नसतें तर त्याला विशेष वाटलें नसतें. पण पत्र पाठवून उत्तर न आल्यामुळें हनीफाबेगमचा प्रश्न बाजूला राहून नर्गिजबद्दलच त्याला काळजी वाटूं लागली.

हनीफाबेगमची भेट झाल्यापासून गोविंदाचें रमाबाईबद्दलचें प्रेम पूर्वीपेक्षां किती-तरी पटीनें वाढलें होतें. तिचाही ओढा तसाच कांहीं विलक्षण झाला होता. गोविंदाच्या वयाचीसुद्धां तिला विस्मृति झाली होती. त्या प्रसंगाबद्दलची गोष्ट काढण्याचें दोघेंही टाळीत असत. पण त्या प्रसंगामुळें झालेले परिणाम मात्र रोजच्या व्यवहारांत प्रामुख्यानें दिसून येऊं लागले होते.

मायलेक एकमेकांच्या मायापाशांत गुरफटून गेल्यासारखीं झालीं होतीं. केव्हां एकदां ऑफिसांतून येतों न् केव्हां आईबरोबर बोलत बसतों असें गोविंदाला होत असे. रमाबाई गोविंदाच्या येण्याकडे सारखी डोळा लावून बसत असे. आल्यानंतर तासन् तास दोघेंही बोलत बसत. गोविंदा बहुतेक ऑफिसांत चाललेल्या खटल्यांची हकिकत तिला सांगे.

रमाबाईला बोलायला विषयच नव्हता. तिनें गांवांतल्या लोकांशीं संबंध ठेवायचें पहिल्यापासूनच टाळलें होतें. उगीच कांहींतरी प्रश्न विचारून गोविंदाचें बोलणें लांबवण्यापलिकडे तिला बोलायला दुसरा कांहीं विषयच नव्हता.

तीं दोघेंही अंतरांत जागीं होतीं. हनीफाबेगमच्या प्रकरणाचा जरी पुराव्यानें निकाल लागला नव्हता तरी हा मुलगा तिचाच, अशी रमाबाईची खात्री झाली

होती. आईचें हृदय आईच ओळखते !—गोविंदाच्या भेटीनें बेगमेच्या मनावर झालेला जो परिणाम तिनें प्रत्यक्ष पाहिला होता त्यामुळें तिला त्याबाबतींत शंका राहिली नव्हती.

गोविंदा मात्र साशंक होता.—आशाळभूतपणानें साशंक झाला होता. ती बातमी खोटी ठरावी असें मनःपूर्वक त्याला वाटत होतें. आपण एक मुसलमानाचा मुलगा आहें हें त्याचें त्यालाच पटत नव्हतें. सर्वसाधारण मुसलमानांचे सार्वत्रिक आचार-विचार जरी त्याला तपशिलवार माहीत नव्हते, तरीही सर्वसाधारण मुसलमानांच्या वृत्तीची ठोकळपणानें त्याला कल्पना होती-ती कल्पना तितकीशी लोभनीय नव्हती आणि म्हणूनच ती बातमी खोटी ठरावी असें त्याला वाटत होतें.

एक काल असा होता, कीं आपल्या जन्माचें रहस्य उलगडलें जावें असें त्याला वाटे! आतां झालेला उलगडा जेव्हां त्याला दुःसह झाला तेव्हां अखेरपर्यंत तें रहस्य कालाच्या पोटांत गडप होऊन रहावें, असेंच त्याला वाटूं लागलें.

एके दिवशीं नर्गिज अचानक येऊन हजर झाली. रविवार असल्या-मुळें तो घरींच होता. मुद्दाम रविवार साधूनच ती आली होती. पहिल्याच दृष्टभेटीला नर्गिजला दिसून आलें, कीं गोविंदाच्या चर्येत विलक्षण पालट झाला आहे. पूर्वीचा गंभीरपणा जाऊन त्याठिकाणीं कोमलपणाची छटा त्याच्या मुद्रेवर स्पष्टपणें दिसूं लागली होती. डोळ्यांत मार्दव आलें होतें. दृष्टिक्षेप अगदीं हळवा झाला होता. कुणी एकादाच शब्द बोललें तर फट्कन् त्याच्या डोळ्यांतून टीप येईल कीं काय असें नर्गिजला वाटलें !

औपचारिक विचारपूस झाल्यावर त्यानें तिला बाजूला घेतलें तेव्हां ती म्हणाली, ' मीं त्या बाईला ओळखतें. तिचा माझा बराच जुना परिचय आहे. तिचें चरित्र मला आतां माहित झालें आहे. मोठी विलक्षण आहे ती हकिकत !—'

गोविंदाचा प्राण डोळ्यांत आल्यासारखा झाला होता हें नर्गिजच्या ध्यानीं आलें, पण ही उत्कंठा कसली हें जाणून घेण्याची आपली जिज्ञासा आवरून ती म्हणाली, ' ही हकिकत मीं आतां मिळवली. पूर्वी मला माहित नव्हती. मुसलमान समाजांत

शिक्षणाचा प्रसार अजूनही फारसा झालेला नाहीं—मग तिच्या काळांत तिच्या वडि-
लांनीं कॉलेजपर्यंतचं शिक्षण दिलं याचं कित्येकांना कौतुक वाटे तर कित्येकांना वैषम्य
वाटे. यांत नवल कसलं ? कॉलेजच्या आयुष्यांत तिचा एक प्रेमसंबंध घडून आला
होता. पण तो मुलगा गरीब असल्यामुळं त्या दोघांचं लग्न व्हायला तिच्या बापाचा
विरोध होता. त्या विरोधापायींच तिनं कॉलेज सोडलं—नि तो मुलगाही कुठं
नापत्ता झाला ! समाजसेवेची तिला फार आवड होती; म्हणून ती सोशल सर्व्हिस
लीगमधें कोणत्या ना कोणत्या तरी शाखेंत कांहीं ना कांहीं काम करीत असे.
घरची ती लक्षाधीश आहे. पण ती लग्नाला तयार होईना ! चांगले सुशिक्षित
वर तिला सांगून आले होते. पण तिनं लग्न करायचं नाकारलं—' नर्गिज
क्षणभर स्तब्ध राहिली तरी तें गोविंदाच्या ध्यानीं आलें नाहीं. तो सुन्न होऊन बसला
होता. ती पुढें म्हणाली, ' तितक्यांत तो तिचा कॉलेजांतला वल्लभ आफ्रिकेंतून
परत आला. तिकडे जाऊन तोही लक्षाधीश झाला होता !—' पुन्हां नर्गिज थांबली.
यावेळीं मात्र गोविंदाला जागृति आली. जीव डोळ्यांत आणून तो म्हणाला, ' सांग,
सांग पुढं काय झालं ? '

' तो आला तो नुसता सहकुटुंबच नव्हे, तर दोन-तीन मुलं घेऊन परत आला
होता. तिला धक्का बसला. ती त्याच्यासाठीं अजून तिष्ठत राहिली होती—पण त्यानं
मात्र तिचा घात केला असं तिला वाटलं. त्याची भेट घेऊन तिनं त्याची चांगलीच
कानउघाडणी केली. तो तिच्याशीं लग्न करायला तयार होता पण सवती-
बरोबर संसार करायची हनीफाबेगमची तयारी नव्हती. इतकंच नव्हे, तर चांगलं
लग्न करून संसार थाटल्यावर आतां आपल्याकडे लग्नाची गोष्ट त्यानं काढावी हेंच
तिला अपमानास्पद वाटलं ! '

' कुणी सांगितली ही हकिकत तुला ? ' गोविंदानें विचारलें.

' तिनं स्वतःच !' नर्गिज अत्यंत गंभीर होऊन म्हणाली, ' तिनें आणखी
मला सांगितलं —'

गोविंदा स्तंभित झाला. पुढें तिनें बोलावें असेंसुद्धां त्याला वाटेना ! एकदम
उठून निघून जावें असेंही त्याच्या मनांत येत होतें. पण तितक्यांत नर्गिज म्हणाली

'त्यांच्या त्या चोरट्या प्रेमाचं फळ म्हणून तिला एक अपत्य झालं होतं! एका अनाथबालकाश्रमांत तिचं बाळंतपण झालं—' गोविंदा थरथर कांपत होता, हें पाहून नर्गिज घाबरली.

'पुरे, पुरे!' तो अगदीं खालच्या आवाजांत म्हणाला.

'थांबा!' नर्गिज म्हणाली, 'आतां थोडंच्च राहिलंय्! ती एवढंच मला म्हणाली, कीं त्या मुलाचा अगदीं अलीकडेच तिला पत्ता लागला—'

'मग तिनं काय केलं?' गोविंदानें विचारलें, 'त्या मुलाला नेलं का पुन्हां आपल्याकडे?'

'नाहीं!' नर्गिज म्हणाली, 'तिला नुसता पत्ता लागला. तिनं स्वतः जाऊन त्या अनाथालयांत चौकशी केली. तो मुलगा सुखांत आहे—वैभवांत आहे--असं कळल्यामुळं तिचा जीव खालीं पडला.'

'त्याची तिची भेट झाली का?' गोविंदानें विचारलें.

'तें कांहीं सांगितलं नाहीं तिनं.' नर्गिज म्हणाली.

'ऐक तर!' गोविंदा म्हणाला—त्याचा सारा जीव डोळ्यांत आला होता—रक्त मस्तकाला चढल्यामुळें त्याचा चेहरा लालबुंद झाला होता—नर्गिज अगदीं घाबरून गेली. तिला वाटलें, कीं त्याला एकदम मूर्च्छा येईल!—आणि झालेंही तसेंच! 'तोच मीं!' असें म्हणत असतांच तो बेभान होऊन खालीं पडला. नर्गिजनें त्याला सावरून धरलें.

## प्रकरण २४ वें.

नर्गिज घाबरून ओरडली. त्यासरशीं रमाबाई धांवत आली.

शुद्धीवर यायला गोविंदाला अवकाश लागला नाहीं. कितीतरी वेळ तो नुसता दोघींकडे टकमक पहात होता. पूर्णपणें भानावर येतांच तो म्हणाला, ' असं कधींच झालं नव्हतं मला. सावध झाल्याबरोबर ओळखसुद्धां पटेना तुमची—'

पुन्हां कांहीं वेळ तो स्वस्थ बसून राहिला. दोघींनींही त्याला कांहीं विचारलें नाहीं.

करुणापूर्ण दृष्टीनें रमाबाईकडे पहात तो म्हणाला, ' आई, आतां कुणाला तरी आई म्हणूं मीं ? हिनं चौकशी केली, पुराव्यानिशीं ठरलं, कीं मीं तिचा मुलगा आहें. —त्या कुठल्यातरी परक्या, कधींसुद्धां न पाहिलेल्या एका मुसलमान बाईचा मीं मुलगा आहें —'

' मुळींच नाहीं ! ' रमाबाई म्हणाली, ' तिचा तुझा काय संबंध ? कदाचित् तिनं तुला जन्म दिला असेल !—पण जीव मीं दिला आहे !—मीं वाढवलं आहे तुला !—'

' पण मीं मुसलमान आहें ! ' गोविंदा उद्गारला.

' कसा मुसलमान ? ' रमाबाई त्वेषानें म्हणाली, ' तिचा तुझा काय संबंध ? नाळसुद्धां न कापतां तिनं तुला टाकून दिलं !—'

'पण बीज तेंच ना !' गोविंदा भीतभीत म्हणाला.

'असेल ! पण खत हिंदुचं आहे ! झाडांचीं फुलंसुद्धां बदलतात खतानं ! रायवळाचा हापुस आंबा होतो कलम केल्यानं ! तसं कलम झालंय् तुझं ! कसला मुसलमान नी कसला हिंदु ? देवाच्या घरीं सगळेच सारखे आहेत !—' नर्गिजकडे वळून ती म्हणाली, 'आतां तूंच सांग नर्गिज, मुसलमानाचा कोणता गुण दिसला तुला याच्याठिकाणीं ? चुकून तरी तुला कधीं वाटलं का, हा हिंदु नाहीं म्हणून ? चुकून तरी कधीं नाठाळपणा दिसला का याच्या अंगीं ? एवढा विचारी, एवढा गंभीर, एवढा सालस, एवढा आज्ञाधारक मुलगा कधीं कोणत्या जातींत दिसला होता का तुला ?'

'अन् मीं पारशी आहें—विधर्मी आहें—असं वाटलं का कधीं तुम्हांला ?' नर्गिज म्हणाली, 'हे हिंदुच्या घरांत तरी वाढले आहेत ! हिंदुच्या अन्नानं, हिंदुच्या घरांत, हिंदु आईबापांच्या देखरेखीखालीं हे लहानाचे मोठे झाले आहेत ! मी पारशी आहें—पारशाची अवलाद आहें—पारशांच्या सहवासांत, पारशी धर्मांत, पारशाच्या अन्नावर वाढलें आहें ! ही मीं तुम्हांला परकी वाटलें का ? परधर्मी वाटलें का ? वैरी वाटलें का ?'

'मुळींच नाहीं !' तिला कवटाळून हृदयाशीं धरीत रमाबाई म्हणाली, 'कसली आलीय् जात ! कसला आलाय् धर्म ? नऊ महिने मीं याला पोटांत बाळगलं नव्हतं—पण त्या दिवशीं ती आली, हा मुलगा माझा म्हणूं लागली, त्यावेळीं तिच्या नरडीचा घोंट घ्यावा असं मला वाटलं ! इथं आहे का कुसव्याचा ओलावा ? कुठं आहे रक्ताचा अभिमान ? पोटचे गोळेसुद्धां दुर्वर्तनी निघाले तर नाहीं का पारखे होत ? परक्या घरची मुलगी आणून माणूस नाहीं का तिला आपली बायको म्हणून तिच्यासाठीं आपला जीव टाकीत ? तसंच आहे हें ! ही अंतरींची माया आहे ! हा लोभाचा जिव्हाळा आहे ! एकमेकांच्या प्रेमाच्या ओढीची ही ब्रह्मगांठ आहे ! अशी कुठली कुणी उपरी बाई आली म्हणून कांहीं ती सुटायची नाहीं !'

'आई, आई,' म्हणत गोविंदानें तिच्या पायांवर लोळण घेतली. रमाबाई गहिंवरून आली. तिनें त्याला वर उचलून, त्याच्या डोक्यावरून हात फिरवून बोटें मोडून टाकलीं. 'माझा बाळ तो!' असें म्हणून जेव्हां तिनें त्याला जवळ घेतलें तेव्हां नर्गिजलाही हुंदका आवरेना.

तिघेंही एकरूप होऊन गेलीं होतीं. तिघांचींही मनें एक झालीं होतीं. तिघांच्याही हृदयांतलि भावनेला मिठी पडली होती. ती अभिन्न त्रिपुटी—आई, मुलगा— आणि कोण ?— एक रमणी—निसर्गाच्या त्या तीन भावना एकरूप झाल्या होत्या!

तारेनें बोलावणें गेल्यामुळें सारें जहागिरदारकुटुंब ज्या दिवशीं येऊन हजर झालें त्याच दिवशीं हनीफाबेगमही येऊन पोंचली होती. ही मुसलमानीण इथें कां आली, याचें जहागिरदारकुटुंबाला मोठें कोडें पडलें होतें.

सर्व मंडळी दिवाणखान्यांत बसली होती. जहागिरदारकुटुंब अस्वस्थ झालें होतें. कांहीं वेळपर्यंत कुणींच कांहीं बोलत नव्हतें. गोविंदानें ही सभा कां भरवली याचें जहागिरदारकुटुंबाला आश्चर्य वाटत होतें. एक मुसलमान बाईचा समावेश या बैठकींत केल्याचें पाहून त्या तिघांनाही वैषम्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

व्याख्यानाच्या आवेशानें गोविंदा म्हणाला, 'सरकार आणि राणीसाहेब, आज मी मुद्दाम आपल्याला इथं बोलावलं याला एक फार महत्त्वाचं कारण झालं आहे. मी सप्रे हें आडनांव लावतों खरा पण तें लावायचा मला निसर्गतः अधिकार नाहीं हें तुम्हीं जाणतांच !— '

'नाहीं नाहीं' जहागिरदार म्हणाले, 'त्या गोष्टीचं निराकरण होऊन गेलंय्!'

'निराकरण होऊन गेलं होतं,' गोविंदा म्हणाला, 'पण आतां एक नवा शोध लागला आहे. मला पोसायला घेतलं तेव्हां मी कुणाचा कोण हें माहीत नव्हतं. नुकतं जन्मलेलं मूल म्हणून मला पोसायला घेतलं. त्यावेळीं मीं कुणाचा कोण याचा जरी पत्ता लागला नव्हता, तरी आतां तो लागला आहे!—' हनीफा अस्वस्थ होऊन गोविंदाकडे पाहूं लागली त्यावेळीं त्यानें तिला डोळ्यानेंच खूण केली. तो पुढें म्हणाला, 'आतां पत्ता लागला आहे.—ही माझी आई. हिच्या पोटीं मीं जन्म घेतला.—' नाहीं म्हणण्याच्या आवेशानें हनीफा पुढें सरसावत होती, पण तिला

नजरेनें दटावून गोविंदा म्हणाला, ' पुराव्यानिशीं सिद्ध झालं आहे, कीं ही मुसलमान बाई माझी आई आहे. आज यांनीं माझा प्रतिपाळ केला असला—द्विजत्वाची दीक्षा दिली असली, तरी माझं बीज मुसलमानाचं आहे !—'

' नाहीं, नाहीं,' म्हणत आक्कासाहेब ओरडत उभी राहिली. गोविंदा हंसला, आणि बेगमेच्या शेजारीं जाऊन बसून तिला एका हातानें कवटाळीत म्हणाला, ' ही माझी आई. आई म्हणून मीं हिचा स्वीकार करतों आहें—तुमच्या साक्षीनं स्वीकार करतों आहें. ही गोष्ट उघडकीस आणायची तिची इच्छा नाहीं.—तरीही मीं आई म्हणून तिचा स्वीकार करतों आहें. आतां सांगा, मला जांवई करून घ्यायची अजूनही तुमची तयारी आहे का ? '

'हा सारा या पारशीणीचा बनाव आहे.' अक्कासाहेब ओरडली, 'हिची नजर आहे यांच्यावर ! यांची माझी ताटातूट करण्यासाठीं हिनं हें कवटाळ रचलं आहे ! '

' नाहीं. ' गोविंदा म्हणाला, 'उगीच गैरसमज करून घेऊं नका ! परवांपर्यंत नर्गिजला कांहींसुद्धां माहीत नव्हतं. योगायोगानंच मला हा शोध लागला !—' असें म्हणून त्यानें सर्व हकिकत जहागिरदारसाहेबांना निवेदन केली.

सरकार राणीसाहेबांकडे, राणीसाहेब अक्कासाहेबांकडे, आणि अक्कासाहेब गोविंदाकडे पाहून नंतर पुन्हां त्या दोघांकडे पहात राहिली. कुणीच कांहीं बोलत नव्हतें. रमाबाईच्या हृदयांत धडकी भरली होती. हनीफाबेगम आली तेव्हांच ती अस्वस्थ झाली होती. पण गोविंदा आतां तिचा ' आई ' म्हणून स्वीकार करणार हें कळतांच तिच्या काळजाचें पाणी झालें. असें कांहीं होईल असें तिला वाटलें नव्हतें. त्या क्षणाला ती पूर्णपणें हताश झाली होती खरी—पण अजूनही तिचा गोविंदावर विश्वास होता.

' काय उत्तर आहे ? ' गोविंदानें पुन्हां विचारलें.

' मोठा बिकट प्रश्न आहे ! ' जहागिरदार म्हणाले, ' चट्कन् उत्तर देण्याइतकी ही क्षुल्लक बाब नव्हे. विचार केला पाहिजे—चारचौघांना विचारलं पाहिजे ! हा जहागिरीच्या इभ्रतीचा प्रश्न आहे—' थोडा वेळ विचार करून ते म्हणाले, ' पण मला असं सांगा, ही गोष्ट तुम्हीं जगजाहीर करणार आहांत काय ? '

'अर्थात् !' गोविंदा म्हणाला, 'असल्या महत्त्वाच्या गोष्टी गुप्त ठेवणं बरं नव्हे ! केव्हां तरी त्या उघडकीला येणारच ! शिवाय गुपितं राखीत बसायची मला मुळींच आवड नाहीं !—'

'अस्सं !' आक्कासाहेब वाघिणीसारखी चवताळून म्हणाली, 'सारींच गुपितं अशींच उघड करणार आहांत का ?'

गोविंदानें तिच्याकडे पाहून स्मितहास्य केलें आणि शांतपणानें म्हटलें, 'घाबरू नको ! तेवढं रहस्य उक्त न करण्याचं मीं वचन देतों. दुसऱ्याच्या अब्रूची मला चाड आहे. माझ्यापुरतं वाटेल तें करायला माझा मी मुखत्यार आहें !'

आक्कासाहेब स्वस्थ बसली. राणीसाहेब हताश झाल्या. जहागिरदारसाहेब डोकें चोळूं लागले.

'ठीक आहे.' गोविंदा म्हणाला, 'विचार करून सावकाश मला उत्तर द्या !'

'मग आम्ही आतां जातों तर !' जहागिरदार म्हणाले, 'आणखी एक तासानं गाडी आहे––मुंबईला गेल्यावर उत्तर कळवीन––' उठून उभे राहून ते म्हणाले, 'माफ करा हं ! पण माझ्यापुरतं उत्तर निश्चित आहे—'

'त्याची मला कल्पना आहे.' गोविंदा म्हणाला.

'तसं नव्हे,' जहागिरदारसाहेब म्हणाले, 'पण राणीसाहेब नि आक्कासाहेब यांची संमति असली तर विरोध करायची माझी इच्छा नाहीं. येतों तर—नमस्कार.' असें म्हणून तिघेंही उठून बाहेर गेलीं.

तीं गेलेलीं पहातांच रमाबाईनें जाऊन घाईघाईनें दार बंद केलें.

'गोंदु !—' ती काकुळतीला येऊन उद्गारली.

हंसत हंसत गोविंदा तिच्याजवळ आला अन् म्हणाला, 'घाबरलीस आई ?'

'नाहीं रे गोंदु—' रमाबाई म्हणाली, 'पण तूं म्हणालास—'

'तेंहीं खरं आहे आई !' गोविंदा उद्गारला, 'कुणालाच अंतर द्यायचं नाहीं मला ! बुद्धिपुरस्सर हिनं मला टाकलं नाहीं ! तो प्रसंगच तसा होता ! माझं अंतरंग

सांगतंय्, माझ्यासाठीं हिचा जीव तिळतिळ तुटत होता—' बेगमेजवळ जाऊन तो म्हणाला, ' नाहीं अम्मा ? '

' खरं आहे बेटा ! ' बेगम उद्गारली. तिचा कंठ दाटून आला. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या.

तिचे पाय धरून गोविंदा स्फुंदून स्फुंदून रडूं लागला. तिनें गोविंदाला उचलून हृदयाशीं धरलें. त्याच्या तोंडावरून हात फिरवून तिनें त्याच्या मस्तकाचा मुका घेतला.

रमाबाईलाही भडभडून आलें. ' माझा गोंदु, माझा गोंदु— ' म्हणत तिनें गोविंदाला मिठी मारली. दोन आई आणि एक मुलगा एकजीव झालीं.

नर्गिजच्या डोळ्यांतून आसवांचे पाट वहात होते. दूर उभी राहून ती तें स्वर्गीय दृश्य पहात होती. तिला धन्यता वाटली. एवढ्या थोर आत्म्याची माया जडल्याबद्दल तिला अभिमान वाटला. त्या अभिमानानें तिचें अंतःकरण फुलून निघालें. ती आपल्याशींच पुटपुटली, ' माझा गोंदु ! '

* * * *

गोविंदानें राजीनामा दिल्याची बातमी प्रसिद्ध होतांच सारा मुंबई इलाखा हादरून गेला. ती बातमी वाचतांच आक्कासाहेब राणीसाहेबांना म्हणाली, ' पाहिलंत आईसाहेब, मला वाटलंच होतं !—पदोपदीं मला संशय येत होता, कीं हें बीज अस्सलाचं नव्हे ! आतां मला पश्चात्ताप होतोय ! तुमच्यामुळं मीं असल्या माणसाच्या नादीं लागलें होतें. तरी बरंच, दैवानं खैर केली !—वेळींच सारं कांहीं उघडकीला आलं !'

राणीसाहेबांनीं एक मोठा सुस्कारा टाकला. त्या म्हणाल्या, 'एवढी मोठी मानाची नोकरी—अन् हा मूर्ख माणूस राजीनामा देतो ! भिकारडा तो भिकारडाच ! माझ्या पोरीचं नशीब शिकंदर म्हणून वेळींच हें संकट टळलं ! '

आपल्याशींच हंसत आक्कासाहेब वर्तमानपत्रांतली ती बातमी पुन्हां पुन्हां वाचीत होती.

ॐ तत्सत्

# ग्रंथकर्त्यांचीं इतर पुस्तकें

## नाटकें

कुंजविहारी
संजीवनी ( अप्रकाशित )
सरस्वती ( ,, )
वरवर्णिनी
हाच मुलाचा बाप
समर्थ भिकारी ( चंद्रशेखर )
ल्याचा लय ( नरकेसरी )
संन्याशाचा संसार
सत्तेचे गुलाम
पतितपावन ( तुरुंगाच्या दारांत )
नवा खेळ
करग्रहण
करीन ती पूर्व
सोन्याचा कळस
जागती ज्योत
स्वयंसेवक
समोरासमोर
कोरडी करामत
केवळ कलेसाठीं

## लघु नाटकें

वज्रकुसुम
पापी पुण्य
संसार
नामानिराळा
सदा बंदिवान

## आगामी नाटकें

पायाचे दगड ( अप्रकाशित )
अभिनव देश ( ,, )
कुणबी तुकाराम ( ,, )

## कादंबऱ्या

संसार कीं संन्यास
चिमणी
विधवाकुमारी
गोदू गोखले, भाग १–२
धांवता धोटा
परतभेट
कुलदैवत
उघडझांप
विकारी वात्सल्य
वेणू वेलणकर
उमलती कळी
न पुजलेली देवता
मलबार हिल ( सौंगडी )
१९१४ नंतर
कुणाचा हा देश ?
भानगडगल्ली
पेटतें पाणी
सात लाखांतील एक
तरतें पोलाद
प्रेमाची अवलाद

## लघुकथा

स्वैरसंचार
षोडशी
वैमानिक हल्ला

## किरकोळ

आघात ( व्याख्यानें )
श्रुतिका ( श्राव्य प्रकरणें )
वाङ्मय आणि रंगभूमि ( निबंध )
माझा नाटकी संसार ( आत्मचरित्रात्मक )

# आमचेकडे मिळणारीं पुस्तकें

## लायब्रऱ्या व व्यापारी यांना भरपूर कमिशन मिळेल

| पुस्तकाचें नांव | लेखक | रु. | आ. |
|---|---|---|---|
| विरलेलें वस्त्र | | १ | १२ |
| धर्मशास्त्र | (काणे) | २ | ८ |
| लो. टिळक | (मराठे) | ० | १२ |
| मुलांचा भक्तिमार्ग | | ० | ८ |
| सोन्याचा कळस | (वरेरकर) | १ | ० |
| मराठ्याची मुलगी | (कमतनूरकर) | १ | ० |
| भस्मासूर नाटक | | ० | ८ |
| वीरवंचना नाटक | | ० | ८ |
| पटवर्धन नाटक | (टेंबे) | १ | ४ |
| सवता सुभा | (गुप्ते) | ० | १२ |
| छेडलेला छावा | (कोठीवाले) | १ | ० |
| पतितपावन | (वरेरकर) | ० | १२ |
| सज्जन | (कमतनूरकर) | १ | ० |
| संततिनियमन | (हिंदी) कर्वे | ०—८ | |
| स्वामी रामतीर्थ भा. २, ३, ४ | | | |
| वीर वैरागी | (सावरकर) | १—० | |
| मानसपूजा | (कोल्हटकर) | १—४ | |
| ब्रँडीची बाटली | (प्र. के. अत्रे) | १ | ४ |
| वठलेला वृक्ष | (कु. गीता साने) | १ | ८ |
| स्नेहप्रभा | (केळुसकर) | १ | ० |
| बहर | (व. ना. वैद्य) | १ | ० |
| निखळलेली हिरकणी | (कु. गीता साने) | १ | ० |
| जागत्या छाया | (अनंत काणेकर) | १ | ४ |

| पुस्तकाचें नांव | लेखक | रु. | आ. |
|---|---|---|---|
| शिंपले व मोतीं | (काणेकर) | ० | १२ |
| पिकलीं पानें | ,, | १ | ४ |
| श्रीकान्त | (य. गो. जोशी) | १ | ० |
| त्रिदोष | , | १ | ० |
| तुळशीपत्र | ,, | १ | ८ |
| वादळ | (हडप) | १ | ८ |
| अंजन | (गुर्जर) | १ | ४ |
| जीवननृत्य | (निरंतर) | १ | ८ |
| आघात | (भा. वि. वरेरकर) | १ | ० |
| अंधारांतील दिवे | (निरंतर) | १ | ४ |
| लतिका | (कु. गीता साने) | १ | ० |
| हिरवळीखालीं | ,, | १ | ८ |
| वेणू वेलणकर | (भा. वि. वरेरकर) | १ | ८ |
| उमलती कळी | ,, | १ | ८ |
| मृगजळ | (मो. ग. रांगणेकर) | २ | ० |
| देशमुखवाडी | (नाथमाधव) | २ | ८ |
| काजवे | (शंकर साठे) | १ | ० |
| वादळापूर्वी | (सौ. कमलाबाई सोहनी) | १ | ८ |
| बॅ. सावरकर चरित्र | | १ | ० |
| पहांटेपूर्वीचा काळोख | (ना. ह. आपटे) | २ | ० |
| महाराष्ट्र शारदा | (केळकर) | १ | ० |
| शकुनी मोहोर | (कुमुदिनी प्रभावळकर) | १ | ४ |

| पुस्तकाचें नांव | लेखक | रु. | आ. |
|---|---|---|---|
| संततिनियमन | (ना. सी. फडके) | १ | ४ |
| कुठें ? | (कमलाबाई) | १ | ० |
| शृंगेरीची लक्ष्मी | (भानू) | २ | ० |
| मुलींची द्रौपदी | (किनरे) | १ | ८ |
| महात्मा गांधी | (सीताकान्त) | १ | ८ |
| ठगाची जबानी | | ३ | ० |
| शेतकी | (बालमहाजन) | ३ | ८ |
| साबणाचे फुगे | (जोगळेकर) | १ | ४ |
| देवपूजा | (शिंदे) | १ | ० |
| अनियमित जग | (कुमुदिनी प्रभावळकर) | १ | ८ |
| अनारकली | | १ | ० |
| राक्षसी रणसंग्राम | (ल. ना. जोशी) | १ | ० |
| माधवानुज [कविता] | (मोडक) | २ | ० |
| गोमंतक | (सावरकर) | २ | ० |
| रातराणी | (सरपोतदार) | १ | ० |
| राणी कीं रखेली | (हडप) | २ | ० |
| सौंदर्याचा फुलबाग | ,, | २ | ८ |
| मास्तरीण काकू | ,, | १ | ८ |
| बाईलवेडा | ,, | २ | ० |
| निरभ्र चन्द्र | ,, | १ | ८ |
| नंदनवन | ,, | ० | १२ |
| झांकली मूठ | ,, | १ | ० |
| वांकडें पाऊल | ,, | १ | ० |
| हाच माझा सम्राट | ,, | १ | ८ |

| पुस्तकाचें नांव | लेखक | रु. | आ. |
|---|---|---|---|
| रूढीच्या वणव्यांत | (हडप) | १ | ८ |
| चिरंजीवी | ,, | १ | ० |
| लग्नलांछन | ,, | १ | ० |
| उघडझांप | (वरेरकर) | १ | ८ |
| स्वैरसंचार | (वरेरकर) | २ | ० |
| निर्माल्यांतील कळी | (प्रभावळकर) | १ | ४ |
| हिंदु लग्नसंस्था | (निमकर) | २ | ० |
| स्त्रीहृदय | (सहृदय) | १ | ४ |
| शुक्राची चांदणी | (साळगांवकर) | ० | १२ |
| लोकमान्य टिळक भा. २ व ३ | केळकर | | |
| निरंजन | (फडके) | २ | ० |
| अटकपार | ,, | २ | ८ |
| भविष्य प्रचीति | (नाथमाधव) | १ | ८ |
| सापत्नभाव | ,, | २ | ० |
| कथाकलाप | (विद्यार्थी) | १ | ० |
| मरण कीं लग्न ? | (सावरकर) | १ | ८ |
| कुलदैवत | (वरेरकर) | १ | ८ |
| विकारी वात्सल्य | ,, | १ | ८ |
| लपलेले खडक | (सहस्रबुद्धे) | १ | ४ |
| साम्राज्यासाठीं | (नाशिककर) | २ | ८ |
| किशोरीचें हृदय | (दिवाकर कृष्ण) | १ | ८ |
| अभागिनीची डायरी | (उपाध्ये) | १ | ४ |
| दैवदर्पण | (ज्योतिष) | ३ | ० |
| अचानक द्रव्यनिधि | (बाळ महाजन) | २ | ० |
| संख्याशास्त्र | | १ | ० |

| पुस्तकाचें नांव | लेखक | रु. | आ. |
|---|---|---|---|
| समोरासमोर | ( वरेरकर ) | १ | ० |
| गौरीशंकर | | १ | ८ |
| बहकलेली तरुणी | ( हडप ) | १ | ८ |
| समर्थ भिकारी | ( वरेरकर ) | १ | ० |
| काकाची शशी | ( माई वरेरकर ) | १ | ० |
| विनोदी लेखसंग्रह | | १ | ८ |
| मुलींचें कॉलेज | | ० | ६ |
| गोदू गोखले भा. १ला. | (वरेरकर) | १ | ८ |
| ,, ,, भा. २ रा. | ,, | १ | ८ |
| आग्र्याहून सुटका | ( औंधकर ) | १ | ० |
| कमळाच्या पाकळ्या | ( बंबेवाले ) | १ | ८ |
| वेड्यांचा बाजार | ( गडकरी ) | १ | ० |
| पूर्णिमा भा. १।२ | ( मुजुमदार ) | १ | ४ |
| मुलींची सीता | ( किनरे ) | १ | ४ |
| मृत्युच्या मांडीवर | ( भोपटकर ) | १ | १२ |

| पुस्तकाचें नांव | लेखक | रु. | आ. |
|---|---|---|---|
| केळकर | ( चरित्र ) | १ | ४ |
| संन्यस्त खड्ग | ( सावरकर ) | १ | ० |
| रणदुंदुभि | ( वीर वामन जोशी ) | १ | ४ |
| वऱ्हाडचा पाटील | (माधवराव जोशी) | ० | १२ |
| श्री | ( कमतनूरकर ) | १ | ४ |
| गिरणीवाला | ( मा. जोशी ) | ० | १२ |
| वशीकरण | ,, | ० | ८ |
| विश्ववैचित्र | ,, | १ | १२ |
| स्वामी रामतीर्थ भा. ५ वा | | २ | ८ |
| ताडगोळे | ( आठवले ) | | १० |
| बॉबगोळे | | १ | ४ |
| मृगजलावरील नौका | ( नाईक ) | २ | ० |
| नंदादीप | ,, | १ | ४ |
| उंबराचें फूल | ( सरमळकर ) | १ | ४ |
| मोरपिसें | ( काणेकर ) | १ | ४ |

हिरजी मोहनजी शंकरबारीलेन, लोहाणा सिनेट्री,
३ रा मजला, रुम नं. १४५ मुंबई नं. २

